







नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

'दीपावली'चा हा नववा अंक. या वर्षी आम्ही रस-निदर्शक सहा चित्रें दिलीं आहेत ! रंग, रेखा आणि रचना या तिन्ही दृष्टींनीं तीं यथार्थ आणि सरस झालीं आहेत. याचें सर्व श्रेय बॉम्बे फाइन आर्टचे सहृदय आणि रसिक संचालक श्री. भय्यासाहेब घोटे, श्री. रमेशनाथ मदन आणि डॉ. घोटे यांच्या प्रेमळ आणि अनमोल सहकार्यासच दिलें पाहिजे. मौज मुद्रणालयाचे भागवत बंधू व कामगार बंधू, बॉम्बे प्रोसेसचे श्री. कामत, शंकर आणि कं. चे श्री. विष्णुपंत कडव, टॉम अँड वे. चे श्री. ग. त्रि. तांबे, श्री. श्रीकृष्ण स. दाभोळकर, त्रिवेणी फिल्म्सचे सूत्रधार श्री. रत्नाकर देसाई, या सर्वांनीं आमच्याकडे आपुलकीनें पाहिलें म्हणूनच हा अंक वेळेवर आणि इतक्या आकर्षक स्वरूपांत निघूं शकला.

या वर्षी आम्हीं 'दीपावली'ची हिंदी आवृत्ति काढली आहे.

ही दिवाळी आणि येणें वर्ष आमच्या वाचकांस, लेखकांस, विक्रेत्यांस आणि जाहिरातदारांस सुखसमृद्धीचें जावो. •

: चित्रछपाई :
बॉम्बे फाईन आर्ट ऑफसेट
अँड लिथो वर्क्स्
सन्डहर्स्ट रोड, मुंबई २७

: मुद्रण स्थळ :
मौज प्रिंटिंग ब्यूरो,
खटाववाडी, मुंबई ४

: प्रकाशन-स्थळ :
दलाल आर्ट स्टुडिओ,
४०/४२ केनेडी ब्रिज,
मुंबई ४

# दीपावली

ILLUSTRATED MARATHI
ANNUAL
1953

: संपादक :
रॉय किणीकर, चित्रकार दलाल

## या अंकांतील चित्रें :

- शृंगार
- वत्सल
- करुण
- भक्ति
- अद्भुत
- शान्त

## आणि साहित्य :

• प्रा. श्रीकृष्ण केशव क्षीरसागर • काकासाहेब गाडगीळ • प्रा. श्रीपाद महादेव माटे • पु. भा. भावे • वि. स. खांडेकर • अनंत काणेकर • वि. वा. शिरवाडकर • पं. महादेवशास्त्री जोशी • दुर्गा भागवत • लक्ष्मणराव सरदेसाई • बा. भ. बोरकर • प्रा. ज. नी. कर्वे • प्रा. ह. वि. इनामदार • डॉ. म. वि. आपटे • मंगेश पांडगांवकर • अच्युत बर्वे • सोपानदेव चौधरी • इंदिरा सन्त • माधव मनोहर • प्रभाकर तामणे • दि. के. बेडेकर • काशीनाथ दामोदर नाईक • वि. म. कुलकर्णी • यशवन्त • कुसुमाग्रज • सदानंद रेगे • ज. र. आजगांवकर • शंकर वैद्य • पांडुरंग भानुदास डिंगरे • शांता शेळके आणि • सदाशिव आत्माराम जोगळेकर.



१९४९ ते १९५३ या पांचही वर्षांच्या 'दीपावली'तील चित्रांच्या सेटसाठीं ट. ख. सह रु. ६ फक्त. आणि कुठल्याहि एका सेटसाठीं ट. ख. सह रु. १-७-०

Edited, printed & published by Roy Kinikar

: लेखक :

प्रा. श्रीकृष्ण के. क्षीरसागर




One Moment in Annihilation's waste
One Moment, of the Well of Life to taste—
The Stars are setting and the Caravan
Starts for the Dawn of Nothing—Oh, make haste!

पावसाळ्यांतील हिरव्यागार वनश्रीवरील रंग, यौवनानें फुलून निघालेल्या मानवी मुखश्रीवरील टवटवी, आनंदानें भरून येऊन गाऊं नाचूं लागलेल्या हृदयांतील गोड अधीरता—या सर्वांचा अर्थ कोणता? आणि हेतु काय? हे प्रश्न विचारणाराला खरा कलावन्त मूर्खांतच काढील. आणि या अर्थानें पाहतां, चित्रकार हे '**कलावन्तांचेहि कलावन्त**' ठरतील. कारण डोळ्यांना दिसलेलें सौंदर्य रंगरेषांत सांठवून ठेवण्यापलीकडे रुक्ष उठाठेवी ते बहुधा करीत नाहींत. पक्ष्याचे अर्धवट पसरलेले पंख, युवतीनें अस्फुट उघडलेला ओठ, अर्भकानें अकारण पुढें केलेला फुगीर चिमुकला हात; अकारण आलापानें भरून आलेली छाती,—यांच्या कारण मीमांसेंत पडण्याइतका तो रुक्ष नसतो. किंबहुना, सुंदरांच्या सुंदर हालचाली हाच सृष्टीचा अर्थ व हाच कलेचा उगम असें तो मानतो.

मानवाला सृष्टींतील सौंदर्याचा बहर अनंत आणि अखंड आहे, असें वाटतें. समुद्र किनाऱ्यावर मातेचें बोट धरून पहिलेंच पाऊल टाकणाऱ्या अर्भकाला वाटावें, त्या प्रमाणें मानवाला सृष्टीच्या अमर्याद सौंदर्याच्या सान्निध्यांत वाटतें. विपुलता, बहर, टवटवी, वैचित्र्य, चैतन्य, लयबद्धता, बेहोपी, यांच्या माऱ्यानें मानवी मन जणुं गुदमरून जातें, सौंदर्य, टवटवी, आणि लयबद्धता यांचें अनंतत्व हेंच जीवनाचें स्वरूप असें मानवी मनाला वाटूं लागतें.

आणि तोंच सृष्टीचें दुसरें स्वरूप त्याच्या अनुभवाला येतें! वैपुल्याच्या, बहराच्या, सौंदर्याच्या आणि टवटवीच्या ऐन मध्यभागींच विनाश, उजाडपणा आणि उदासपणा अनुभवाला येतात! आणि त्यांच्या दर्शनानें सौंदर्याच्या स्वयंपूर्णतेवरील, स्वयंसिद्धतेवरील व सार्वभौमतेवरील विश्वाला धक्का बसतो! सौंदर्याची अर्थपूर्णता वं सौंदर्याचें महत्त्व सिद्ध करण्याला दुसऱ्या कुठल्याहि प्रमाणांची गरज नसते, असें म्हणतात. तें स्वयंपूर्ण व स्वयंसिद्ध असतें; व म्हणूनच आपल्या मनावर सहज प्रभुत्व गाजवतें. आणि त्याच्या त्या प्रभुत्वाचा व आपण त्याला अर्पण करीत असलेल्या निष्ठेचा गर्भित अर्थच असा असतो कीं, सौंदर्याला शाश्वत महत्त्व आहे; निसर्गसिद्ध मान आहे. पण प्रत्यक्ष सृष्टींत काय आढळतें? जीर्णता, विनाश, विटंबना. यांचें अस्तित्व म्हणजे सौंदर्यवाद्यांच्या या श्रद्धेला विकट हास्यपूर्वक आव्हानच होय! ज्यांचा तुम्ही तिरस्कार करतां, त्यांच्याइतकेंच तुमचें हें पूजास्थानहि नश्वर आहे, मर्त्य आहे, असें सृष्टींतील विनाशधर्म त्यांना निष्ठुरपणें बजावीत असतो. आणि मग सौंदर्याचा अर्थ विचारणें म्हणजे अरसिकपणा होय, असें म्हणणारा सौंदर्यपूजकहि अशा जगांत 'सौंदर्याचा अर्थ' विचारूं लागतो!

पण सार्वभौम सौंदर्य आणि सार्वत्रिक नश्वरता यांच्या या द्वंद्वानें केवळ सौंदर्यवादी व कलावन्तच स्तिमित होतात असें नाहीं. धर्म आणि तत्त्वज्ञान यांचेंहि मूळ सृष्टींत दृष्टीला पडणाऱ्या या क्रूर क्रीडेंतच आहे. पण या क्रूर क्रीडेवर 'धर्म' जो इलाज सुचवितो, तो प्रत्यक्ष सृष्टीच्या भोक्त्यांना व ऐहिक जीवनाच्या 'आशंकां'ना समाधानकारक नसतो. धर्म आम्हांला दृश्याकडून दृष्टि काढून ती अदृश्य सृष्टीकडे वळविण्याला सांगतो; ऐहिकांतून आसक्ति काढून ती पारलौकिकाकडे वळविण्यास सांगतो!

आणि इतरेजनांनीं तर या क्रूर खेळांचा पुरता विचारहि केलेला नसतो. आठवड्याच्या शिध्यापलीकडे दृष्टि न पोहोंचविणाऱ्या आजच्या जीवनासारखें त्यांचें वैचारिक जीवन कुबडी असतें! सुखानें सुखी व्हायचें; दुःखानें दुःखी व्हायचें, एवढेंच ते बिचारे मुक्या जनावराप्रमाणें जाणतात! पण जें 'सुख' होतें, तेंच 'दुःख' कां झालें? हा प्रश्न विचारण्याइतपत त्यांना कुवत नसते. सारांश, तत्त्ववेत्ते अदृश्याकडे डोळे लावून बसलेले; तर इतरेजन डोळे मिटून येईल तें चाखणारे, असे हे दोन नितान्त विषम वर्गच सामान्यतः दृष्टीला पडतात.

अर्वाचीन जगताच्या गळ्यांतील ताईत झालेला इराणचा कवि उमर खय्याम याचें वैशिष्ट्य तें हें कीं, तो परम जीवनभक्तहि होता आणि त्या जीवनाच्या नश्वरतेमुळें तो परम दुःखीहि होता; पण नश्वरतेवर व दुःखावर तोडगा म्हणून तो अदृश्य अशा परलोकाकडे वळायला मात्र तयार नव्हता! त्याचें हें नश्वर सृष्टीवरील प्रेम, नश्वर सृष्टीबद्दलचें त्याचें हें दुःख आणि परलोकासंबंधींची त्याची दृष्टी उदासीनता म्हणजे निखालस शहाणपणा होता असें मी म्हणत नाहीं. पण दुःखी मनुष्यानें शहाणपणा दुःखवावा हें म्हणणेंच वेडेपणाचें नव्हे का? आणि उमर खय्याम जितका सौंदर्यभक्त आणि जीवितासक्त होता,

**ज्या ऐहिक आकांक्षेवर माणसें जीव लावून जगत असतात तिची राख होते, किंवा कचित् तिला पालवीहि फुटते !—पण लगेच, रेताड वाळवंटावर पडलेल्या हिमवृष्टीप्रमाणें तीहि घटका दोन घटका चकाकून वाळून जाते ! अशा स्थितींत भावी आकांक्षा अथवा भावी तरतूद यांच्या गोष्टी करणें म्हणजे वास्तवतेचा अभाव होय !**

खितपत तो दुःखी होता. त्याचा पूर्वजन्मींचा पाश्चात्य सहोदर फिट्झजेराल्ड, याच्या आंग्ल वाणीच्या पद्यासांत यूरोपला जिंकणारें त्याचें 'रुबायत्' (रुबाई-संग्रह), म्हणजे परमप्रिय मानवी जीविताच्या नश्वरतेवरील एक शाश्वत शोकगीतच होय !

त्याच्या या विख्यात विलापिकेची मोहनी नक्की कशांत आहे, हें सांगणें सोपें नाहीं. कित्येक जण तर ती मोहनी त्याच्या यूरोपीय दूताच्या भाषिक करामतींत आहे, असें म्हणून मोकळे होतात ! वरवर पाहणाराला उमर खय्याम हा केवळ सुखवादी वाटेल; त्याहून थोडें खोल पाहणारांना तो सौंदर्यपूजक व जीवनपूजक वाटेल पण त्याच्या अमर 'रुबायत्' काव्यावरूनच सांगायचें झालें, तर त्याच्या भक्तीपेक्षा त्याचा शोकच त्याच्या जिवाला अधिक व्यापून राहिला होता ! एखाद्या स्त्रीला पतिप्रेमामुळेंच सदैव आपल्या पतीचें प्रेम आपल्यावरून उडत आहे, अन्य स्त्रीवर बसत आहे, अशी धास्ती वाटावी व प्रियकराऐवजीं प्रेमनाशाचींच स्वप्नें पडावीं, तशी बिचाऱ्या उमरची स्थिति झाली होती ! जीविताचा विचार मनांत येतांच त्याच्या मनांत मरणाचा विचार येई; सौंदर्याचा विचार मनांत येतांच नश्वरतेचा विचार त्याला व्याकुळ करी ! धर्म, तत्त्वज्ञान, वैराग्य यांचा त्यानें जागजागीं 'अधिक्षेप' केला आहे. पण अधिक्षेप हा अहंकारदर्शक शब्द उमर खय्यामच्या व्याकुळ उद्गारांना लावणें, म्हणजेहि अन्यायच होय. तो कुणाचें खंडन करीत नाहीं; तो कुणावर रागावत नाहीं; तो वैतागून वैरागी होऊं पाहात नाहीं कीं जीव द्यायलाहि उठत नाहीं. त्याचें दुःख शान्त, सात्त्विक, मधुर आणि समाधानी आहे ! त्याचें आपण खंडन तर करूं शकतच नाहीं; पण सान्त्वनहि करूं शकत नाहीं ! कारण कविता, दयिता, मदिरा आणि स्वतः उमर खय्याम, या सर्वांवर परम लोभ करणाऱ्या आणि हे सर्वच विनाशाच्या नौकेंत विलसत असलेले पाहून गहिंवरणाऱ्या, या दुःखी सौंदर्यपूजकानें तुमची-आमची वाट न पाहतां आपले डोळे आपणच पुसले आहेत ! आणि आपल्या नश्वर जीविताचा जीवनक्रम ठरवूनहि टाकला आहे !

**"मित्र हो ! चला ! मदिरेचा प्याला भरा. आणि वसन्तांतील हुताशनांत हेमन्तांतील वैराग्यवस्त्र भिरकावून द्या ! कारण—**

"The Bird of Time has but a little way
To fly—and Lo ! The Bird is on the Wing."

उमर खय्यामच्या या उद्गारांत मदिरापानाची त्वरा आहे; वैराग्याचा धिक्कार आहे; वसन्तांतील सुखोपभोगांचें अधीर स्वागत आहे. पण तें सर्वच जणुं घाईघाईनें आणि उदासपणें उरकलेल्या एखाद्या प्रिय व्यक्तीच्या अन्त्यसंस्काराप्रमाणें वाटतें ! तिच्या कलेवरावर पुष्पहार वा नूतन वस्त्र समर्पण करतांना, समर्पण करणाराचें चित्त त्या पुष्पांतहि नसतें कीं वस्त्रांतहि नसतें ! तें गतस्मृतींत कुठें तरी भरकटत असतें ! अथवा अज्ञानांत भ्रमण करणाऱ्या त्या व्यक्तीच्या वियुक्त आत्म्याबरोबर अज्ञानांत संचार करीत असतें ! रुबायत्प्रणीत सुखोपभोगहि असे अन्त्य उपभोगासारखेच आहेत. उमरचें चित्त मदिरेंतहि नाहीं, आणि वसंतागमांतहि नाहीं. तर ज्याचा मुक्काम आधींच हलला आहे, अशा नश्वर जीविताच्या काफिल्याकडे आहे !

ठिकठिकाणीं उमर खय्याम भावी व अज्ञात पारलौकिक कल्याणाचा धिक्कार करतांना आढळतो; व चालू घडी ऐहिक उपभोगार्थ सार्थकीं लावण्याचा संदेश देतांना दिसतो. ऐहिक जीवनांतीलहि भावी आशाआकांक्षांवर भिस्त ठेवणारांची तो कींवच करतो; आणि या दृष्टीनें पाहतां सामान्यतः आधुनिक अर्थानें आपण ज्यांना जडवादी, वास्तववादी, व्यवहारवादी हीं नांवें देतो त्यांच्या मानानें तो विरक्त आणि अव्यवहारी वृत्तीचाच आहे. पण त्याचीच भूमिका अधिक तर्कशुद्ध व सुसंगत आहे, हें मान्य करावें लागेल. मानवी जीवन आहे तसें—त्यांत कुठलीहि काल्पनिक (wishful) रंगसफेती न करतां,—पत्करायचें ठरल्यावर, उद्यांची तरतूद करणें व उद्यांच्या भरंवशावर आजचें सुख गमावणें, म्हणजेहि भ्रान्तिष्टपणा आणि स्वप्नाळूपणाच नव्हे का ?

जे उद्यांची 'बात' करतात त्यांच्याशीं त्याचें जमत नाहीं; त्यांना तो म्हणतो—"काय उद्यां ? उद्यां तर मी कदाचित् सहस्रावधि वर्षांच्या गतकालांत जमा झालेला असेन !" त्याच्या या चालू क्षणांच्या सुखावरील भरामुळेंच तो सुखवादी आहे, असा भास होतो. ग्रीक तत्त्ववेत्ता एपिक्यूरस व भारतीय नास्तिकवादाचा प्रणेता चार्वाक यांच्याशींहि त्याची सांगड घालतात; पण एपिक्यूरसचा भर परिमित उपभोगावर होता. "Nothing in excess" हें त्याचें सूत्र होतें. आणि जो मनुष्य सुखाचीहि काटकसर करण्याइतका सावध असतो, त्याला दुःखी म्हणतां येणार नाहीं हें उघडच आहे. चार्वाकाचें संपूर्ण तत्त्वज्ञान उपलब्ध नाहीं. पण प्रतिस्पर्ध्यांनीं खंडनार्थ उद्धृत केलेलीं जीं कांहीं त्याचीं म्हणून मतें आढळतात, त्यांवरून परलोकवादी धार्मिकावरील त्याचा रागच अधिक व्यक्त होतो. परलोकाच्या साधनार्थ इहलोकींची चैन कमी करण्याचा जर त्याच्यामागें कोणी लकडा लावीत नसेल, तर त्याला फारसें दुःख उरेल असें दिसत नाहीं. म्हणजे त्याची स्थिति आमच्या कम्युनिस्ट मित्रासारखी आहे. एकदां जमीनदार आणि भांडवलदार नाहींसे झाले कीं मग त्यांना दुनियेंत दुःख म्हणून दिसत नाहीं. उमर खय्याम हा ग्रीक एपिक्यूरसहूनहि वेगळा आहे आणि भारतीय चार्वाकाहूनहि वेगळा आहे. एपिक्यूरसइतका तो व्यवहारी नाहीं; कारण तो उद्यांची तरतूद करण्याला तयार नाहीं. आणि चार्वाकाइतका तो शरीरनिष्ठ, उद्दाम आणि विधिनिषेधशून्य नाहीं; कारण मुख्य गोष्ट ही आहे कीं, उमर खय्याम दुःखी आहे. आणि खरें प्रेमच खरें दुःख करूं शकतें ! आणि प्रेमानें दिलेलें दुःख कशाचा द्वेषहि करीत नाहीं कीं कुणाचा निषेधहि करीत नाहीं !

उमर खय्याम सुखवादी नाहीं, शरीरनिष्ठ नाहीं, हें म्हणणें कित्येकांना कसेंसेंच वाटेल. कारण स्वतः उमर खय्यामच जागजागीं स्वतःला नंदनवनाप्रमाणें वाटणाऱ्या ऐहिक सुखांचा नामोच्चार करीत आहे ! किंबहुना, उमर खय्यामनें आपल्या ऐहिक इच्छांची यादी जितकी मुक्तहस्तें

अनुक्रमणिका




कंपनीच्या वाढत्या वैभवाचें
नवें भव्य व उत्तुंग प्रतीक

## वेस्टर्न इंडिया हाऊस, पुणें


Western India House, Poona.

— उद्घाटन समारंभ —

उपराष्ट्राध्यक्ष **डॉ. एस्. राधाकृष्णन्**
यांच्या हस्तें ता. २७-१०-५३ रोजीं, मोठ्या थाटामाटांत व आनंदांत पार पडला.



## वेस्टर्न इंडियाचा
### —भरभक्कम व मजबूत पाया

* माफक हप्ते.
* भरपूर राखीव निधि.
* काटकसरीचा व्यवहार.
* अत्यंत प्रामाणिक कर्तव्यनिष्ठा
* साध्या व सोप्या विमायोजना.
* पैसा गुंतविण्यांतील दूरदृष्टी व काळजी.
* कंपनीच्या कारभारावर विमेदारांचें नियंत्रण
* विमेदारांना नफ्यांतील जास्तींत जास्त हिस्सा.
* सेवेविषयीं निष्ठा व विमेदारांच्या हितावियीं जागरूकता.
* मूल्यमापनाचा कडक आधार व त्यामुळें भरपूर लाइफ फंडे

★

# वेस्टर्न इंडिया विमा कं. लि.

## — सातारा —

पुणें शाखा—लक्ष्मी रस्ता, पुणें २.

च्या माडीवर गळून पडलें असावें !"

'फार काय ! जनसम्मर्दापासून दूर म्हणून ज्या नदीकिनारीं येऊन बसला आहे, त्या किनाऱ्याला झालरीप्रमाणें शोभणारी मखमली-सारखी नाजुक हिरवी पालवी,—न जाणों तिच्या मुळाशीं महानिद्रा घेत असलेल्या कोणा रमणीच्या एकेकाळीं रमणीय असलेल्या ओठांतहि तिच्या त्या नाजुक सौंदर्याचा उगम असेल !

सारांश, सृष्टींत पावलोपावलीं सौंदर्याचा जन्म दिसत आहे; तर पावलोपावलीं सुंदरतेची उत्तर-क्रियाहि दिमत आहे ! यांतून एखाद्या आधुनिक 'बर्गसाँ'लें Creative Evolution चा अखंड जीवन-प्रवाह दिसला तर दिसो बिचारा ! अस्सल मानवी-आसक्तीनें नखशिखान्त माखून निघालेल्या प्रेमळ उमर खय्यामच्या वांट्याला मात्र परम दुःखच येतें ! तो म्हणतो,—

**चला, मित्र हो ! या वृद्ध खय्यामबरोबर चला आणि विद्वानांची विद्वत्ता विद्वानांना लखलाभ असूं द्या ! कारण एक गोष्ट निश्चित आहे कीं आयुष्य झपाट्यानें संपत असतें !**

**एकच गोष्ट निर्विवाद आहे** आणि बाकी **सर्व झूट आहे ! जें पुष्प एकदां उमलतें तें कायमचें गळून पडतें !**

आणि दुःखावरहि इलाज म्हणजे मदिरेपासूनच काय ती मिळणारी 'गोड विस्मृति' ! उमर खय्यामची दारू आध्यात्मिकहि नाहीं कीं वैषयिकहि नाहीं. ती पुरी पुरी मानवी आहे. ज्यांनीं ईश्वरी सृष्टि आणि आणि मानवी जीवन यांच्यावर मनापासून प्रेम केलें आणि त्या प्रेमाच्या मोबदल्यांत ज्यांच्या वांट्याला नश्वरतेचें दुःख आलें त्यांना विस्मृतींत बुडी घेण्याखेरीज दुसरा इलाज कोणता ? आणि मानवी जीवनावर प्रेम करणें हाच मुळीं दोष असेल तर ती मानवी मनांत पेरला कुणीं ? अव्यक्त संगीताच्या दुनियेंत लुप्त झालेल्या परलोकवासी बाई सुंदराबाईंच्या एका लोकप्रिय रेकॉर्डमधील ओळ आहे—

**हमारे दिलको खराब करके हमीसे उनकी शिकायतें हैं ।**

**ये रस्म क्या है ये तर्ज क्या है ये चाल क्या है ये राह क्या है ।**

आमच्या हृदयाला खराब करून उलट आमच्यावरच यांच्या तक्रारी आहेत !

ही रीत कुठची ? ही तऱ्हा कुठची ? ही चाल कुठची ? हा रिवाज कुठचा ?

उमर खय्याम पराभूतवृत्तीचा नाहीं व त्याचें जीवनहि नाकर्त्या, अपेशी माणसाचें नव्हतें. त्याचें घराणें तंबूवाल्याचें ('खय्याम') होतें; तो स्वतः खगोलगणितांत निष्णात असून त्यानें इराणी पंचांगांत सुधारणा केली होती. तरुणपणाच्या अधीर आकांक्षांमुळें येणाऱ्या निराशेच्याहि तो पलीकडे पोहोंचला होता. सफल आकांक्षांनाहि तो विफल आकांक्षांइतकीच किंमत देतो, हें लक्षांत घेण्यासारखें आहे.

**ज्या ऐहिक आकांक्षेवर माणसें जीव लावून जगत असतात तिची राख होते, किंवा क्वचित् तिला पालवीहि फुटते !—**

**—पण लगेच, रेताड वाळवंटावर पडलेल्या हिमवृष्टीप्रमाणें, तीहि घटका दोन घटका चकाकून वाळून जाते !**

यश आणि अपयश यांत या नश्वर जगांत फरक असा फारच थोडा आहे. अशा स्थितींत भावी आकांक्षा अथवा भावी तैनात यांच्या गोष्टी करणें म्हणजे वास्तवतेचा अभाव होय ! निसर्ग, कला आणि विस्मृति यांचें सुख, आणि तेंहि चालू घडींतच, हा उमर खय्यामचा या सर्व

खग्रास नश्वरतेवर एकच एक इलाज आहे !

इतक्यांतूनहि तो 'कविता' विसरत नाहीं, ही गोष्ट अर्थपूर्ण आहे. निसर्गसौंदर्याइतकाच त्याचा कलानिर्मितीवर व आस्वादावर विश्वास होता हें उघड आहे; आणि तो नसता तर एवढ्या दुर्दम्य दुःखवादावरहि इतकें सुंदर काव्य तो कसें काय करूं शकता ?

पण स्त्रीसहवासाचा उपयोगहि उमर खय्याम प्रायः दुःखविस्मृतीकरितांच करीत आहे, असा भास होतो.

एक तर, त्यानें आपल्या सखीच्या सहवासाच्या सुखाचा उल्लेख केला असला तरी, बाकीच्या सृष्टीच्या वियोगाचे त्यानें जसे हृदयद्रावक उल्लेख केले आहेत, तसे त्या सखीच्या वियोगाचे केलेले नाहींत. जणुं काय नदीतटाक, मदिरा, गुलाब, बुल्बुल या सर्व सरंजामांतीलच 'सखी' हीहि एक वस्तूच होय, अशा सुरांत तो तिचा उल्लेख करतो ! पण नश्वरता आणि जीवनप्रेम यावरील या अमरकाव्यांत उमरनें जिला अमर केली आहे, तिचें या कवीच्या समाजांतील व या कवीच्या जीवनांतील स्थान लक्षांत घेतलें पाहिजे. तो तिला 'सखी' मानीत असला, तरी ती केवळ मद्याचे प्याले भरणारी धंदेवाईक साकी होती हें लक्षांत घेतलें पाहिजे. (आणि आजची स्थिति कोण जाणे; पण खय्यामच्या काळीं तरी हें काम, एखाद्या चंद्रमुखी गोर-काय इराणी पोऱ्याकडेच असे !) पण कांहींहि असलें, तरी सुरई, कविता, मदिरा, आणि नदीकिनारा यांच्यापेक्षां तिच्यामध्यें एक गुण अधिक होता. ती मनुष्य होती; आणि जिवंत सहवास देऊं शकत होती. आणि म्हणूनच या परिणतप्रज्ञ दुःखवादी कवीनें तिजशीं मानवी भवितव्यासंबंधीं कांहीं अंतिम स्वरूपाचे उद्गारहि काढलेले आहेत. क्वचित् तिच्या शरीरवैभवांत विरंगुळा मिळवि-ण्याचाहि मार्ग पत्करला आहे ! एके जागीं तो म्हणतो —

**पण मानवी प्रश्नांनीं अगर दैवी प्रश्नांनीं डोकें पिकविणें बंद करून, आणि भावी स्थितीचें कोडें भावी काळावरच सोपवून,**

**मदिरासंतर्पण करणाऱ्या या सुरूतरु-सदृश सडपातळ साकीच्या केशकलापांत आपल्या हाताचीं बोटें बुडवून टाक कसा !**

पण उमरनें येथें पुरस्कारलेली शृंगारचेष्टाहि, त्याच्या नश्वरतेच्या ध्यासाला शोभण्यासारखीच मर्यादित आणि अलिप्त आहे !

आणि तरीहि फिट्झजेरल्डच्या सुप्रसिद्ध रूपान्तरांतील शेवटच्या शेवटच्या रुबाया नश्वरतेच्या या जगप्रसिद्ध शोकगीताच्या शिरोभागीं शोभण्यासारख्याच आहेत, यांत शंका नाहीं. जीवनाचा हा परम भक्त म्हणतो -

**" हे प्रिये ! आपण दोघे जर भवितव्य तेशीं संगनमत करूं शकलों, आणि हा सम्पूर्ण सृष्टिक्रमच्या क्रमच आपल्या हातांत घेऊं शकलों;**

**तर आपण प्रथमच त्याच्या ठिकऱ्या ठिकऱ्या करून, मग आपल्या मनींच्या इच्छेप्रमाणें त्याला नवा आकार नाहीं का देणार ?**

* * *

मानवी जीवनांत आमूलाग्र बदल व्हावा, असें उमर खय्यामइतक्या तळमळीनें त्याच्या सखीलाहि वाटत असेल का ? मला शंकाच वाटते !

आणि शेवटीं तो म्हणतो—

**पण पहा ! लाडके ! आकाशांत उगवत असलेला चंद्र आपलाच शोध करीत आहे ! यापुढील काळांत, किती वेळां तरी उगवल्यनंतर तो आपल्यापैकीं एकाची शोध करील ! —पण व्यर्थ !**

* * *

**आणि जेव्हां तूं तुझ्या सोनपावलांनीं, हिरवळीवर नक्षत्राप्रमाणें विखुरलेल्या मित्रमंडळींतून वावरशील.**

**आणि तुझ्या त्या सुखद संचारांत अखेर माझ्या नेहमींच्या जागीं येऊन पोहोंचशील, तेव्हां त्या जागेवरहि एक प्याला रिता !.**

* * *

वृद्ध खय्यामच्या या अखेरच्या इच्छेंत व्यक्त झालेली जीवनासक्ति, 'अमरं' आणि 'अजर' म्हणवणाऱ्या देवलोकींच्या वतनदारांनाहि, आमच्या या दुःखी दुनियेचा मोह पाडील, इतकी रमणीय आहे !










कोणी कांहींही म्हणोत, माझी अस्मिता ही अशी आहे. रागांच्या आलापींत कदाचित् दोष उजळणार नाहीं, पण मालविला तरी जाणार नाहीं, इतकी जबरदस्त आशा मीं बाळगून आहें.



# काकांचा कोनवाळी वाडा

न. वि. ऊर्फ काकासाहेब गाडगीळ

वयाची पन्नाशी उलटल्यावर जसजसे अधिक दिवस जातात तसतसा मनुष्य गतजीवनाकडे अधिक अधिक जवळून पहाण्याचा प्रयत्न करतो. म्हणजे भावी काळ त्याला रम्य अगर आकर्षक नसतो असें नाहीं; परंतु उरलेला काळ हा गेलेल्या काळापेक्षां सारखा कमी कमी होत असतो म्हणून जें कमविलें व जें सांचविलें अगर जें गमावलें आणि आंचवलें त्याकडे कांहीं विशिष्ट भावनांनीं तो पहात असतो. जी जाते आहे व येत नाहीं व जी येत आहे पण जात नाहीं अशी जवानी व बुढाई या दोहोंची आठवण त्याच्या मनांत गर्दी करीत असते. गणित सोडवावें व त्याचा ताळा करून बरोबर आहे कीं नाहीं हें पहावें तसेंच थोडेंसें पन्नाशी उलटल्यानंतर होतें. फरक येवढाच कीं, पाटी पुसून, चुकलेली रीत बाजूला सारून नवी रीत पुन्हा स्वीकारून गणिताचें उत्तर बरोबर आणतां येतें; परंतु आयुष्याच्या गणितांत पन्नाशीनंतर पाटी पुसून पुन्हा दुसरी रीत मांडून उदाहरण सोडविण्याइतकी सवड नसते व शक्यताहि क्वचितच असते. पन्नाशीच्या आधी आपल्याच रीतीच्या, स्वतंत्र्याच्या धुंदींत मनुष्य असतो व उत्तरापर्यंत त्याची प्रगति न झाल्यानें आपलें चुकलेंच असें त्याला वाटत नाहीं. आणि जेव्हां वाटतें तेव्हां त्याची पहिली प्रतिक्रिया दुसऱ्या कोणाला तरी दोषी धरण्याकडे होते. पन्नाशीनंतरच 'मी कसा झालों' याचा विचार मनुष्य करूं लागतो आणि तेव्हांहि शें. ९९ माणसें आपण बरोबर होतों हें गृहीत धरून गतगोष्टींचीं शब्दकोडीं जुळवीत असतो. आपण बौद्धिक अगर नैतिक दृष्ट्या अगर आदर्शानें कुठल्यां मुक्कामाहून निघालों व कोठें पोचलों याची तुलना करणारेही क्वचित् असतात. आणि जे तुलना करतात ते यशाचें रहस्य समजतात व अपयशाची मीमांसा करून साध्यांतील आनंदापेक्षां साधनेंतील तन्मयता श्रेष्ठ मानतात.

एकोणीसशें सहा-सात सालचा प्रसंग असावा. त्यावेळीं शनवारवाड्यापुढें बुधवारीं, रविवारीं बाजार भरत असे. उत्तरेला बटाट्या मारुति व दक्षिणेला दिल्ली दरवाजा, पूर्वेस तासगांवकरांचा वाडा व पश्चिमेस बावडेकर, पारसनीस इत्यादिकांचे वाडे,—या येवढ्या जागेंत जगांतील नव्या जुन्या गोष्टी सूक्तासूक्त मार्गानें मिळालेल्या लहानशा भांड्यापासून तों सुशोभित पलंगापर्यंत सर्व गोष्टी तेथें चमकत असत.

त्या वेळच्या माझ्या सवंगड्यांत अनेक मंडळी होती व अनेक गटही होते. पर्वतीच्या तळ्यांत खास "हिंदुस्थान मा बनेलो" बॅट घेऊन क्रिकेटचा खेळ खेळणारा एक गट होता. तर ओंकारेश्वराचे वाळवंटांत स्मशानांतील जळत्या चितांना साक्षी ठेवून आट्यापाट्या आणि हुतूतू क्षणाक्षणाला गडी मारणारे व त्यांना जिवंत करणारा पण एक गट होता. त्याचप्रमाणें कुठें तरी भटकणाऱ्या, स्वाऱ्या-शिकाऱ्या करणाराही गट असे व त्यांत माझे समवयस्क व दूरचे आप्त जे पुढें मोठे नट म्हणून प्रसिद्धीस आले ते म्हणजे वैशंपायन हे एक होते. आणि एका बाजारच्या दिवशीं आम्ही दोघे बाजारांतून भटकत असतां उमद्या घोड्यावरती बसून आलेल्या व बाजारांत हिंडणाऱ्या पलटणींतल्या लोकांसमोर आलो. त्यांतील कांहीं लोक हातामध्यें एक खुणा केलेली काठी घेऊन कांहीं लोकांची उंची मोजीत होते हातांतील दोरीनें छाती मोजीत होते. सहज कुतूहलानें मी पुढें गेलों व माझी उंची मोजा म्हणून सांगूं लागलों. सुदैवानें त्यांतील प्रमुख इसम तुसडा नव्हता त्यानें हिंदींत म्हटलें कीं, "ये पलटन भरती का काम है. घोडेपे बैठना होगा. अभी तुम बच्चे हो—जाओ!" आणि तेथून त्या घोड्यांकडे, पलटणींतल्या पोशाखाकडे व त्यांच्या लटकणाऱ्या तलवारींकडे पहात पहात आम्ही दोघे बाजाराबाहेर पडून बुधवार बागेच्या रस्त्यानें बोलत बोलत चालूं लागलों.

विचारांची कसरत मन नेहमींच करीत असल्यानें त्यांतील बरेंचसें अंगीं लागतें. तीन तास केटींतील पाहिलेला प्रसंग, संस्कारक्षम वयांत ऐकलेल्या कीर्तन-कथा—पुढें काय काय करावें याचें थोडें थोडें पण अस्पष्ट चित्र मन काढत होतें. त्या वयांत कांहीं निश्चयानें ठरविलें जात नाहीं. मला वाटत नाहीं कीं जगांतल्या कुठल्याहि महापुरुषानें त्या वयांत कांहीं कार्यक्रम ठरविला, तो झाला व घडून आला असा इतिहास उपलब्ध नाहीं. इतकेंच नव्हे तर तारुण्याचे आरंभकाळीं जें कांहीं योजिलें, ठरविलें त्याप्रमाणें झालें अगर घडलें, असें भाग्य कोणत्याही व्यक्तीला लाभलें नाहीं. कर्तृत्ववान मनुष्य दान देण्यांत चूक करणार नाहीं व प्रयत्नाचेही फांसे जुळवून जुळवून टाकील. "पण मनाप्रमाणें

दान पडेल इतका अधिकार या अपूर्ण जगांत पूर्णपणें कोणाला मिळालाही नाहीं व मिळणारही नाहीं."

"सद्रासवेंदा सजें। मग अवघेची होती राजे। कांहीं सजे कांहीं न सजे। ऐसें आहे ॥"

आणि म्हणून यशाची खुमारी व अपयशांतील दुःख हीं अनुक्रमे वाढतात व कमी होतात. जगांत जर सर्वत्र निश्चितता असती वर प्रत्येक घटनेचा कार्यकारणभाव लावतां आला असता तर आज द्विविधस्वरूपी असलेला संसार हा सुखमय व कार्व्यमयही झाला असता. मनुष्यानें कल्पावें एक, व्हावें दुसरें. योजावें एक, घडावें दुसरें, असेंच अनुभवाला येतें. अपेक्षा व अनुभव यांचें त्रैराशिक समपेक्षां व्यस्तच अधिक वेळां दिसून येतें. तथापि विवेकी व व्यवहारी मनुष्य अनुभवाचा समजूतदार रीतीनें अन्वय लावून मिळालेलें स्वल्पमिपि बहु मानतो व कांहीं खरें व कांहीं कल्पित समाधान मानतो. आणि यालें मी तरी अपवाद कसा ठरणार? हेंच पहा कीं, त्या दिवशीं जुन्या बाजारांत आम्ही गेलों काय, पलटणभरतीच्या अधिकाऱ्याशीं आमचा संवाद झाला काय, आणि त्यांतून घडलें काय? वर सांगितल्याप्रमाणें आम्ही दोघे बुधवार बागेच्या दिशेनें चाललों मी माझ्या मनांत उत्पन्न होणाऱ्या विचारांत दंग होतों. दत्तु कांहीं तरी बडबडत होता. भोंवतीं भोंवतीं काय चाललें आहे, कोण काय बोलत आहे, याकडे बेदरकारपणें न बघण्याची वृत्ती जी मान्यवर पुढाऱ्यांत असते ती तेव्हांपासूनच माझ्यांत होती. आम्ही दोघेही चालत होतों पण माझें मन भविष्यकाळाच्या रस्त्यावर इतक्या झपाट्यानें चाललें होतें कीं, ती गति मोजण्याचें कांहीं यंत्र निघाल्यास मीं उच्चांकच गांठला असता.

तो बोलत होता पण विचार करीत नव्हता. मी बोलत नव्हतों पण विचार करीत होतों. दोनचार मिनिटांत आम्ही बुधवार बागेजवळ आलों आणि आंत शिरून एका बांकावर बसलों. त्यावेळच्या बुधवार बागेंत दोन तीन तरी गांजेकसांचे अड्डे असावेत आणि सामान्यतः तेथें येणारी मंडळी लहानमोठी जरी असली तरी तें वातावरणच असें होतें कीं, गांजा मर्द आहे असेंच अनुभवास येत असे. मला वाटतें, केवळ तेथल्या वासानेंच माझे विचार तर्र होऊन मनांतल्या मनांत बडबडूं लागले. बांकावर बसतांच माझ्या सवंगड्याला मी म्हणालों, "आपण लहान म्हणून आपल्याला पलटणींत घेत नाहींत. एकदम मोठें होतां आलें असतें तर किती मजा झाली असती?" आणि हा एकदम मोठें होण्याचा विचार पुढील आयुष्याच्या अनेक टप्प्यांवर येऊन गेला. मिळविलेली उंची कधींच समाधान देऊं शकली नाहीं आणि एकदम पुढली मजल गांठण्याची वृत्ति गुणदोषासहित माझी अद्यापही जीवनसाथी आहे. आणि त्या वेळेला क्षणभर असाही विचार येऊन गेला कीं मोठे कपडे घालून आपण पुन्हा त्या पलटणीच्या अधिकाऱ्याकडे जावें. त्याचबरोबर मन मित्र व शत्रू दोन्ही असतें हा अनुभवही आला व आपल्याला मिशा नाहींत याची जाणीव होतांच मोठे कपडे घालून जाण्याची योजना भारत सरकारच्या योजनेप्रमाणें थंडगार झाली. पुनः पुन्हा मला आपल्या लहानपणाचा संताप येई व त्याचबरोबर अपरिहार्य रीतीची व अगतिकत्वाची जाणीव होई. हळूहळू विधायक वृत्तीनें मन कल घेऊं लागलें आणि त्रास न करतां जें प्राप्त असेल त्यांतून पुढील मार्ग काढण्याची मुत्सद्दीगिरीची योजना स्पष्ट होऊं लागली. आणि अगदीं दृढ निश्चयानें मी माझ्या सवंगड्यास म्हणालों कीं, सहासात वर्षें हां हां म्हणतां पूर्ण होतील आणि आपण घोडेस्वारच्या पलटणींत जाऊं." आणि मग त्याच्यासमोर पराक्रमाचीं चित्रें रंगवूं लागलों. थोड्याच वेळांत त्याची वृत्ति बदलत गेली आणि शेवटीं माझ्या भावी आकांक्षांत तो तन्मय झाला. माझ्या विचारांत त्याचे विचार येऊन मिळाले आणि तलवार आणि म्यान याप्रमाणे आम्ही दोघे एकचित्त होऊन बागेच्या बाहेर पडलों. अप्पा बळवंत चौकांत येतांच आमचे मार्ग भिन्न झाले. मी बीराच्या मारुतीच्या रस्त्याला वळलों, तो आपल्या घराकडे वळला. त्यानंतर बहुतकरून ४।६ महिनेच गेले असावेत आणि एक दिवशीं त्याचे वृद्ध वडील माझेकडे त्याचे शोधार्थ आले आणि "एक दिवस त्यांला, दत्तूचा पत्ता नाहीं" असें म्हणूं लागले. मला झुकांडी देऊन त्यानें सैन्यांत प्रवेश केला. मी कल्पना केली, त्यानें साधलें. गुरु घरीं राहिला. शिष्य पुढें गेला. आणि मी मोटा बेचैन झालों. माझ्या मनांत आलें, त्याच्य वडिलांना मला जें घाटलें तें सांगावें आणि आमची मसलत व बेत काय होते याची कल्पना त्यांना द्यावी. पण येवढ्यांत विचार आला, न जाणों, माझ्यावरच ते रागावतील आणि अपराध नसता प्रसाद खावयाचा प्रसंग यायचा. मी कांहीं बोललों नाहीं. मला माहीत नाहीं हें खरें उत्तर देऊनसुद्धां त्यांना तें खोटें वाटलें हें मीं पूर्णपणें जाणलें आणि हा असा हा अनुभव तेव्हांपासूनच माझ्या परिचयाचा होऊं लागला आणि २।४ दिवसांतच कळलें कीं दत्तु महाराष्ट्र नाटक मंडळींत गेला व स्त्रीपार्टी म्हणून त्याची योजना झाली. दिसावयाला तो चांगला होता. त्याचा आवाज चांगला कीं वाईट हें जाणण्याचें ज्ञान मला नव्हतें. किंबहुना, संगीताची व माझी ओळख असूनसुद्धा मैत्री अशी अजूनहि झाली नाहीं. दत्ता नाटकांत गेला व मला भीति वाटूं लागली, कीं, माझ्या मनोरथाचें असेंच नाटक होणार की



अनुक्रमणिका






काय ! मुलांच्या मनोरथांच्या कल्पना उगवतात, उमलतात व मावळतात केव्हां याचा पत्ताही त्यांना लागत नाहीं. दारिद्र्याच्या मनोरथांत बालमृत्यूचें प्रमाण मोठें व ते सर्व अनुभवाचे वहींत नोंदले जातात. बालवयांतील मनोरथ येतात व जातात. आणि हें सर्व जाणिवेनें होत नसल्यानें क्वचित् आलेली खिन्नता मनांत घर करून रहात नाहीं.

कांहीं वर्षें तशींच गेलीं. जुने सवंगडी आकाशांतील ढगांप्रमाणें क्षणभर गर्जून व वर्षून नाहींसे झाले. नवीन आले, आणि या नवीनांत पुण्याला आज परिचित असलेले बापूसाहेब गुते हे होते. नूतन मराठी विद्यालयाच्या शाळेंत असतांना आम्ही एका वर्गांत होतों. चांगलीं ४।५ वर्षें एका वर्गांत होतों. आमची घरेंही एका गल्लींत होतीं. त्यांचे चुलते वकील होते. अनेक वेळां त्यांचेकडे मी जाई आणि त्यांची ती कचेरी, ती अशीलांची गडबड या सर्व गोष्टींचा साहजिकच मनावर परिणाम होई. आमची शाळा अण्णा बळवंताच्या चौकांत असे, पण तीन वाड्यांत आजच्या महाराष्ट्राप्रमाणें ती त्रिखंड विभागली होती. चौकाच्या कोपऱ्यावर ' येथून मुलें जातात-येतात, सबब गाड्या सावकाश चालवाव्यात ' अशी पाटी होती. मॅट्रिकच्या वर्गांत असतांना पुढें काय या प्रश्नाचा जन्म सर्वांच्या आयुष्यांत होतो व त्याच वयांत सामान्यपणें विचार करण्याची वेळ व आवश्यकता सर्वांना वाटूं लागते. आणि मग आमचे विचार वकिलीच्या व्यवसायाकडे वळूं लागले. आणि साधारणतः वकील होऊन गल्लीच्या नाक्याशी ' येथून अशीलें जातात–येतात, सबब गाड्या सावकाश चालवाव्यात ' अशी पाटी लावायाची ही महत्त्वाकांक्षा मनांत दृढमूल झाली. पुढील आयुष्यांत आम्ही दोघेही वकील झालों. दोघांनींही पाट्या लावल्या. अशिलांची गर्दी मात्र भेटेना व पुष्कळ वेळां असा अनुभव आला कीं जी काय गर्दी दिसे ती आळीच्या पलीकडील वकिलांकडे जाणाऱ्या अशीलांचीच असे. जवळचें सोडून दूरच्यांची रमणीयता आकर्षणीय वाटावी हा जगाचा अनुभव येथें तरी कसा विपरीत ठरेल ?

मॅट्रिकच्या वर्गांत व वयांत असतांना वकील होण्याच्या महत्वाकांक्षेचें जें वर वर्णन केलें तें कांहीं अर्थशून्य नाहीं. अशीलांची जरी गर्दी झाली नाहीं तरी या नाहीं त्या कारणासाठीं गर्दीनें माझ्या घराकडे ओढा घ्यायला सुरुवात केली व ती अजूनहि चालूच आहे,—अर्थात् ती गर्दी अगदीं निराळ्या स्वरूपाची आहे. वर सांगितल्याप्रमाणें वकिलीचें ध्येय जरी आकार घेत होतें

तरी जुन्या बाजारांत जन्मास आलेली व बुधवारच्या बागेंत बाळसें धरलेली कल्पना मनांत कोठें तरी दडून बसली असेंच म्हटलें पाहिजे. आणि जेव्हां १९१४ सालीं पहिलें महायुद्ध सुरू झालें त्या वेळीं एकदम मनाच्या रंगमंचकावर ती कल्पना नाचूं लागली आणि १४ सालच्या नोव्हेंबर-डिसेंबरच्या सुमारास मोठ्या ऐटीनें अद्ययावत् पोशाखांत म्हणजे विजार-कोट घालून सैन्यांतील भरती अधिकाऱ्याच्या कचेरींत किल्ला सर केल्याच्या अभिमानानें शिरलों. घरीं निघतांना बुटासहित उंची मोजली होती छातीचें माप घेतलें होतें. डोक्यांत काय याचा विचार केला नव्हता, कारण डोक्यांत कांहीं असणें हें लष्करी खात्यांत अयोग्यतेचें लक्षण समजलें जातें. कोणत्या कारणानें माझी अशी कल्पना झाली होती हें माहीत नाहीं. कचेरींत प्रवेश करतांच आकृति विशेष पाहून माझी समजूत झाली कीं त्या अधिकाऱ्याच्या मनांत माझ्याबद्दल आदर निर्माण झाला असावा. माझ्याकडे त्यानें पाहिलें. माझे घारे डोळे त्यानें न्याहाळले. माझ्या रंगाची छटा त्याच्या मनावर पडली असें वाटलें. उंची मोजली, छाती मोजली. That's all right असें म्हणून समाधानही व्यक्त केलें. मग नांवगांव विचारण्यास सुरुवात केली. आणि जेव्हां जातिविषयक प्रश्न आला त्या वेळीं मीं अर्थात् ब्राह्मण म्हणून सांगितलें. वर्ण हे जन्मसिद्ध नाहींत अशी भावना त्या वेळीं नव्हती व तितकें पुरोगामी ज्ञान प्राप्त होण्याचा क्षण तोंपर्यंत आला नव्हता. त्या अधिकाऱ्यानें जवळच असलेल्या एका पुस्तकांत पाहिलें व "Sorry, young man, you are N. M." मतलब त्याचा असा होता कीं, ब्राह्मण ही जात बिगर लष्करी. आणि हें ऐकून मी चाट झालों. मराठ्यांचा इतिहास आठवला. स्वकुळांतील पूर्वजांचा इतिहास आठवला. पण त्या गोष्टी सांगून कांहीं उपयोग होणार नाहीं एवढें प्रासंगिक ज्ञान मला होतें. आणि मोठ्या दुःखी अंतःकरणानें मनांत चरफडत चरफडत त्या भुईकोट किल्ल्याकडे पहात आणि स्वतःच्या छातीकडे पहात पहात आमच्या बंगल्याकडे परत आलों.

१९१५ ते १७ हा पुण्यांतील काळ म्हणजे राजकीय प्रक्षोभाचा असा होता. स्वराज्यांतील चळवळ लोकमान्यांच्या सिंहनादानें देशांतील दऱ्याखोऱ्यांतून पसरूं लागली होती. अत्याचाराची चळवळ त्या वेळेला तरी महाराष्ट्रांत विझली होती. १७ सालच्या एप्रिलच्या महिन्यांत किर्लोस्कर थिएटरमध्यें लोकमान्य टिळकांनीं तरुणांना आव्हान करून सैन्यांत जाण्यास आदेश दिला, आणि ती सभा संपवून पुन्हा ज्या रस्त्यानें १० वर्षांपूर्वी बुधवार बागेकडे मला नेलें त्या रस्त्यानें मी चालूं लागलों. रस्त्यावर फडफडणाऱ्या जाहिरातींत महाराष्ट्र नाटक मंडळीची मत्स्यगंधा












नाटकाची जाहिरात होती व त्यांत मत्स्यगंधेचें काम वैशंपायन करणार असें लिहिलें होतें. सगळ्या जुन्या स्मृतींना आठवल्या आणि त्या बुधवार बागेंत निश्चित केलेल्या ध्येयानें, हजार हातांनीं मला खुणविलें.

दोनचार आठवड्यांत वानवडीच्या रिक्रूट-भरतीच्या कचेरींत गेलों. मात्र पुणेरी पोषाखांत १५।१७ सालांत जे पुण्याला पाहिले, ऐकिले व ज्यावर विचार केला त्यामध्यें बडोद्याचे कोट व पाटलोणी यांचा त्याग केला होता. वस्त्रें बदललीं होतीं. शरीर व मनीषा पूर्वींचींच होतीं. १४ तें १७ या काळांत उंची वाढली होती, छाती रुंद झाली होती. डोक्यांतील दालन प्रशस्त व पद्धतशीर रीतीनें नटविलें गेलें होतें. सर्व पूर्वींचीच माहिती सांगितली होती. पण पूर्वींचाच अभिप्राय न पडतां पसंतीचा अभिप्राय अधिकाऱ्यानें दिला. त्याच्या आदेशाप्रमाणें दुसरे दिवशीं दवाखान्यांत गेलों व तेथें शरीराची नखशिखांत परीक्षा दिली. उत्तीर्ण झालों. मराठा पलटणींत दाखल झालों. घोडदळाची इच्छा प्रदर्शित केली, पण पायदळ हातीं आलें. मनांत म्हणालों—हें तरी काय थोडें आहे? दोनतीन महिन्यांनीं विश्वविद्यालयाच्या तुकडींत धाडलें. सर्वसामान्य लष्करी शिक्षण मिळालें पण मनामध्यें घोड्यावर बसण्याची रुखरुख राहून गेली. प्रत्यक्ष लढाईवर जाण्याची रुखरुख तशीच राहिली. कारण थोडें फार शिक्षण होऊन आम्ही तयार होतों न होतों तोंच युद्धतहकुबी झाली. तथापि लहानपणची महत्त्वाकांक्षा अल्प प्रमाणांत का होईना सफल झाली. पण त्याचबरोबर घोड्यावर बसून पराक्रमाची तलवार गाजविण्याची रुखरुख कमी झाली नाहीं आणि पुढें कालांतरानें जेव्हां जेव्हां एखादा धनिक आपल्या गंगाजळींतील संपत्तीची मोजदाद करतो त्याप्रमाणें जेव्हां जेव्हां प्रसंगाप्रसंगानें मी गतगोष्टी, गतमहत्त्वाकांक्षा यांची मोजदाद करी त्या त्या वेळीं घोड्यावर बसून युद्धास जाण्याची महत्त्वाकांक्षा उचंबळून येई. आणि कांहीं तरी एक विचाराचें रसायन बनून एक दिवस तरी कीर्तन करावें व युद्धावर जरी नसलें तरी घोड्यावर बसून कोर्टांत जावें, असें मनांत वाटूं लागलें. या तिन्ही महत्त्वाकांक्षा पुऱ्या करण्याबाबत आणि लहानपणीं जीवनापासून आदर्शाचें काढलेलें हें ऋण फेडण्यासाटीं मी प्रयत्न करीत आहें.

दुसऱ्या महायुद्धांत जर कॉंग्रेसनें असहकार केला नसता तर घोडदळांत नसलों तरी मोटार-दळांत सामील झालों असतों व शनवारवाड्यापुढें श्रोत्यांपुढें गरजण्याच्याऐवजीं गोळ्यांचें गर्जन ऐकलें असतें. कीर्तनांतला पूर्वरंग प्रौढ वयांत करूनही अजून आख्यान लावतां आलें नाहीं. तथापि अद्यापीही जीवनाला निरोप देण्यापूर्वी एकदा तरी कीर्तन करण्याची महत्त्वाकांक्षा अजून बाळगून आहें आणि आयुष्यांत मिळविलेल्या प्रतिष्ठेमुळें कांहीं चीज म्हणून दाखविण्याचें धारिष्ट मीं केलें तरी श्रोतृवृंद उठून जाणार नाहीं असा विश्वास आहे. रागाच्या आलापींत कदाचित् दीप उजळणार नाहीं, पण मालविला तरी जाणार नाहीं, इतकी जबरदस्त आशा मी बाळगून आहें. आतां शत्रू भारताला उरला नाहीं व कोणी असला तरी आम्हीं त्याला मित्र मानावयाचें ठरविलें आहे. परंतु अद्यापीही निवडणुकी-सारख्यां रणक्षेत्रें मोकळीं आहेत, व महाराष्ट्रांतील सार्वजनिक सौजन्य कोणाचाही कांहींही मुलाहिजा संघर्षाशिवाय लाभूं देणार नाहीं. घोड्यावर बसून युद्धांत जाण्याची महत्त्वाकांक्षा जरी पार्थिव दृष्ट्या सफल झाली नाहीं तरी जीवनाच्या कुठल्याही क्षेत्रांत मी पाठी चाललों नाहीं. आणि मी घोड्यावर बसून वागतों असें माझे मित्र गौरवानें व विरोधक कुत्सितपणें म्हणतच आहेत.

कोणी कांहींही म्हणोत, माझी अस्मिता ही अशी आहे. वकिलीला मीं सोडलें आहे, तेव्हां घोड्यावर बसून कोर्टांत जाण्याची महत्त्वाकांक्षा संपली असें दिसते. तथापि गेल्या चाळीस-पन्नास वर्षांत आलेल्या अनुभवांवरून कोणी सांगावें, पुन्हा युद्धांत, कोर्टांत, अगर कीर्तनांत—तिन्ही क्षेत्रांत अद्यापि उरलेली महत्त्वाकांक्षा पुरी होणार नाहीं असें कसें सांगू? आणि अद्यापीही माझें मन अगर शरीरही वृद्ध झालें नाहीं, आणि स्तब्ध झालें नाहीं. आणि जुन्या मराठी शिलेदाराप्रमाणें परिस्थितीची ललकारी येतांच कोतवाली घोडा जसा टाप टाप करून फुरफुरतो तसें तें वागेल आणि जेथें कोठें जावयाचें तेथें जाईल आणि तेंही घोड्यावरून.

## चुकीची दुरुस्ती :

पान १२५ वर छापलेल्या **मे. कें. टी. डोंगरे आणि कं.** च्या जाहिरातींत नजरचुकीनें त्यांचा कानपूर येथील पत्ता "बिरहाना रोड, नागपूर" असा पडला तो "**बिरहाना रोड, कानपूर**" असा वाचावा. तसेंच पान ११९ वर किर्लोस्कर ऑईल इंजिनच्या जाहिरातींत "किर्लोस्कर पेटर"चे ठिकाणीं '**किर्लोस्कर डिझेल इंजिन**' असें वाचावें.


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास








वि. वा. शिरवाडकर

असत्य हें भरजरी पोशाख करून मानववस्तींत मिरवतें आणि सत्य मात्र वल्कलें नेसून वनवासांत फिरतें !

माझ्या हातावरील रेषा पाहून एका हौशी ज्योतिष्यानें सांगितलें कीं, तुम्ही फार सज्जन आहांत, परंतु तुम्हांला त्वरित निर्णय घेतां येत नाहीं ! हात पाहण्याचा हौशी उद्योग मीहि स्वतः केव्हां तरी करीत असल्यामुळें त्यांत तथ्य कितपत असतें याची मला साधारण कल्पना आहे. हस्तसामुद्रिकांत हात हा केवळ निमित्ता-पुरता असतो. त्यांतील प्रत्यक्ष फायदा एवढाच कीं हात गुंतून पडल्यामुळें आपलें संपूर्ण विधिलिखित ऐकल्याशिवाय त्या अभागी माणसाला सहसा पळून जातां येत नाहीं! बाकी हाताचा उपयोग फारसा नाहीं. सांग-णाऱ्याची आणि ऐकणाऱ्याची अक्कल या दोहोंतील हें खरोखर द्वंद्व असतें. शरीर व्यायामानें पुष्ट होतें, त्याप्रमाणें ही अक्कलहि अर्थात् सरावानें वाढवितां येते. ती किती वाढूं शकते याचें प्रत्यंतर पाहण्यासाठीं लाल पगड्या घालून मोक्याच्या जागीं बसलेल्या कुडबुड्या जोशांकडे बघावें. एखाद्या खेडुताला समोर घेऊन त्याचें भूत-भविष्य-वर्तमान सांगण्यांत रंगून गेलेले असे एखादे जोशीबुवा दिसले कीं माझे पाय दोन-चार मिनिटें तरी तिथें रेंगाळल्यावांचून रहात नाहींत. फार मनोरंजक दृश्य—आणि श्राव्यहि असतें तें. जागेच्या निवडीपासून यांच्या अकलेच्या करामतीला सुरुवात होते. कोर्ट, पोलिसकचेरी, दवाखाने आणि बाजारबाजार या त्यांच्या हमखास बाजार-पेठा. कोर्टाची पायरी चढणाऱ्या लोकांत वकील हा एकटाच इसम शहाणा असतो. बाकीचे इतरेजन कसला तरी बोजा अंतःकरणावर घेऊन आंत प्रवेश करतात व तो वाढवून बाहेर येतात! यमपुरींतून बाहेर आल्याप्रमाणें मुद्रा भकास झालेली, डोक्यावरील पागोट्याचे पदर सुटून अस्ताव्यस्त झालेले आणि न समजणाऱ्या कायद्याच्या कैफानें डोळे तारवटलेले अशा अवस्थेंत एखादा 'देहाती' कोर्टाच्या फाटकांतून बाहेर पडला, कीं बाहेर बसलेला कुडबुड्या जोशी मांजराच्या सफाईनें त्याच्यावर झडप घालतो. वकिलानें अंगत केलेल्या लूट-मारींतून जें धन खिशांत शिल्लक उरलें असेल तें या जोशीबुवांना अर्पण करून तें अशील घराकडे प्रयाण करतें. जोशीबुवांचें तंत्र फार परिणामकारक असतें. देहाती समोर येऊन उभा राहतांच त्याच्या उजाड चेहऱ्याकडे पाहून ते रहस्यमय आवाजांत सांगतात, "तूं सगळ्यां-साठीं—पण तुझ्यासाठीं कुणी नाहीं!" पाटील-बुवा आपल्या वाढलेल्या दाढीवरून हात फिरवतात—कारण या अनिष्ट काळांत न्हाव्यानें-देखील त्यांना दगा दिलेला असतो—आणि क्षणभर इकडेतिकडे पाहून मटकन खालीं बसतात. अशा रीतीनें या प्रकरणाचा प्रारंभ होऊन त्याचा शेवट वर म्हटल्याप्रमाणें, अशि-लाच्या खिशांत वकिलानें शिल्लक ठेवलेले पैसे जोशाच्या खिशामध्यें जाण्यांत होतो. याप्रमाणें कोर्टकचेरीच्या दारापासून, राजेरजवाड्यांच्या दरबारापर्यंत हा भविष्यकथनाचा धंदा ग्रहांच्या बळापेक्षां अकलेच्या बळावरतीच खरोखर चाललेला असतो!

असें असलें तरी प्रस्तुत हौशी ज्योतिष्यानें ज्या दोन गोष्टी मला सांगितल्या त्यांतील एक तरी मला निःसंशयं मान्य आहे. तुम्हांला त्वरित निर्णय घेतां येत नाहीं! तडकाफडकीं निर्णय घेणें हें मला खरोखरीच मोठें दिव्य वाटतें! सध्याच नव्हे, तर पूर्वीपासून. शाळेंत असतां क्रिकेट खेळण्याचा मला फार शोक असे. सामन्यांत नाहीं तरी रोजच्या प्रॅक्टिसमध्यें दिसणारें फलंदाजीचें कौशल्य, क्रिकेटसाठीं वाटेल तेव्हा वेळ घालवण्याची तयारी, मास्त-रांची मर्जी, कप्तानाचें स्नेहजन्य औदार्य वगैरे कारणांमुळें शाळेच्या प्रातिनिधिक संघामध्येंस अधूनमधून मजल मारीत असें. क्रिकेटचा सामना ही गोष्ट अशी आहे कीं जेथें तडका-फडकीं निर्णय घेणें ही गोष्ट केवळ अत्यावश्यक असते. ज्याला लवकर निर्णय घेतां येत नाहीं त्यानें बुद्धिबळाचा डाव खेळावा, क्रिकेटच्या वाटेला जाऊं नये. एका हातानें डोकें आणि दुसऱ्या हातानें उंट किंवा घोडें घेऊन दहा मिनिटें तुम्ही बुद्धिबळाच्या पटाकडे पहात बसलांत तरी विशेष बिघडत नाहीं. क्रिकेटमध्यें हें चालत नाहीं. गोलंदाजानें टाकलेल्या चेंडूकडे तुम्ही, वामन मल्हारांच्या तत्त्वचिंतक दृष्टीनें पाहूं लागलांत तर दोघांचे दांडा आभार घेऊन तुम्हांला तंबूंत परत यावें लागेल. त्वरित निर्णय घेण्याच्या माझ्या असमर्थतेनें सामन्यांत माझी आणि परिणामतः आमच्या संघाचीहि मोठी दाणादाण उडत असे. बॅटिंगच्या प्रसंगीं चेंडू नेमक्या कोणत्या दिशेनें व गतीनें येत आहे हें मला ठरवितां येत नसे. आणि केव्हां ठरवितां आलें तर, त्याला सीमेपार टोलवून






सहा धावा मिळवण्यात कीं चारांवर तूर्त संतोष मानावा, पुढें जाऊन दावावा कीं मागें होऊन अंगावर घ्याना, वगैरे पर्यायांची मनांतील व्यासपीठावर चर्चा होई आणि तिचा निर्णय लागेपर्यंत चेंडू यष्टिरक्षकाच्या हातांत जाऊन दाखल होई. याहूनहि अधिक दाणादाण होई ती क्षेत्ररक्षणांत. आमच्या कप्तानाला दोन ज्वलन्त चिन्ता डोक्यावरती वहाव्या लागत. एक सामना जिंकावयाचा कसा ही, आणि दुसरी क्षेत्ररक्षणाचे वेळीं माझें काय करायचें ही. मूर्तिमंत प्रश्नचिन्ह होऊन मी त्याच्यासमोर सूचना घेण्यासाठीं उभा राहीं. ॲरेबियन नाइट्समधील जादुगारीप्रमाणें दृश्याला सदृश्य करण्याचें त्याच्यांत कसब असतें तर त्यानें मला निमिषार्धांत 'होत्याचा नव्हता' करून टाकलें असतें. परंतु या साधनेच्या अभावीं मला कुठें तरी ठेवणें त्याला भागच पडतें असे. नको असलेली वस्तु अडगळींत टाकतात त्याप्रमाणें सहसा चेंडू येणार नाहीं अशा जागीं तो मला उभा करी. परंतु नशिबाची गति आणि फलंदाजांची कुशलता अशी कीं चेंडू बाकीच्या दहा लोकांना सोडून, माझ्याकडे भराभर उत्साहानें धावत येत! कप्तानानें माझी जागा बदलली तरी पुन्हा त्याच प्रकाराची वारंवार आवृत्ति होत असे. इतकी कीं, शेवटीं चेंडू हा कोणी तरी जिवंत प्राणी आहे आणि पूर्वजन्मींचे कांहीं ऋणानुबंध असून तो मला वारंवार भेटूं पहात आहे, प्रेमानें मिठी मारूं पहात आहे, असें मला वाटूं लागे! त्यांतहि सरपटते चेंडू आले तर विशेष धास्ती नसे. दोनचार धावांची भर पडून वेरीज वाढेल एवढेंच. परंतु चेंडू, रामाच्या पुष्पक विमानाप्रमाणें आकाशांत उड्डाण करून माझ्याकडे झेप घेऊं लागला म्हणजे मला ब्रह्मांड आठवत असे. त्वरित निर्णयाच्या अभावामुळें, चेंडूची आणि माझी पांचदहा मिनिटें अशी जोरदार झटापट होई कीं प्रेक्षक राहो, पण सारे खेळाडूदेखील स्तिमित होऊन व खेळ विसरून त्या देखाव्याकडे पहात बसत! एवढ्या धामधुमींत चेंडू बहुधा दहावीस फुटांवरती जाऊन जमिनीवर खदखदा हसत पडलेला असायचा!

गोष्टी जितक्या मोठ्या आणि महत्त्वाच्या, तितकी निर्णय घेण्याची सुलभता वाढत जाते असें मला वाटतें. बारीकसारीक व कमी महत्त्वाच्या गोष्टींत निर्णय घेणें मला तरी अधिक जड जातें. आज हवा कशी आहे, म्हणून प्रश्न केला तर चांगली किंवा वाईट म्हणून मोकळे होणारे शीघ्रनिर्णयी पुरुष आपल्याला अनेक आढळतात. मला त्यांच्याबद्दल आदर वाटतो. परंतु त्यांच्या श्रेणींत जाऊन बसणें मात्र सहसा शक्य होत नाहीं. हवा कशी आहे, या प्रश्नाचें निर्णयात्मक उत्तर देतांना मला खिडकी उघडून चारपांच मिनिटें आकाशाकडे पहाण्याची आवश्यकता वाटते. सकाळीं हवा कशी होती, दुपारीं कशी होती, जी होती तिला चांगलें म्हणायचें कीं वाईट वगैरे प्रश्न मनापुढें उभे राहतात. आणि यामुळें साध्या, क्षुल्लक प्रश्नाला गहन व विद्वत्तापूर्ण स्वरूप प्राप्त होतें! हा सिनेमा कसा आहे, तें नाटक कसें आहे, अमुक गोष्ट कशी आहे, तमुक कादंबरी कशी आहे, वगैरे प्रश्नांचीं उत्तरेंहि द्यायला अशींच दुर्घट असतात. अगदींच रद्दी किंवा फारच चांगल्या वर्गांत या गोष्टींचा समावेश होत असल्यास वेगळें. परंतु असें सहसा होत नाहीं. तसें पाहिलें तर मानवी संसारांतील अर्ध्याहून अधिक गोष्टी—बरें, ठीक, चालेल, हरकत नाहीं, विशेष वाईट नाहीं, वगैरे सदरांत पडणाऱ्या असतात. आणि निर्णय मागणाऱ्या लोकांना बहुधा हीं उत्तरें

—म्हणजे खरीं उत्तरें नको असतात. असत्य हें भरजरी पोषाख करून मानववस्तींत मिरवतें आणि सत्य मात्र वल्कलें नेसून वनवासांत फिरतें, अशा आशयाचें एक सुभाषित आहे; त्यांत थोडेंफार सत्य आहे यांत शंका नाहीं. स्वतःचा प्रत्यक्ष संबंध नसेल तेव्हां सत्य सहन करण्याचें औदार्य आपण अनेकदां दाखवूं शकतों. पण प्रत्यक्ष संबंध असेल तर मात्र सत्याला धूम ठोकण्यावांचून गत्यंतर उरत नाहीं. 'स्वयंपाक कसा झाला?' असा प्रश्न गृहिणीनें केला तर तो 'उत्तम झाला' असें उत्तर कोणत्याहि कर्तव्यपरायण व शांतताप्रिय. पतीला देणें आवश्यकच आहे. तेथें विशेष वाईट नाहीं किंवा बरां आहे अशीं उत्तरें देऊन चालायचें नाहीं. एखाद्या गोष्टीबद्दल वा पुस्तकाबद्दल लेखक जेव्हां स्वतःच 'हें कसें काय आहे' म्हणून प्रश्न विचारतो तेव्हां तर फार मर्मभेदक पेंचप्रसंग निर्माण होतो! स्वयंपाकांत स्त्रीचे केवळ हात गुंतलेले असतात. पण लेखनांत लेखकाचें सारें हृदयच गुंतलेलें असतें. आरामखुर्चींत किंवा इतरत्र कोठें बसून मजेनें एखादी कथा वा कविता वाचतांना तिच्या प्रत्येक वाक्यामागें केवढा अग्नि धगधगत असतो याची वाचकास कल्पना येत नाहीं. त्यांत जागतिक कीर्ति मिळविण्याच्या महत्त्वाकांक्षा असतात, प्रणयिनीला दिलेले छुपे संदेश असतात (ती आपलें लिखाण वाचते अशा कल्पनेनें!), प्रतिस्पर्ध्यांविरुद्ध केलेली चढाई अगर वैऱ्यांवर उगवलेला सूड असतो, आईबापांवर केलेली कठोर टीका असते (ते लिखाण वाचणार नाहींत अशा भरवशानें)—एक ना हजार गोष्टी असतात! म्हणून लेखक, विशेषतः नवीन लेखक जेव्हां आपलें कांहीं साहित्य तुमच्या हातांत ठेवतो तेव्हां त्या कागदाच्या रूपानें आपल्या जीवनाचा एक तुकडा काढूनच तो तुमच्याजवळ देत असतो. या जीवनाच्या किंवा अंतःकरणाच्या तुकड्याला तो केवळ अक्षरांच्या रूपानें आणि शाईच्या आधारें प्रकट झाला आहे म्हणून श्रेष्ठ कलेचे धारदार काटे लावीत बसणें खरोखर चूक असतें. अशा प्रसंगीं सत्य बाजूला ठेवणें सोयीचें असतें, आणि सत्य टाळून निर्णय द्यावयाचा असल्यानें तो तातडीनें देणें कांहींसें गैरसोयीचें असतें! परंतु पाटीखालीं चोरून दडपून ठेवलेला कोंबडा पंख फडफडवीत अचानक पाटीसकट उडायला लागावा त्याप्रमाणें कित्येकदां सत्य कांहीं विचित्र मार्गानें बाहेर पडतें. असा एक विचित्र, अवघड प्रसंग मला नेहमीं आवडतो. एका दैनिकांत मी काम करीत होतों आणि त्या दैनिकाच्या चतुरस्र संपादकांना, लेख पाठविणाऱ्या आपल्या परिचितांना किंवा लेखकांना टोलवावें कसें याचें तंत्र चांगलें अवगत होतें. जवळपासच्या गांवीं राहणाऱ्या एका गोरक्षकानें एकदां गोरक्षणावरील एक लांबलचक लेख संपादकांकडे पाठविला. संपादकांनीं लेखाच्या मथळ्यावर आणि विस्तारावर एकदां नजर टाकली आणि नंतर तो सरळ टेबलाजवळच खालीं ठेवलेल्या रद्दीच्या टोपलींत टाकला. कर्मधर्मसंयोग असा कीं मदर लेखाचे लेखक हे कुणीं दैत्त म्हणून कचेरींत हजर झाले. पोस्टानें सकाळीं लेख आला आणि मोटारनें दुपारीं लेखक आले. हे गृहस्थ संपादकांच्या परिचयांतील होते व दोघेहि ब्राह्मणः तरी परस्परांबद्दल आदरभाव बाळगीत होते. संपादक थोडेसे बिचकलेच; परंतु चेहऱ्यावर तसें कांहीं न दाखवितां त्यांनीं त्या गृहस्थांचें आगत-स्वागत करून त्याच्या कार्याची प्रशंसाहि केली.

"माझा लेख आज मिळाला असेलच!" शेवटीं पाहुण्यानें मुद्द्याला हात घातला.

"होय. मिळाला कीं!—छान आहे!" संपादक उत्तरले.

"केव्हां छापतां आहांत?

"पुढच्या आठवड्यांत देतों. का हो—" संपादक नेहमींच्या पद्धतीनुसार माझ्याकडे वळून म्हणाले, "या आठवड्यांत नाहीं जायचा ना?"

"नाहीं!" मीं उत्तर दिलें.

"चालेल!" लेखकमहाशय म्हणाले. आणि नंतर त्यांनीं अकस्मात् एक बॉम्बगोळा टाकला. ते खिशांतून पेन काढून म्हणाले, "जरा हस्तलिखित द्या पाहूं. दोन तीन सुधारणा करायच्या आहेत! लेख छापायचा म्हणजे निर्दोष असायला हवा!"





अनुक्रमणिका







"हो तर!" संपादक प्रसंगावधान ठेवून उद्‌गारले व नंतर मला उद्देशून म्हणाले, "कुठें आहे हो यांचा लेख?"

लेख कुठें आहे याची मला जाणीव होती. परंतु संपादकांना कोणतें उत्तर द्यावें हेतें याचीहि मला कल्पना आली. पेचप्रसंगांतून त्यांची सोडवणूक करणें जरूर होतें.

मी म्हणालों, "सकाळीं ते अमुक कामावरती होते त्यानीं ठेवला आहे कुठें तरी!"

एवढ्यावर हें प्रकरण आटोपलें असतें. परंतु नशिबानें त्या दिवशीं पुरता पाठलाग करायचा ठरविलें असल्यामुळें ते 'अमुक' गृहस्थहि नेमके त्याच वेळीं दारांतून आंत प्रविष्ट झाले. त्यांना या प्रकरणाची पार्श्वभूमि कांहींच माहिती नव्हती. संपादकांसमोर बसलेले गृहस्थ त्या लेखाचे जनक आहेत, हेंहि त्यांना ठाऊक नव्हतें. संपादकांनीं त्यांना नाइलाजानें तो प्रश्न विचारला. "का हो, तो गोरक्षणावरचा लेख कुठें आहे?"

सहसंपादक खुंटीला कोट लावीत उद्‌गारले, "तो सकाळीं तुम्ही रद्दीच्या टोपलींत टाकला कीं!—"

"छे हो! तुम्हीं ठेवला असेल—"

"छे छे, तुम्ही त्या टोपलींत टाकलेला मीं पाहिला डोळ्यांनीं. तो पहा—वरतीच आहे!"

गोरक्षक पडशी घेऊन ताडकन् उठून उभा राहिला व म्हणाला, "द्या तो!"

संपादकांनी विनशर्त माघार घेतली त्यांनीं टोपलींतून लेख काढला व कांहीं आणखी कपोलकल्पित सांगून तो गोरक्षकाच्या हातीं दिला. गोरक्षक लेख घेऊन तडक बाहेर पडले! सर्कशींतील विदूषकाप्रमाणें सत्य अनेकदा असें अनपेक्षित जागेंतून बाहेर पडतें!




परंतु मला सत्यासत्याच्या गहन प्रश्नाचा मीमांसा करावयाची नाहीं. तडकाफडकीं निर्णय घेणें ही गोष्ट सोपी नव्हे हेंच मला सांगायचें आहे. तळहातावरील कोणता तरी उंचवटा कमीजास्त असल्यानें माझी निर्णयशक्ति क्षीण आहे, असें समाधान मला मिळवितां येईल. परंतु मुद्दाम आडवाजूला जाऊन समाधान शोधावें इतकें दुःख या बाबतींत मला कधींच वाटलें नाहीं, सध्याहि वाटत नाहीं. शीघ्रनिर्णयी लोकांबद्दल मला कौतुक वाटतें, परंतु हेवा मात्र मुळींच वाटत नाहीं. त्यांच्या हातावरील ग्रहांचे उंचवटे कितीहि जोरदार असले तरी त्यांचे निर्णय नेहमीं बिनचूक असतात असें मानायचें कारण नाहीं. त्वरित निर्णय घेऊन ते अनेकदां त्वरित पश्चात्तापांत पडतात. लवकर निर्णय न घेणें आणि लवकर निर्णय घेऊन तो वारंवार बदलणें यांत तत्त्वतः कांहीं फरक पडत नाहीं! शीघ्र निर्णय घेण्याची प्रवृत्ति, अपेक्षा व 'समर्थता' कित्येक प्रसंगीं तर केवळ हास्यास्पद वाटते. आपल्या समाजांत रूढ असलेली वधूपरीक्षेची पद्धत ही याचा उत्कृष्ट नमुना होय, एखादी निर्जीव बाजाची पेटी घ्यायची असली तरी मनुष्य दहादां त्या दुकानावरून फेऱ्या मारील, पंचवीसदां ती वाजवून पाहील, पन्नास वेळां घ्यावी न घ्यावी याचा विचार करील. परंतु स्वतःच्या संसाराची स्वामिनी आणतांना इतकाहि विचार करणें या शीघ्रनिर्णयी लोकांना आवश्यक वाटत नाहीं. वधू खालीं मान घालून बसते, वर आढ्याकडे नजर लावून बसतो; तो कांहीं तरी चाचरत विचारतो, ती कांहीं तरी चाचरत उत्तर देते; नंतर धीर धरून तो घसा साफ करतो आणि एखादा प्रश्न स्पष्टपणें विचारतो. तीहि खाक-

रून किंवा खोकून तितक्याच स्पष्टपणे उत्तर देते आणि नंतर दोघेंहि मौनाच्या डोहामध्यें उडी मारतात. अशा या दहावीस मिनिटांच्या उद्योगानंतर उभयतांनीं आपले 'निर्णय' जाहीर करायचे असतात! शीघ्र निर्णयास व्यवहारांत जें अवास्तव महत्त्व प्राप्त झालें आहे त्यांतून या पद्धती निर्माण होतात!

अर्थात् कांहीं ठिकाणीं शीघ्र निर्णय हास्यास्पद असला तरी कित्येक ठिकाणीं तो अपरिहार्य असतो हेंहि मला मान्य आहे. शौर्य या नांवानें ओळखल्या जाणाऱ्या गुणांत, माणसें मारण्याच्या सामर्थ्यापेक्षां त्वरित निर्णय घेण्याच्या सामर्थ्यांचाच अधिक प्रभाव असतो. नेपोलियनचा सारा पराक्रम व पुरुषार्थ या एका सामर्थ्यावर आधारलेला होता असा जाणत्यांचा अभिप्राय आहे. युद्धाच्या ऐन धुमश्चक्रींत पुढील डावपेचांचे निर्णय तो अत्यंत त्वरेनें घेत असे. हात पाठीशीं घेऊन दोनचार फेऱ्या मारल्या कीं मोठमोठ्या मनसुब्यांचे निकाल त्याच्या विचारयंत्रांतून पटापट बाहेर पडत. परंतु सगळींच माणसें नेपोलियन नसतात. आणि जीवन म्हणजे संग्राम हें सुभाषित कितीहि खरें असलें तरी नेपोलियनचा संग्राम आणि आपला संग्राम यांत महदंतर असतें!

आमच्या हौशी ज्योतिष्यानें जी दुसरी गोष्ट सांगितली—तुम्ही सज्जन आहांत ही—तिच्याविषयीं मात्र मी नेहमींच साशंक असतो. किंबहुना, पहिलीची सत्यताच या दुसरीच्या मार्गांत आडवी येत आहे असें मला वाटतें. मी सज्जन आहें कीं दुर्जन आहें याचा निर्णय मला कधींच घेतां येत नाहीं. सकाळीं आठ वाजतां मी सज्जन असेन, तर दुपारीं दोन वाजतां पट्टीच्या खलनायकांत माझी गणना करतां येईल. बहुतेकांची अवस्था अशीच असते अशी माझी कल्पना आहे. ज्यांचें अंतःकरण संपूर्णतः साधुत्वांत बुचकळून काढलें आहे किंवा दुष्टपणाच्या काजळांत अहोरात्र भिजत ठेवलें आहे अशीं माणसें फार थोडीं असतात. शंभरांतील नव्वद माणसें तरी सुजनता आणि दुर्जनता या दोन्हींतील सरहद्दीवरतीच संचार करीत असतात. पुष्कळदां यांत परिस्थितीचा वांटा असतो. तो वेगळाच. माणसापेक्षां अनेकदां त्याची परिस्थितीच सुजन किंवा दुर्जन असते. 'मला पांच हजारांचें वर्षासन असतें तर चांगलें होणें मला परवडलें असतें,' हे व्हॅनिटी फेअरमधील बेकी शार्पचे उद्गार फार खरे आहेत!

अर्थात् हौशी ज्योतिष्यानें माझ्या सौजन्याचें रहस्यशोधन केलें तेव्हां हस्तरेषांच्या ज्ञानापेक्षां त्याचें मानवी स्वभावाचें ज्ञानच अधिक कार्य करीत होतें यांत मला मुळींच शंका नाहीं. ज्युलियस सीझरसारखा स्तुतीच्या कक्षेपलीकडे असलेला असामान्य माणूस—"तुम्हांला स्तुति आवडत नाहीं" या स्तुतीला अखेरीं मोहित झाला! तुमच्या-माझ्यासारख्या सामान्य माणसांना सौजन्याचा निर्वाळा पुरेसा होतो. माझें सौजन्य सुरुवातीलाच जाहीर झाल्यामुळें पुढें पंधरा मिनिटें ज्योतिष्याची चर्पटपंजरी मला निमूटपणें ऐकणें भागच पडलें!

अशा माणसाला तुम्ही काय म्हणाल -
देव, माणूस का

संगीताचे सूर अंतर्मनाचीं दारें आपल्या नाजुक हातांनीं उघडतात काय? तशी कांहीं तरी जादू त्यांच्यांत असावी! नाहीं तर चित्रपटांतलें एक गाणें ऐकतां ऐकतां माझें मन वेड्यासारखें मागच्या आठवणींभोंवतीं कशाला पिंगा घालीत राहिलें असतें?

'बचपनके दिन भुला न देना!'—एक साधी ओळ! पण वर्षानुवर्षें बंद असलेलीं माझ्या अंतर्मनाचीं दारें खाडखाड उघडीत गेली ती! अनिरुद्धाच्या अनेक आठवणी त्या उघड्या दारांतून उडत बाहेर आल्या. जणुं कांहीं आगपेटींत कोंडून ठेवलेलीं फुलपांखरेंच आपले चिमुकले रंगीबेरंगी पंख हलवीत माझ्या मनांत भिरभिरूं लागलीं.

त्या ओळीचें हंसूं आलें मला.—असें काय मोठें काव्य होतें तिच्यांत? विसरूं म्हटलें तरी बालपण कुणाला विसरतां येत नाहीं. मनाला चटका लावून जाणाऱ्या अद्भुतरम्य स्वप्नासारखें असतें तें! हें सांगायला कवी कशाला हवेत?

एकदम दिवे लागले. स्वप्नांतून दचकून जागें व्हावें तसें मला वाटलें. गर्दींत चुकलेल्या लहान मुलासारखी इकडे तिकडे पाहूं लागलें मी! मग माझ्या लक्षांत आलें.—पलीकडेच स्वारी बसली आहे. त्यांच्या अध्यक्षतेखालीं कुठल्या तरी संस्थेच्या मदतीकरितां 'दीदार' चित्रपटाचा खेळ सुरू आहे. आले फसला? होता!





—वि. स. खांडेकर

अनुक्रमणिका







> 'तूं म्हणाला होतास तेंच खरें आहे. मला सुखी करण्याकरितां तूं माझ्याशीं लग्न केलें नाहींस. तुझें माझ्यावर खरेंखुरें—अगदीं निरपेक्ष प्रेम आहे. म्हणून तूं मुद्दाम माझ्यापासून दूर दूर गेलास. मी पृथ्वी आहें. तूं सूर्य आहेस. तुझ्या छातीवर मस्तक ठेवून मी विसावा घ्यायला गेलें असतें तर माझी जळून राख झाली असती!"

सघांपासून मी चित्रपट पाहत होतें ? हो ! पण तो समोरचा नव्हे, मनांतला. पडद्यावरची गोष्ट मला खोटी वाटत होती. या लेखकाला स्त्रीचें हृदयच कळलें नाहीं असें राहून राहून माझ्या मनांत येत होतें. बालमित्राच्या सहवासहूनही विसरून जाणारी नायिका त्यानें रंगविली. पण स्त्रीचें मन असें विसराळू असतें का ? छे ! तें असतें बकुळीच्या फुलासारखें. तें कोमेजतें. काळवंडतें. पण कांहीं केल्या त्याचा सुगंध सर्वस्वीं नाहींसा होत नाहीं. फत्तर असतात तीं पुरुषांचीं मनें. पूजा म्हणून सुंदर सुगंधी फुलांचा तीं स्वीकार करतात. पण दुसरे दिवशीं निर्माल्य म्हणून तीं फुलें फेंकून देतांना त्यांना क्षणभरहि पाझर फुटत नाहीं. अनिरुद्ध असाच—

थेटराबाहेर पडल्यावर गाडींत जाऊन बसतां बसतां तिकडून विचारणें झालें, 'चित्रपट चांगला आहे नाहीं?'

'हो!'

'तो पाहतां पाहतां एक विलक्षण गोष्ट लक्षांत आली माझ्या.'

मुद्रेवर खोटें हसू आणून मीं त्यांच्याकडे पाहिलें.

ते गंभीरपणें म्हणाले, 'न्यायाधीश या नात्यानें एक मोठी चूक होत होती माझ्या हातून आजवर्येत. पुरुष स्त्रीला विसरतो आणि फसवतो असं मानून खटल्यांचे निकाल देत आलों मी. पण स्त्रीसुद्धां पुरुषाला विसरूं शकते, फसवूं शकते हें...'

जात जातीला ओळखते हेंच खरें!

त्यांच्याशीं खूप वाद करून त्यांचें म्हणणें खोडून टाकावें असें क्षणभर मला वाटलें. पण माझ्या मनावरली त्या जुन्या आठवणींची गुंगी अजून उतरली नव्हती.

अनिरुद्धानें केलेली माझी फसवणूक मी त्यांना सांगूं शकले असतें तर?—

तर किती बरें झालें असतें.

पण तें कसें शक्य आहे ?

लग्नापूर्वीचें आपलें प्रेम स्त्री पतीला प्रामाणिकपणानें सांगूं शकेल का ? चित्रपट पाहतांनाची त्यांची रसिकता स्वतःच्या पत्नीची ती कहाणी ऐकतांना कायम राहील का ?

छे ! या जगांत सारेच लपंडाव खेळतात. अनिरुद्धानें मला फसविलें. मीं यांना—

नाहीं, मीं यांना फसविलें नाहीं. मी शरीरानें पवित्र आहें. लग्न झाल्यावर अनिरुद्धाला विसरण्याचा मीं कसोशीनें प्रयत्न केला. एखाद्या विषारी वेलीचीं पाळेंमुळें खणून काढावींत त्याप्रमाणें त्याच्या गोड गोड आठवणी दूर दूर भिरकावून दिल्या मीं !

पण कांहीं कांहीं वेली मोठ्या विचित्र असतात. त्यांचीं पाळेमुळें फार खोल रुजतात. तक्षक जसा बोरांत लपून बसला होता तशा त्यां...

समुद्राच्या लाटांनीं वाळूंतलीं सुंदर अक्षरें धुऊन टाकावींत तशा अनिरुद्धाच्या मधुर स्मृती—

मधुर? सुंदर?

माझें अंग शहारलें. अजून अनिरुद्धाविषयीं आपल्या मनांत कुठें तरी प्रेमाचा अंकुर असावा, या कल्पनेनें मला बेचैन करून सोडलें

गाडींत आम्ही दोघें टेकून बसलों होतों—नदीतीरासारखीं ! एका कोपऱ्यांत ते, दुसऱ्या कोपऱ्यांत मी.

मी हळूच त्यांच्याकडे सरकलें. त्यांचा हात हातांत घेतला. ते माझ्याकडे पाहून नुसते हंसले. त्या स्मितानें गेल्या दोन तपांतल्या किती गोड आठवणी जाग्या झाल्या. तो पहिला स्पर्श—हवाहवासा होणारा पण नकोनकोसा वाटणारा ! त्या क्षणींच मी पहिल्यांदा अनिरुद्धाला पूर्णपणें विसरून गेलें. मालो झाली तेव्हां या यांचा तो प्रेमळ स्पर्श. माझी सारी ग्लानि त्यानें नाहींशी झाली. जणुं कांहीं संजीवनी मिळाली मला. जवळ डॉक्टर उभे होते, नर्स बसत होती. पण यांनीं माझ्या केसांवरून हात फिरविला. त्यांच्या हाताचा कंप माझ्या केसांना जाणवला. विद्युत् झाडें झुडें फुलवीत तो अगदीं आंतल्या मनांत जाऊन लपला. अशोकाच्या बारशा-दिवशींचा यांचा तो वत्सल स्पर्श ! मालीच्या पाठीवरही दोन्ही मुलें कधीं नाहींत. त्यामुळें अशोक झाला तेव्हां माझ्या डोळ्यांत पाणी उभें राहिलें. त्याचें अशोक हें नांव मुद्दामच ठेवलें यांनीं. ते तसें कधीं बोलले नाहींत माझ्यापाशीं, पण कांहीं कांहीं गोष्टी अशा असतात कीं त्यीं बोलण्यापेक्षां न बोलण्यानें अधिक समजतात. त्याचें नांव ठेवल्यानंतर ...ांत त्यांनीं माझ्या पाठीवरून जो हात फिरविला...

ते सारे स्पर्श खडे पहारेकरी होऊन माझ्या मनाभोंवतीं उभे राहिले. या पहारेकऱ्यांचा डोळा चुकवून माझ्या मनांत प्रवेश करण्याची अनिरुद्धाची काय प्राज्ञा होती ?

पण कांहीं कांहीं वेळां दैव आपला सूड घेण्याकरितां लपून टपून बसलेलें असतें. गांधी चौकांत गर्दीमुळें गाडीला थांबावें लागलें. एक घाणेरडें भिकाऱ्याचें पोर हात पसरून भीक मागायला धावत आलें. त्याच्याबरोबर त्याची बहीण होती. ती भसाड्या आवाजांत गाऊं लागली—'बचपनके दिन भुला न देना...'

असा राग आला मला त्या पोरीचा ! सिनेमांतलीं सारीं गाणीं सोडून हेंच गाणें म्हणायला कुणी सांगितलें होतें या कारटीला ? वाटलें, असें खालीं उतरावें, तिच्या झिंज्या धराव्यात आणि तिला पोलिसांच्या ताब्यांत द्यावें ! स्वातंत्र्य मिळाल्यावरसुद्धां भिकाऱ्यांनीं राजरस्त्यावर असें मोकाट फिरावें हें—

माणसाला किती मनें असतात देव जाणे. तें गाणें म्हणणाऱ्या पोरीचा मनांत मला विलक्षण राग आला होता. पण घडलें तें निराळेंच. मीं दोन आणे काढून तिच्या हातावर ठेवले. ही कटकट आतां तरी दूर जाईल अशी आशा होती मला. पण झालें नेमकें उलटें. दोन आण्यांना उन-उनीत चहा प्यायला मिळणार या कल्पनेनंच कीं काय ती मोठमोठ्यानें म्हणूं लागली—'बचपनके दिन भुला न देना !...






काय करावें हें मला समजेना. गाडी पुढें सरकेना; ती गाण्याची ओळ भुतासारखी माझ्या पाठीशीं लागली होती आज. तिच्यें सुगुसुगांनून अनिरुद्ध माझ्याकडे डोकावून पाहत होता. तें घर—ती बाग—तें देऊळ—ती नदी...

एक पोऱ्या ओरडतच गाडीपाशीं आला—'विमान-अपघात—भयंकर अपघात!'

मला बरें वाटलें. एक अंक विकत घेऊन तो अपघात वाचायला सुरुवात केली म्हणजे आपलें बावचळलेलें मन—

मीं पर्स उघडली. इतक्यांत गाडी सुरू झाली. घरीं पोंचेपर्यंत माझें मन उगीचच त्या अपघाताविषयीं विचार करीत होतें. हे एकदोनदां विमानानें दिल्लीला गेले होते. त्याची आठवण झाली. मन चरकलें. यापुढें पुन्हा दिल्लीला जायची पाळी आली तर यांना आगगाडीनेंच पाठविलें पाहिजे असा मनाशीं निश्चय केला मीं!

गाडी बंगल्यापुढें येऊन उभी राहिली. अशोक जागा असता तर गाडीचा आवाज ऐकतांच बाहेर धावत आला असता!

आंत पाऊल टाकतांच रेडिओचा आवाज अगदीं अस्पष्ट असा माझ्या कानांवर पडला. कुठलें तरी गोड गाणें असावें तें. मी थबकलें. कान देऊन ऐकूं लागलें—'बचपनके दिन भुला न देना...'

* *

मीं रागारागानें रेडियो बंद करायला सांगितलें, तेव्हां माली अगदीं चकित झाली. वसकन् तिच्या अंगावर ओरडलें मी—'उठल्यासुटल्या रेडियो लावीत बैस. अभ्यासांत काडीइतकं तरी लक्ष आहे का तुझं?'

जेवतांना त्यांच्याशीं एक शब्दसुद्धां मी बोललें नाहीं. माझ्या मनात एकसारखी डोकावून पहात होतें मी. आजच अनिरुद्धाच्या आठवणींनीं मला इतकें अस्वस्थ करून कां सोडावें? गेल्या वीसपंचवीस वर्षांत त्याला केवळ चारपांच वेळां पाहिलें आपण. पहिल्यांदा तुरुंगांत. मग त्यानें आपल्या त्या कुरूप मामेबहिणीशीं लग्न केलें तेव्हां. बेचाळीसच्या चळवळींत वेष बदलून फिरत होता तो. आगगाडींत भेटला त्या वेळीं तो आपल्याला? आपण प्रथम ओळखलं सुद्धां नाहीं त्याला. मध्यंतरीं त्याची बायको क्षयानं मेली होती. मुलगा आजोळीं शिकत होता. गतवर्षी तो भेटला तेव्हां त्याच्या कपाळाच्या दोन्ही बाजूंचे केस करडे झालेले दिसले. बापाच्या इच्छेप्रमाणें मुलगा वैमानिक झाला होता. तो आनंद त्याच्या मुद्रेवर नाचत होता. तो मला म्हणाला देखील, 'विमल, मीं देशाची सेवा एका तऱ्हेनं केली. आनंद दुसऱ्या तऱ्हेनं करील.'

प्रत्येक भेटींत तो मजशीं अगदीं तुटकपणानें वागला. कधीं आवाजांत गोडवा नाहीं, बोलण्यांत ओलावा नाहीं.

तुरुंगांतल्या भेटींत तो हसत म्हणाला होता, 'विमल, कांहीं लोक तुझ्यासारखे चतुर्भुज होतात. बोहल्यावर चढून कांहीं माझ्यासारखे चतुर्भुज होतात—कायदेभंग करून.'

त्याच्या लग्नाला चांगला अहेर घेऊन गेलें मी. तेव्हां सुद्धां तो असेंच विचित्र बोलला, 'तुझा अहेर मी ठेवून घेतों, विमल. मात्र परत अहेर करायला माझ्यापाशीं पैसे नाहींत. तुझ्या अहेराचा मला फार चांगला उपयोग होईल. मी तुरुंगांत असलों आणि बायकोवर उपासमारीची पाळी आली तर हे उंची कपडे विकून कांहीं दिवस गुजराण करतां येईल तिला.'

तो आगगाडींत भेटला तेव्हां त्याची बायको मेली होती. पण तिच्या आठवणीनें डोळ्यांत पाणी सुद्धां उभें राहिलें नाहीं त्याच्या. उलट हंसत हंसत तो म्हणाला, 'विमल, मृत्यु हा नेहमींच माणसाचा शत्रु असतो असं नाहीं. कधीं कधीं तो मित्रहि होतो. माझ्यासारख्या फकीराची बायको होऊन ती क्षयानं आजारी पडली. फार मोठा गुन्हा होता हा तिचा. त्याबद्दल दोन वर्षे अंथरुणावर पडून शिक्षा भोगली तिनं. त्या शिक्षेतून मृत्यूच काय तो तिची सुटका करायला समर्थ होता. मग अशा मरणाचं सुख मानायचं कीं दुःख?'

एकुलता एक मुलगा त्यानें विमानदलांत घातला. तें ऐकून तर त्याला काळीज आहे कीं नाहीं हेंच मला कळेना. तो म्हणाला, 'कुणी ना कुणी वैमानिक व्हायलाच हवं. त्याशिवाय देशाचं काम चालायचं नाहीं.'

देश!

देशासाठीं त्यानें शिक्षण अर्धवट सोडलें, देशासाठीं बाळपणापासूनच्या

मैत्रिणीचें प्रेम त्यानें झिडकारलें, देशासाठीं तो तुरुंगांत गेला, देशासाठीं प्राणांची पर्वा न करतां बेचाळीसच्या चळवळींत तो लढला. काय मिळालें त्याला हें सारें करून? देश स्वतंत्र झाला तरी हा दरिद्रीच राहिला. कुठें नांव नाहीं, कुठें फोटो नाहीं. अंगावर धड कपडे सुद्धां नाहींत. तरी हा वेडा देशाला आपला मुलगा द्यायला निघाला.

अनिरुद्ध वेडा आहे कीं निर्दय आहे? त्याला कळत नाहीं कीं काळीज नाहीं? छे! वेडा नाहीं तो, शहाण्यांनीं माना डोलवाव्यात असं तो सभांत बोलतो! हजारों लोक त्याच्या भाषणांत रंगून जातात! तो क्रूर आहे, निर्दय आहे, पापाणी आहे. त्याला काळीज नाहीं. म्हणूनच तो दुसऱ्यांच्या भावनांचा नेहमीं असा चोळामोळा करतो!

जेवणें झालीं. स्वयंपाक्यानें घरांतली आवराआवर केली. गडीमाणसें झोंपायला गेलीं. स्वारी कांहीं कोर्टाचें काम करीत बसली होती. मी अंथरुणावर जाऊन पडलें. पण अनिरुद्धाविषयींचे विचार माझी पाठ सोडीनात. दुखावलेला नाग डूख धरून बारा बारा वर्षांनीं चावतो म्हणतात ना? तसा अनिरुद्ध—

त्यानें मला दुखावलें होतें. दंश धरून मीं त्याचा सूड घ्यायला हवा होता. तें राहिलें बाजूला! उलट तोच—

कांहीं केल्या झोंप येईना. ते लवकर झोंपायला आले तर मोकाट सुटलेलीं हीं मनांतलीं जनावरें पिंजऱ्यांत घालतां येतील. म्हणून मी बाहेरच्या खोलींत गेलें. स्वारी अगदीं गढून गेली होती कामांत. माझी चाहूल ऐकतांच मागें वळून ते म्हणाले, 'राणीसाहेबांचा काय हुकूम आहे?'

'कर्फ्यू ऑर्डर पुकारणार आहें मी!'

'ठीक आहे. मी कायदेभंग करीन.'

'न्यायाधीश कधीं कायदेभंग करीत नाहींत!'

'मग कोण करतात? गुन्हेगार?'

'अं हं. देशभक्त.'

ज्या चक्रांतून बाहेर पडण्याकरितां मी धडपडत होतें त्यांत या उत्तरानें मी अधिकच अडकलें. त्यांच्या खांद्यावर हात ठेवून मीं म्हटलें, 'आज मला बरं वाटत नाहीं.'

'डॉक्टरांना फोन करूं का?'

'अगदीं हाताच्या अंतरावर असलेल्या डॉक्टरलासुद्धां हल्लीं फोन करावा लागतो का? असेल बाई! यंत्रयुग आहे ना हें!'

ते मनःपूर्वक हंसले. माझ्या मनांत आलें, पुरुषांच्या बुद्धीला लवकर गुदगुल्या होतात. पण त्यांच्या भावना मात्र—त्यांच्या खांद्यावर मस्तक ठेवून स्वस्थ झोंपी जावंसं वाटत होतं मला. पण ही माझी साधी इच्छा अजून यांना कशी कळत नाहीं?

टेबलावर पसरलेल्या लठ्ठ लठ्ठ पुस्तकांकडे आणि कागदांकडे पहात ते म्हणाले, 'आजचा तासभर तरी बसलंच पाहिजे मला. मोठी किचकट आहे ही केस. शेक्सपिअरला हीं नाटकं लिहायला दिलीं तरी या नाटकांत नायक कुणाला करावं आणि प्रतिनायक कुणाशी म्हणावं हें त्याला कळायचं नाहीं."

त्यांनीं एक लठ्ठ पुस्तक उघडून निळीतांबडी पेन्सिल हातांत घेतली. मी मुकाट्यानें परतलें.

ते येईपर्यंत काय करायचें? अशोकपाशीं जाऊन पडावें असें मनांत आलें. पलीकडल्या खोलींतल्या त्याच्या अंथरुणापाशीं जाऊन मी उभी राहिलें. मच्छरदाणी वर केली. गुलाम झोंपेत हंसत होता. त्याचें तें हंसणें पाहतांच माझ्या मनांतल्या काळ्या सावल्या उजळल्या.

इतक्यांत माझें लक्ष त्याच्या दोन्ही बाजूंना पडलेल्या विमानांकडे गेलें. हल्लीं हा नाद लागला होता त्याला. तऱ्हेतऱ्हेचीं विमानें त्यांच्याकडून हट्ट करून घेतलीं होतीं त्यानें. त्यांतलींच तीनचार त्याच्या भवतीं नीजलीं पडलीं होतीं.

आईचें मन मोठें वाईट असतें. जिथें दुसऱ्याला शंका येणार नाहीं तिथें तिला ती येते. अशोक अजून खूप खेळतो. लोळतां लोळतां यांतलें एखादें विमान त्याला टोंचलें तर...

मीं भरभर तीं विमानें उचललीं, आणि त्याच्या पलंगाखालीं ठेवलीं. पण तीं उचलतांना मला संध्याकाळीं गांधीचौकांत ओरडणाऱ्या त्या पोराची आठवण झाली—'विमानाचा मोठा अपघात!' अशोकपाशीं पडलें










म्हणून झों। थोडीच येणार होती? मी आपल्या खोलींत आलें. यांच्या उशाजवळच्या टेबलावर संध्याकाळचीं दोन वर्तमानपत्रें पडलीं होतीं. तीं उचललीं. दोन्हींतहि पहिल्याच पानावर त्या अपघाताची बातमी ठळक अक्षरांत छापली होती. मी वाचूं लागलें—

**सुप्रसिद्ध देशभक्त अनिरुद्ध—**

पुढचीं अक्षरेंच मला दिसेनात. अनिरुद्ध कुठें विमानानें गेला होता? छे! तो तर हल्लीं लोकांच्या मदतीनें खेडेगावातले लहान लहान रस्ते तयार करण्यासाठीं इकडे तिकडे फिरत असतो. तो विमानांतून कुठें जाणार? आणि जायचें असलें तरी तिकिटाचे पैसे त्याला कोण देणार?

मी पुढला मजकूर वाचूं लागलें. कुणी तरी फार फार मोठा धोंडा डोक्यांत घालावा तसें मला झालें. अनिरुद्धाचा मुलगा आनंद विमान चालवितांना—

अर्धा तास मी टेबलावर फडफडत असलेल्या त्या वर्तमानपत्रांकडे पाहत अंथरुणावर पडलें होतें. रडावेंसें वाटत होतें; पण रडूं येत नव्हतें. आनंदाला मीं कधीं पाहिलें नव्हते. त्याच्या जागीं मोठा झालेला अशोक मला दिसत होता. मोडकेंतोडकें विमान, त्याच्यापाशीं अर्धवट जळून गेलेला—

अनिरुद्ध यावेळीं कुठें असेल? काय करीत असेल? हा घाव त्यानें कसा सोसला असेल?

क्षणभर मला वाटलें, यांना म्हणावें, 'आपली गाडी घेऊन असेंच्या असें आपण अनिरुद्ध असेल तिथं जाऊं या. त्याला दुसरं कुणी कुणी नाहीं. लहानपणीं तो माझ्यापाशीं आपलीं सारीं दुःखं सांगत असे. आतांहि—'

छे! त्यांना माझी ही भावना कशी कळेल? मी त्यांची पत्नी आहें. माली व अशोक यांची आई आहें. सारा संसार सोडून भर मध्यरात्रीं एका बालमित्राचें सांत्वन करण्याकरितां धांवत जाणाऱ्या माझ्यासारख्या प्रौढ स्त्रीकडे समाज सरळ दृष्टीनें पाहील का?

दिवा विझून कंदिलाची कांच तडकावी तशी माझ्या मनाची स्थिति होऊं लागली.

पण लगेच सोसाट्याचा वारा आला. दिवा विझून गेला.

लग्नाआधींचं माझं दुःख अनिरुद्धाला कळलं नाहीं. 'विमल, तुझ्या सुखासाठींच मी तुझ्याशीं लग्न करीत नाहीं,' असे मानभावीपणाचे उद्गार काढतांना सुद्धां त्याचा स्वर गहिंवरला नाहीं, पापण्या पाणावल्या नाहींत. मी त्याच्याबरोबर पळून जायला देखील तयार होतें. पण—

अशा मनुष्याचा एकुलता एक मुलगा गेला म्हणून कितीसें वाईट वाटणार आहे? प्रत्येक दुःखावर तत्त्वज्ञानाचं औषध तयार असतं अशा लोकांपाशीं. माझ्या प्रेमाचा अव्हेर करतांना किती सहज तो म्हणाला होता, 'विमल, चिखलाशिवाय कमळ उगवत नाहीं, तसं शरीरसुखाशिवाय प्रेम करतां येत नाहीं असं थोडंच आहे?'

ढोंगी कुठचा! सावत्र भाई लहानपणीं ताडताड बोलायला लागली कीं आमच्या घरी यायचा, पत्ते खेळायला म्हणून मला माडीवर घेऊन जायचा, आणि माझे दोन्ही हात हातांत घेऊन ते घट्ट दाबीत म्हणायचा, 'पळालं, माझं सारं सारं दुःख पळून गेलं.' एकदां तापानं तो खूप [illegible]री होता तो. मी जवळ जाऊन बसलें. त्याच्या रसरसलेल्या कपाळावर हात ठेवला. लगेच तो म्हणाला, 'कोलनवॉटरच्या पट्टीपेक्षां सुद्धां बरं वाटतंय आतां.' कॉलेजांतून परत आला म्हणजे सुट्टींत तो मला गणित शिकवायचा. कंटाळा आला कीं मी आळसावून पडल्या पडल्या उदाहरणें करीं. तोहि माझ्याजवळ तसाच आळसावून लोळत असे. एखादे वेळीं आमच्या पायांना एकमेकांचा स्पर्श होई. दोघांना तो सुखकर वाटे. एकदां तर त्यानें माझ्या पोटरीवर हळूच आपला पाय ठेवला. त्यानें पाय ठेवला कीं मींच त्याच्या पोटरीवर पोटरी घांसली...

बी. ए. च्या वर्गांत असतांना देवीला प्रदक्षिणा घालतांना मागच्या बाजूच्या अंधारांत त्यानें माझें घेतलेलें चुंबन...कॉलेज सोडावें कीं नाहीं या विचारानें चार दिवस त्यानें तळमळत काढले होते. बागेंत, नदीवर सगळी-कडे भटकून आला तो! मग शेवटीं मला म्हणाला, 'आतां देवालाच कौल लावायला हवा. चल माझ्याबरोबर देवळांत.'

तें चुंबन घेऊन वर्ष झालें नाहीं तोंच तो मला उपदेश करायला लागला, 'शरीरसुखाशिवाय प्रेम करतां येत नाहीं असं थोडंच आहे?' जणुं कांहीं हें सारें शरीरसुख नव्हतेंच! त्याला संसारसुख नको होतें तर पुढें त्या कुरूप मामेबहिणीशीं कशाला लग्न केलें त्यानें? दरिद्री देशभक्ताला सुंदर मुलगी कुणी देणार नाहीं अशी खात्री झाली म्हणूनच ना? मग आवट

द्राक्षें गोड आहेत असें दाखविण्याकरितां त्याचे मित्र लोकांना सांगू लागले.

अनिरुद्धाच्या मामेबहिणीचं लग्न जुळत नव्हतं. तिचे वडील मोठ्या कर्जांत होते. म्हणून लग्न न करायचा विचार सोडून देऊन तो बोहल्यावर उभा राहिला! क्षणभरसुद्धां खरें वाटलें नाहीं हें कधीं मला.

वाऱ्यानें वर्तमानपत्रें अकिंचन फडफडलीं तेव्हां विचारांच्या या धारेंतून मी बाहेर आलें. मला वाटलें, बरें झालें. मला फसविल्याबद्दल, माझें प्रेम पायदळीं तुडविल्याबद्दल त्याला शिक्षा व्हायचीच हवी होती. आजपर्यंत हा दुसऱ्याला दुःख देत गेला. दुःख किती कडू असतं हें आयुष्यांत एकदां तरी कळायला हवं त्याला.

अनिरुद्धाचा एकुलता एक मुलगा अपघातांत मेला हें बरें झालें असें मी म्हणत होतें.

मी ! त्याची बाळपणची मैत्रीण ! त्याची कॉलेजच्या दिवसांतली, कांहीं दिवसांची का होईना, प्रेयसी ! आमचें प्रेम आम्हीं बोलून दाखविलें नव्हतें. पण तें आम्हां दोघांना कळत होतें. चोवीस तास जाणवत होतें. कळीचा कधीं सुगंध येत नाहीं. पण तो तिच्यांतच लपलेला असतो. तसें होतें तें प्रेम..पण त्या कळीचा अनिरुद्धानें कठोर हातानें चोळामोळा केला. लहानपणच्या जखमेची मात्र रहावी तसा तो प्रेमभंग अजून माझ्या मनाला अस्वस्थ करून सोडतो. आयुष्यांत कांहीं तरी चुकल्याचुकल्यासारखं वाटतं. बंगल्यात राहून, पतिसुख मिळून, मुलेंबाळें होऊन सुद्धां आपलें कांहीं तरी हरवलें आहे अशी रुखरुख अचानक माझें मन अस्वस्थ करून सोडते. म्हणूनच तर 'बचपनके दिन भुला न देना' हें गाणें संध्याकाळीं त्या चित्रपटांत सुरू होतांच मी बेचैन झालें.

माझें अनिरुद्धावर अजून इतकें प्रेम आहे ? मग झालें तें बरें झालें असा विचार क्षणापूर्वी माझ्या मनांत कसा आला ? बागेंत खूप खूप फुलें असतात, तसेच खूप खूप साप असतात. माणसाचें मनहि तसेंच आहे कां ? प्रेम आणि द्वेष या दोन्ही भावना तिथें बरोबरीनें राहतात काय ? कीं मनुष्य केवळ स्वतःवरच प्रेम करतो ?

कांहीं सुचेनासें झालें मला. थोडें इकडेतिकडे केलें म्हणजे मनांतलें तें विचित्र वादळ शांत होईल म्हणून मी मुलांच्या खोलींत गेलें. मालीची मच्छरदाणी वर करून पाहिलें. तीहि झोपेंत हंसत होती. तिच्या उशाशीं कुठल्या तरी चित्रपटमासिकाचा अंक पडला होता. तो वाचतां वाचतां तिला झोंप आली असावी. ती तो अंक तसाच उघडा टाकून झोंपीं गेली होती. तिच्या उशाजवळचा दिवा अचूक लावून मीं तो अंक पाहिला. कुठल्या तरी चित्रपटाचें परीक्षण होतें तें. 'सुंदर प्रेमकथा' असे ठळक शब्द वर दिसत होते. खालच्या चित्रांतली नायिका नायकाला अगदीं खेटून बसली होती. मी जशी नदीवर अनिरुद्धाच्या जवळ बसत असें तशी पाण्यांत पाय सोडून. मी मालीकडे पाहिलें. तेवढीच होतें मी तेव्हां अशीच कविता, कथा, कादंबऱ्या वाचायची चटक होती मला. अनिरुद्धावरून प्राण ओवाळून टाकले असते मीं तेव्हां. म्हणून तर वडिलांनीं चांगलें स्थळ पाहून लग्न ठरविलें तेव्हां मीं त्याला लिहिलें, 'माझं प्रेम तुझ्यावर आहे. तूं म्हणशील तर तुझ्याबरोबर पळून सुद्धां जायला तयार आहें मी. कुठेंहि. अगदीं दूर दूर. माधव ज्यूलियनांनीं 'तेथें चल राणी' या कवितेंत वर्णन केलं आहे ना ? तशीं आपण राहूं.'

अनिरुद्धानें तें कबूल केलें असतें तर ?

तर आज मी कुठें असतें ? या सुंदर बंगल्याऐवजीं एखाद्या दोन खोल्यांच्या मोडक्यातोडक्या घरांत. नवऱ्यानें हट्टानें वैमानिक केलेल्या मुलाच्या अपघाती मरणानें विव्हळ होऊन—



## निळ्या सांजसावल्या—

तरळल्या पावलीं निळ्या सांजसावल्या
कोनांतुन पुढती हळू हळू सरकल्या
जाहला सांद्र काळोख तरूंच्या तळीं
चुळबुळलें कांहीं काळवंडल्या जळीं

सदनांत उजळले क्षीण पिवळसर दिवे
क्षण चमकुन मिटले झाडींतुन काजवे
कटुमधुर उग्रसा [illegible]सवें घेउनी
झुळझुळता वारा ये लिम्बावरतुनी

अंगणीं उभी मी सन्निध वृन्दावन
वाढल्या तमाचें भंवतीं संमोहन
गगनांत झळकली ठळक निळी चांदणी
मी उभी तिजकडे निश्चल टक लावुनी

बाल्याचे सुखकर दिन मागें राहिले
प्रौढत्व न अजुनी पुरतें मनिं बाणलें
मधुसुंदर शैशव स्वप्नांसह संपलें
भवितव्य काय तें नच अजुनी उमगलें

मी एकाकी या सीमारेषेवरी—
दाटलें अनामिक भय माझ्या अंतरीं
प्राजक्तफुलापरि मन हळवें जाहलें
डबडबुन लोचनीं तुडुंब भरलीं जळें

—शान्ता ज. शेळके

अनिरुद्धानें माझ्या प्रेमाचा स्वीकार केला नाहीं ही किती चांगली गोष्ट झाली. नाहीं तर—

माली झोपेंत कांहीं तरी पुटपुटली. तिच्याएवढी होतें तेव्हां मी सुद्धां अशीच झोंपेंत बडबडत असें. केव्हां केव्हां अनिरुद्धाला हाका मारीत असें.

माझ्या लेखीं आज तो पत्थर झाला आहे. पण मी मालीएवढी होतें तेव्हां माझा देव होता तो. देव दगड ठरला म्हणून कांहीं कुणी त्याला लाथाडत नाहीं !

तो आपली कधींच चौकशी करीत नाहीं. चुकून गांवांत आला तरी आपल्याला भेटत नाहीं. पण आपण त्याला पत्र पाठवूं. तूं मला विसरून गेलास तरी मी तुला विसरलें नाहीं हें त्याला दाखवूं. स्त्रीचें हृदय आणि पुरुषाचें हृदय यांच्यांत दोन ध्रुवांचें अंतर असतें हें त्याला पटवूं.

रात्रभर मोठीं विचित्र स्वप्नें पडलीं मला. अनिरुद्धाच्या हातांतल्या चरख्याचें एकदम विमान झालें. तें त्याला कुठें घेऊन चाललें आहे तें कळेना. मी जमिनीवरून त्या विमानाचा पाठलाग करीत सुटलें. मी कुठें जात आहें याची मला शुद्धबुद्ध नव्हती. एकदम एका दरींत कोसळून पडलें मी. माझ्या अंगाच्या चिंधड्या चिंधड्या झाल्या. मी किंकाळी फोडली. कुणी तरी नाजुक हातांनीं माझ्या जखमा बांधीत होतें.

मीं डोळे उघडून पाहिलें. माझ्या पलंगापाशीं स्वारी येऊन उभी राहिली होती. माझ्या अंगावरून हात फिरवीत होती.

मी जागी झालेली पाहतांच ते म्हणाले, 'किती भ्यालीस तूं स्वप्नांत !'

मी म्हणालें, 'फार भयंकर स्वप्न पडलं मला. तो 'दीदार' चित्रांतला आंधळा नायक आहे ना ?'

'हूं !'

'तो रागानं त्या नायिकेचे डोळे फोडतो. त्या डोळ्यांतून रक्ताच्या चिळकांड्या.'

माझें मस्तक हातांत धरून तें कौतुकानें हलवीत ते उद्गारले, 'वेडी कुठली ! अजून परकरी पोर आहेस तूं. पऱ्यांच्या गोष्टींत रमणारी !'

पऱ्यांच्या गोष्टींत रमण्याइतकें माझें वय असतें तर किती बरें झालें असतें !

दुसरे दिवशीं सकाळीं चहा घेऊन अनिरुद्धाला सांत्वनाचें पत्र लिहायला मी बसलें. कितीं तरी वेळ काय लिहावें तेंच कळेना !

देवानें जगांत मरण कशाला निर्माण केलें असावें बरें ?

या प्रश्नानें माझें मलाच हंसूं आलें. जन्म ही जीवनाच्या नाण्याची एक बाजू आहे आणि मरण ही याच नाण्याची दुसरी बाजू आहे, हें गडकऱ्यांचें का दुसऱ्या कुणाचें वाक्य आहे ना ? तें आठवलें. सुभाषित म्हणून तें चांगलें असेल ! पण त्यानें कांहीं माझें समाधान होईना.

चारदोन ओळी लिहाव्यात, तो कागद फाडून टाकावा, पुन्हा कांहीं तरी लिहावें, तें आवडलें नाहीं म्हणून फिरून फाडावें, असें माझें चाललें होतें. दुःख मुकें असतें हेंच खरें ! तें दृष्टींतून किंवा स्पर्शांतून सांगतां येतें. पण शब्दांतून कांहीं प्रकट करतां येत नाहीं.

अस्वस्थ मनानें मी उठलें. सकाळचीं वर्तमानपत्रें चाळावीत, खालचीं सगळीं कामें पहावींत आणि मग दुपारीं स्वस्थपणानें पत्र लिहायला बसावें असें मीं ठरविलें.

कालच्या समारंभाची हकीगत इथल्या वर्तमानपत्रानें कशी दिली आहे हें पहायची उत्सुकता मनांत होती. म्हणून मीं तेंच पहिल्यांदा उचललें. स्वारीच्या जोडीनें माझाहि उल्लेख केला होता त्यांत. तो पाहून मला बरें वाटलें. पण त्याच्याच खालीं छापलेली बातमी—

—इथून सात आठ मैलांवर असलेल्या एका खेड्याचा रस्ता गांवकरी बांधणार होते. त्यासाठीं अनिरुद्ध आज तिथें येणार होता.

माझ्या डोळ्यांवर माझा विश्वास बसेना. परवांच्या दिवशीं मुलगा विमानाच्या अपघातांत दगावला. असें असतांना अनिरुद्ध इथें कसा येईल ? ही बातमी फार शिळी असली पाहिजे. दुपारीं त्या वर्तमानपत्राच्या कचेरींत फोन करून विचारावें आणि मग अनिरुद्धाला पत्र पाठवावें.

पण दैव आणि माणूस यांच्यांत छत्तिसाचा आंकडा असतो, हा अनुभव चार-पांच तासांतच मला आला. अशोकाच्या पोटांत दुखूं लागलें. गेलें वर्षभर अधूनमधून त्याला असा त्रास होई. पण आज तो अतिशय अस्वस्थ झाला. दुपारीं दोन तीन वाजतां रडून ओरडून त्यानें मला जीव नकोसा करून सोडला. यांना कोर्टांत बोलवायला पाठवावें कीं काय असें मला झालें. मालीचें मॅट्रिकचें वर्ष होतें. म्हणून तिला घरीं ठेवून घेतलें नव्हतें मीं. शिवाय कांहीं झालें तरी पोरवय होतें तिचें. ती कसला मला धीर देणार ? नोकरांना तोटा नव्हता. ते सारे बिचारे धावपळ करीत होते. पण माझेंच मन कसें उडाल्यासारखें झालें. इकडच्या होमिओपाथीवर मोठा विश्वास. त्या डॉक्टरांना बोलावून आणलें. त्यांनीं औषध दिलें. पण पोराची बेचैनी कमी होईना. त्याचीं सारीं आवडतीं विमानें कपाटांतून काढून त्याच्या अंथरुणाभोंवतीं पसरून ठेवलीं. अधूनमधून तो त्यांतलें एखादें हातांत घेऊन स्वस्थ पडे. पण मध्येंच कळ येई. मग तो एकदम ओरडे. अगदीं गुरासारखा !

संध्याकाळीं स्वारी कोर्टांतून आल्यावर गांवांतल्या बड्या डॉक्टरांना











बोलावून आणलें. त्यांनीं हा त्रास अपेंडिसायटिसचा आहे असं निदान केलें. तातडीनें शस्त्रक्रिया करा असा सल्ला देऊन ते निघून गेले.

मला त्रिभुवन आठवलें. तान्हेपणीं न्हायला घालतांना माझ्या राजाच्या अंगाला माझेंच नख लागणार नाहीं ना अशी भीति मला वाटे. आणि आतां माझ्या बाळाचें पोट डॉक्टर फाडणार — अग आई ग!

खोलींत जाऊन मीं दार लावून घेतलें आणि उशींत डोकं खुपसून ढसढसां रडलें. पण दुदैंव कधींच कुणाच्या अश्रूंची पर्वा करीत नाहीं. मी बाहेर आलें तरी अशोक तळमळतच होता. इकडची स्वारी आमच्या होमिओपाथिक डॉक्टरांना घेऊन विचार करीत बसली होती. ते डॉक्टर तावातावानें म्हणत होते, 'हा अपेंडिसायटिस नाहीं हें मी तुम्हांला प्रतिज्ञेवर सांगतों. इतक्याउप्पर तुम्हांला पोराचं पोट चिरायचं असेल—'

पोट चिरायचें? ते शब्द ऐकवेनात मला. मी भ्यालेल्या सशाच्या पिलासारखी खालीं पळालें. न्हाणीघरांत गेलें. खूप खूप थंड पाणी डोक्यावर थापलें. तेव्हां कुठें मला थोडें बरें वाटलें.

उगीच घाईनें शस्त्रक्रिया करायची नाहीं असा स्वारीनें निर्णय घेतला. तो ऐकून माझ्या एका मनाला आनंद झाला. पण दुसरें मन राहून राहून म्हणत होतें, 'त्या बड्या डॉक्टरांचंच म्हणणं खरं असलं तर?' रात्रीच्या शांत वेळीं घुबडाच्या घूत्कारानें माणूस भिऊन जावें तशी या वाक्यानें माझी स्थिति होत होती. पण मला माझें दुःख कुणाला सांगतां येईना. कुणाच्या गळ्यांत गळा घालून रडतां येईना. मी रडूं लागलें तर तिकडचा धीर जाईल म्हणून सारीं आसवें आंतल्या आंत मीं गिळलीं. किती कडू होतीं तीं!

पुढचे चार पांच दिवस केव्हां उगवले आणि केव्हां मावळले तें माझें मलाच कळलें नाहीं. साऱ्या सावल्यांत मरणाची सावली फार भयंकर असते. ती विलक्षण वेडीवाकडी दिसते. एखाद्या भुतासारखी माणसाला खायला येते. त्या काळ्याकुट्ट सावलींत मीं हे पांच दिवस काढले. कसे ते देवाला ठाऊक!

दुसरे दिवशीं अनिरुद्धाला पत्र लिहायची आठवण मला झाली होती. पण त्याच वेळीं गांवचें वर्तमानपत्र हातांत पडलें. ठरल्याप्रमाणें तो त्या खेडेगांवीं आला होता. त्यानें त्या शिबिराचें उद्घाटन केलें होतें. त्याच्या त्या साऱ्या भाषणांत दुःखाची पुसट छटा सुद्धां नव्हती!

मीं तें वर्तमानपत्र दूर फेंकून दिलें. अनिरुद्ध माणूस नसून राक्षस आहे, असें मला वाटलें.

चौथ्या दिवशीं आमच्या महिलामंडळाच्या कांहीं बायकांनीं तें शिबिर पहायला जायचें ठरविलें. तिथें जायचें, दोन पाट्या माती टाकायची, एखादा फोटो काढून घ्यायचा आणि लगेच परतायचें, एवढाच कार्यक्रम होता त्यांचा! अडीच-तीन तासांत आपण परत येऊं म्हणून साऱ्या मैत्रिणींनीं मला यायचा आग्रह केला. चोवीस तास अशोकपाशीं मी होती. त्याच्या प्रकृतींत कांहींच फरक नसल्यामुळें अधिक काळजी करण्यासारखें कांहीं नव्हतें. पण घर सोडून तीन तास बाहेर रहायचें माझ्या जिवावर आलें. मध्येंच अशोकानें 'आई कुठं आहे" म्हणून विचारलें तर? एकदम त्याचें कांहीं जास्ती झालें तर?

त्या दिवशीं तसें कांहीं झालें नाहीं. पण दुसरें दिवशीं संध्याकाळीं तो एकाएकीं घाबरा झाला. त्याच्या पोटांत विलक्षण कळा येऊं लागल्या.

राहून राहून मला दुपारची गोष्ट आठवूं लागली. अशोकाच्या वयाचा मुलगा चांगला आलेल्या एका वकिलीणबाईंनीं बोलतां बोलतां आपल्या नवऱ्याची हकीकत सांगितली होती. त्यांची अपेंडिसायटिसचीच तक्रार होती. आज करूं, उद्यां करूं म्हणून शस्त्रक्रिया लांबणीवर टाकीत होते ते! पण एके दिवशीं एकदम पोटांत भयंकर दुखायला लागलें. दवाखान्यांत नेलें तेव्हां डॉक्टरांनीं सांगितलें कीं आणखी चार तास उशीर झाला असता तर ॲपेंडिक्स फुटून तें विष साऱ्या पोटांत पसरलें असतें. मग कुणाचाच कांहीं इलाज चालला नसता.

तें मनांत येऊन माझा सारा धीर सुटला. स्वारीच्या चेहऱ्यावरहि काळजी दिसत होती. बड्या डॉक्टरांना त्यांनीं पुन्हा बोलावलें. त्यांनीं तपासणी केली. त्यांनीं गांवांतल्या दोन नामांकित डॉक्टरांकडे गाडी पाठविली. 'आई—आई' म्हणून अशोक मध्येंच कण्हत होता, ओरडत होता. मला तें ऐकवेना. मी माझ्या खोलींत जाऊन अंथरुणावर पडलें.

डोक्यांत घणाचे घाव बसत होते. जीव वणव्यांत होरपळून निघत होता. खोलींतल्या घड्याळाची टकटक पाठीवर बसणाऱ्या फटक्यांसारखी वाटत होती. तें घड्याळ बंद पडावें, साऱ्या जगाचे व्यवहार या क्षणीं थांबावेत, पुढें कांहीं कांहीं घडूं नये, या कल्पनेच्या मागें मन धांवत होतें.

इतक्यांत कुणी तरी दारावर टकटक केलें. स्वतःच्या काळजाची विलक्षण धडधड मला ऐकूं येऊं लागली. कोण आलें असेल? काय सांगायला आलें

असेल ? मीं सर्व बळ एकवटून विचारलं, 'कोण आहे ?

'मी !'

असा रंगु आला मला त्या आवाजाचा. हीं गडीमाणसें अशींच वेंधळीं असतात. इकडे माझा प्राण चालला आहे आणि—

मीं दार उघडून पाहिलें,

समोर अनिरुद्ध उभा होता ! धुळीनें भरलेले कपडे, आंत आंत ओढलेले डोळे, काळवंडलेला चेहेरा—

माझी स्थिति मोठी चमत्कारिक झाली. 'अशोक फार आजारी आहे रे—' असें म्हणून घळघळा रडावें, महिन्यांपासून आंत कोंडलेल्या साऱ्या दुःखाला वाट करून द्यावी अशी इच्छा मनांत प्रबळ झाली. तिच्या पाठोपाठ एका विचित्र शंकेनें माझें मन ग्रासून टाकलें. माझ्या घरीं कधींहि न आलेला अनिरुद्ध-आजच अशा अशुभ वेळीं—इथें कां यावा ? माझ्यापुढें वाढून ठेवलेल्या भियारी ताटाची सूचना देण्याचा दैवाचा हा क्रूर डाव नाहीं ना ? याचा एकुलता एक मुलगा दोन दिवसांपूर्वी गेला. आतां—

त्यांच्याकडे तारवटलेल्या डोळ्यांनीं पाहत उभी राहिलें मी. माझ्या तोंडांतून शब्द बाहेर फुटेना. मूर्च्छा येत आहे असें वाटून मीं दार घट्ट धरण्याचा प्रयत्न केला. पण तो साधला नाहीं.

मी खालीं पडतेंय् असें दिसतांच अनिरुद्धानें मला एकदम धरलें.—तो स्पर्श प्रौढ पुरुषाचा नव्हता. माझ्या बालमित्राचा होता. लहानपणींसारखें त्याच्या खांद्यावर डोकें टेकून मी कंपित स्वरात पुटपुटलें, 'अनिरुद्ध !'

माझें मस्तक थोपटीत तो म्हणाला, 'विमल, अजून रडवीच राहिली आहेस का तूं ? अग वेडे, टाकीच्या घावांनीं दगडाला देवपणा येतो ना ! माणूसहि तसाच संकटाच्या—'

मीं पाणावलेल्या डोळ्यांनीं त्याच्याकडे पाहतांच तो बोलायचा थांबला. मी झटकन् त्याच्यापासून दूर झालें.

माझ्याकडे पाहून तो हंसत म्हणाला, 'काल शिबिर पहायला तूं येणार होतीस असं कुणी तरी सांगितलं. तुझी वाट पाहत होतों मी. मग कुणी तरी म्हणालं, तुझा मुलगा फार आजारी आहे, म्हणून तूं आली नाहींस. कालच त्याला पहायला येणार होतों मी पण सार्वजनिक माणसं म्हणजे गावांतल्या धर्मशाळा रिकामपण कधीं मिळायचं नाहीं त्यांना. आठ वाजतां मेलनं मुंबईला जायचंय् मला. म्हणून काम संपतांच तसाच इकडे आलों. आतां बरं आहे अशोकाचं ? त्याच्या खोलींतूनच मी तुझा शोध करीत आलों.'

अशोक बरा आहे ? माझा आनंद गगनांत मावेना.

मी धांवतच त्याच्या खोलींत गेलें. डॉक्टरांनीं कमलें तरी इंजेक्शन दिलें होतें त्याला. त्याच्या कळा आतां पार नाहींशा झाल्या होत्या.

अशोकाचे केस कुरवाळीत तृप्त अंतःकरणानें मी त्याच्या उशाशीं बसलें. अनिरुद्ध पलंगापाशीं उभा राहून अनिमिष दृष्टीनें त्याच्याकडे पाहत होता. मीं अशोकाला त्याला नमस्कार करायला सांगितलें. त्याचे क्षीण हात हळूच उचलले. त्याला आशीर्वाद देण्याकरितां अनिरुद्ध किंचित् वाकला. त्यानें आपला हात अशोकाच्या मस्तकापाशीं नेला. इतक्यांत त्याची नजर अशोकाच्या उशापलीकडे पडलेल्या एका विमानावर गेली.

चटकन् त्यानें आपला हात मागें घेतला. माझें मन चरकलें. त्याला स्वतःचें मूल लाभलें नाहीं त्यानें हा आशीर्वाद देण्यांत काय अर्थ आहे असा कांहीं तरी भाव त्याच्या मुद्रेवरून तरळत गेला.

आतां मला राहवेना. मी उठलें आणि त्याच्याजवळ जाऊन कातर स्वरानें हळूच म्हणालें, 'अनिरुद्ध, तुझ्या दुःखांत—'

गुदमरल्यासारखें झालें मला. पुढचे शब्द गळ्यातल्या गळ्यांत अडकले. वेड्यासारखी त्याच्याकडे पाहत मी उभी राहिलें.

झटकन् पाठ फिरवून तो चालू लागला. दारापर्यंत गेला. मी अशोकाच्या उशापाशीं येऊन बसलें.

दारांतून बाहेर पडतां पडतां त्याचें पाऊल थबकलें. तो क्षणभर स्तब्ध उभा राहिला. मग मागें वळला. हळू हळू तो अशोकाच्या पलंगापाशीं आला. त्याच्या केसांवरून हात फिरवीत तो म्हणाला, 'विमल, याला फार जपायला हवं हं ! शक्य असतं तर तुझ्या मदतीला मी इथं राहिलों असतों. पण...'

बोलतां बोलतां त्याच्या डोळ्यांतून तीन चार अश्रुबिंदु टपटप माझ्या हातावर पडले. त्या चार थेंबांत त्याच्या त्यागी, करारी, विवेकी मनाचें प्रतिबिंब पूर्णपणें पडलें होतें.

—अनिरुद्ध, तुझ्या बालमैत्रिणीला सुद्धां तुझ्या हृदयाची ओळख पटायला इतके दिवस लागावेत ?

तूं म्हणाला होतास तेंच खरें आहे. मला सुखी करण्याकरितां तूं माझ्याशीं लग्न केलें नाहींस. तुझें माझ्यावर खरेंखुरें—अगदीं निरपेक्ष प्रेम आहे म्हणूनच तूं मुद्दाम माझ्यापासून दूर दूर गेलास. मी पृथ्वी आहें. तूं सूर्य आहेस. तुझ्या छातीवर मस्तक ठेवून मी विसावा घ्यायला गेलें असतें तर माझी जळून राख झाली असती !














हल्ला करण्याचें किंवा संरक्षणाचें साधन या दृष्टीनें रंगांचें महत्त्व किती आहे हें कळण्याकरितां वन्य प्राण्यांचें त्यांच्या नैसर्गिक वसतिस्थानांतच निरीक्षण करायला पाहिजे.




ज. नी. कर्वे

या जगांत जगण्याकरितां मनुष्याचीच धडपड चाललेली असते असें नव्हे, तर पृथ्वीच्या पाठीवरील यच्चयावत् प्राणिमात्रांत ती अहर्निश चालू आहे. जगण्याकरितां अन्नाची ज्याप्रमाणें जरुरी असते त्याप्रमाणेंच शत्रूपासून संरक्षण होणें हें देखील आवश्यक असतें. सगळ्या प्राण्यांच्या जीवनक्रमाकडे जर नजर टाकली तर प्रत्येकाला कोणी तरी शत्रू आहेच असें आपल्याला दिसून येईल. याला मनुष्यप्राणी तरी कसा अपवाद असेल? शत्रूपासून रक्षण झालें तरच जगणें शक्य! डार्विनच्या नैसर्गिक निवडीच्या तत्त्वाप्रमाणें शत्रूपासून बचाव होण्याकरितां अनेक तऱ्हेचे गुण प्राण्यांमध्यें उत्पन्न झाले पाहिजेत. या विविध गुणांपैकीं एक गुण म्हटला म्हणजे, प्राणी ज्या जागीं राहतो त्या ठिकाणच्या रंगाशीं योग्य रीतीनें जुळेल असा त्याच्या शरीराचा रंग असणें हा होय. पर्यावरणाशीं (—बाह्य परिस्थितीशीं) जुळेल असाच जर त्याच्या शरीराचा रंग असला तर प्राणी शत्रूच्या नजरेस येणार नाहीं किंवा होतां होईल तों अगदीं कमी येईल. प्राण्याचें हें पर्यावरणाशीं एकरूप होऊन गुप्त राहाणें जीवनार्थ कलहांत त्याला फारच उपयोगी पडतें. कारण शत्रूपासून आपला बचाव करण्याकरितां किंवा अन्न मिळविण्याकरितां त्याचा उपयोग होतो. पर्यावरण जसें बदलेल त्याप्रमाणें आपल्या शरीराचे रंगदेखील बदलण्याची शक्ति पुष्कळ प्राण्यांमध्यें असते.

निसर्गांत आढळणाऱ्या अनेक गोष्टींचें मनुष्यानें अनुकरण केलें आहे, इतकेंच नव्हे तर आपल्या बुद्धिचातुर्यानें त्यांत भर घालून निसर्गावर मात करण्याचा अनेक बाबतींत त्यानें यशस्वी प्रयत्न केला आहे. पक्ष्यांच्या उड्डाणाचें काळजीपूर्वक अवलोकन करून आकाशांत भ्रमण करण्याची कला त्यानें साध्य करून घेतली. पर्यावरणाच्या रंगाला अनुरूप असा आपल्या शरीराचा रंग बदलून गुप्त व्हावयाचें व स्वतःचें संरक्षण करावयाचें किंवा शत्रूवर हल्ला चढवावयाचा, या प्राण्यांच्या अंगीं असलेल्या मायावरण निर्माण करण्याच्या शक्तीचें निरीक्षण करून मनुष्यानें ती साध्य करून घेण्याचा यथामति प्रयत्न केलेला आहे. विशेषतः लढाईच्या कामीं त्यानें ही कला उपयोगांत आणली आहे.

गेल्या महायुद्धांत दोन्ही पक्षांनीं मायावरणाचा भरपूर उपयोग करून घेतला. शत्रूवर हल्ला चढविण्यास चाल करून जातांना किंवा शत्रूपासून बचाव करण्याकरितां, कृत्रिम उपायांनीं आरमारी जहाजें, तोफखाना किंवा सैन्य यांचें त्यांच्या पर्यावरणाशीं इतकें साम्य, इतकी एकरूपता उत्पन्न करावयाची कीं, शत्रू सहज फसला जावा. मायावरण दोन तऱ्हेनें उपयोगांत आणतां येतें:—शत्रूवर चढाई करण्याकरितां उत्पन्न केलेलें एक व दुसरें स्वसंरक्षणाकरितां. एखाद्या लहान लढाऊ जहाजामधील शस्त्रास्त्रें काळजीपूर्वक लपवून त्याला नीट रंग देऊन तें मच्छीमारी जहाज आहे, असें भासवावयाचें व शत्रूचा हल्ला ओढवून घेऊन मग त्याच्यावर अचानक जोरदार चढाई करून त्याचा पराभव करावयाचा, हें पहिल्या तऱ्हेच्या मायावरणाचें उदाहरण म्हणून देतां येईल. लढाई चालू असतां मालाची ने–आण करणारीं व्यापारी जहाजें शत्रूच्या तावडींत सांपडून बुडविलीं जाऊं नयेत म्हणून त्यांना अशा तऱ्हेनें रंग देतात कीं समुद्रावर प्रवास करीत असतां, टेहळणी करीत असलेल्या शत्रूला तीं दिसूं नयेत. वरील उदाहरण दुसऱ्या तऱ्हेच्या मायावरणाचें होय.

निसर्गांत मायावरणाचे हे दोन्ही प्रकार आढळून येतात. हल्ला करण्याचें किंवा संरक्षणाचें साधन या दृष्टीनें रंगांचें महत्त्व किती आहे हें कळण्याकरितां वन्य प्राण्यांचें त्यांच्या नैसर्गिक वसतिस्थानांतच निरीक्षण करायला पाहिजे. त्याशिवाय त्याची नीट कल्पना येणार नाहीं.

एखाद्या प्राणिसंग्रहालयांतील पिंजऱ्यांत कोंडून ठेवलेला बिबळ्या वाघ पाहिला तर त्याच्या अंगावर असलेल्या मोठ्या ठिपक्यांमुळें तो फार सुंदर दिसतो एवढीच आपल्याला कल्पना येईल. परंतु तोच जर आपण त्याला त्याच्या नैसर्गिक निवासस्थानांत पाहिला तर अंगावरील ठिपक्यांचें खरें महत्त्व काय आहे तें आपल्या लक्षांत आल्याशिवाय राहणार नाहीं. जंगलांत चित्रविचित्र रंगांच्या झुडपांच्या दाट जाळींत राहणाऱ्या या श्वापदाच्या कातडीवरील

---

* मायावरण हा शब्द 'Camouflage' या मूळ फ्रेंच शब्दाचा पर्यायवाचक असून त्याचा अर्थ लपणें, छपणें असा आहे.

अनुक्रमणिका

आकृतींची यादी :



झाडाच्या सालीशीं रंगसादृश्यामुळें एकरूप झालेला एक कीटक.



तिवा आणि काटकी.



पानांवरील पर्णकीटक.

ठिपक्यांचें जाळींतील अंधुक प्रकाशांत पडलेले कवडसेव सांवलीचे लहानमोठे ठिपके यांच्याशीं किती साम्य असतें तें शिकारी लोक चांगलें सांगूं शकतील. चित्त्या वाघाच्या अंगाचा रंग व त्यावरील ठिपके यांची रचनाच अशी असते कीं, तो आपल्या जाळींत असतांना सहसा बाहेरून दिसूंच नये. मार्जारकुलांतील वाघ, चित्ता वगैरे प्रण्यांचीहि अशीच गोष्ट आहे. वाघ जंगलांत हिंडत असतांना चटकन् नजरेंत भरतो, परंतु चालत असतांना थांबल्याबरोबर किंवा दबा धरून बसल्याबरोबर तो एकदम गुप्त झाल्यासारखा होतो, याचें कारण त्याच्या शरीराच्या रंगव्यवस्थेंतच आहे. आक्रमक मायावरणाचें हें एक उदाहरण आहे.

भक्ष्य मिळविण्याकरितां रंगांच्या साहाय्यानें भ्रम उत्पन्न करण्याचें काम पुष्कळ प्राणी करतात. 'सर्पटोळी' नांवाचा एक साप आहे. हा फारसा जाड नसतो, पण त्याची लांबी मात्र बरीच असते. याचा रंग झाडाच्या पानांसारखा हिरवा असतो. झाडाच्या फांदीला विळखा घालून फांदीवरून तो खालीं लोंबकळत रहातो. अशा स्थितींत पहाणाऱ्याला तो एखाद्या वेलासारखा भासतो. त्यामुळें साहजिकच लहान-सहान पक्षी व इतर छोटे प्राणी याच्या तडाख्यांत सांपडून भक्ष्यस्थानीं पडतात. फुरसें फारच विषारी असतें. तें बहुतकरून खडकाळ जमिनींत किंवा रेताड जागेमध्यें आढळतें. खडकाळ जमिनींत आढळणाऱ्या फुरशाचा रंग मातट असतो, तर रेताड जागेमध्यें त्याचा रंग वाळूसारखा असलेला आढळून येतो. यामुळेंच पुष्कळदां प्रत्यक्ष त्याच्या अंगावर पाय पडेपर्यंत फुरसें आपल्याला दिसून येत नाहीं. भक्ष्य मिळविण्याच्या कामीं त्याला या रंगसादृश्याचा उपयोग होतो.

एका शिकारी गृहस्थानें अजगरासंबंधानें आपला मजेदार अनुभव नमूद करून ठेवलेला आहे. शिकार संपल्यानंतर विश्रांति घेण्याकरितां रानांतील एका मोठ्या झाडाखालीं हा शिकारी गेला. झाडाचीं बरींच मुळें वर आलेलीं होतीं. त्यांतीलच एक भलें थोरलें मूळ जमिनीबाहेर येऊन वेडेंवाकडें पसरलेलें त्याला दिसलें. त्यावर बसण्याच्या इराद्यानें त्यानें एक पाय त्याच्यावर ठेवला. त्यावर तो बसणार इतक्यांत त्याला जोराचा फुस्कारा ऐकूं आला. तो दचकून इकडे तिकडे पहातो आहे तों आपण पाय दिलेलें मूळ नसून तो एक भला मोठा अजगर आहे असें त्याला दिसलें. त्याला गोळ्या घालून ठार मारल्यावर त्याचें पोट फाडून पहातां त्यांत एक लहान हरीण आढळून आलें. हें हरीण त्या अजगराच्या रंगाला फसूनच त्याच्या कचाट्यांत सांपडलें असलें पाहिजे, यांत संशय नाहीं.

समुद्रांत 'शार्क' जातीचे फार खादाड आणि अत्यंत क्रूर मासे आढळतात. याचीच एक जात आपल्या पश्चिम किनाऱ्याजवळ सांपडते. त्याला 'मुशी' म्हणतात. 'टायगर शार्क' नांवाची या माशाची एक जात आहे. वाघाच्या अंगावर ज्याप्रमाणें पट्टे असतात तशाच तऱ्हेचे पट्टे या शार्क माशाच्या अंगावर असल्यामुळें त्याला 'टायगर शार्क' म्हणतात. पुष्कळदां मेल्याचें सोंग करून टायगर शार्क समुद्राच्या पाण्यावर तरंगत पडतो. तो मेलेला आहे, असें समजून त्याच्या शरीराचे लचके तोडण्याकरितां पुष्कळ मासे त्याच्या भोंवतीं गोळा होतात. ते जमल्याबरोबर हा मासा जिवंत होतो व त्यांच फडशा पाडतो.

कांहीं कीटक, मारून खाल्लेल्या किड्यांच्या कवचांनीं आपलीं शरीरें झांकून घेतात. हेतु हा कीं, आपलें खरें स्वरूप काय आहे हें आपल्या भक्ष्यस्थानीं पडणाऱ्या किड्यांना कळूं नये व सहजासहजीं ते आपल्या पकडींत यावेत.

वर दिलेलीं सर्व उदाहरणें आक्रमक मायावरणाचीं आहेत. निसर्गानें संरक्षक मायावरणाचे देखील अनेक प्रकारचे नमुने आढळून येतात.

घरांतून आढळणाऱ्या पालींच्या रंगाचें जर आपण निरीक्षण केलें तर आपल्याला आढळून येईल कीं, ज्या खोल्यांना पांढरा किंवा दुसरा कोणताहि फिकट रंग दिलेला असतो अशा खोल्यांतून राहाणाऱ्या पाली रंगानें उजळ असतात. परंतु ज्या खोल्यांत अंधार असतो व ज्यांच्या भिंतींचा रंग गडद असतो, अशा ठिकाणीं आढळणाऱ्या पालींचा रंग जास्त काळसर असतो. स्वयंपाकघरांतील छत व भिंती पुष्कळदां धुरानें काळ्याकुट्ट झालेल्या असतात. या ठिकाणीं राहणाऱ्या पाली अगदीं काळ्या असतात. त्यांचा रंग जर पांढुरका किंवा फिका असता तर काळ्या पार्श्वभूमीवर त्या फारच उठून दिसल्या असत्या. सुरक्षिततेच्या दृष्टीनें त्यांचा रंग काळा असणेंच इष्ट होय. झाडांच्या खोडांवरून आढळणाऱ्या पालींचा रंग थेट सालीसारखा असलेला आढळतो.

पुष्कळ जातींचे सरडे परिस्थित्यनुरूप शरीराचा रंग बदलतात. 'सरडगुहिरा' म्हणून जी सरड्याची जात आहे तींत त्या रंग बदल-



घुवड आणि घुवडाच्या डोक्याप्रमाणें भासणारें फुलपांखरूं.



कोकिळ आणि बहिरी ससाणा.

ण्याच्या शक्तीची पूर्ण वाढ झालेली आढळून येते. झाडांच्या पानांतून मंदपणें हिंडणारा हा प्राणी पर्यावरणाच्या बदलाबरोबरच क्षणोक्षणीं आपल्या शरीराचे रंग इतके बदलीत असतो कीं, याच्या शरीराचा मूळ रंग तरी कोणता याचाच प्रश्न पडतो. झाडांवरून राहणाऱ्या बेडकांमध्येंहि रंग बदलण्याची ही शक्ति असल्याचें दिसून येतें. झाडांच्या खोडांवरून किंवा मोठ्या फांद्यांवरून फिरत असतांना या बेडकांचा रंग करडा असतो, परंतु पानांमधून हिंडतांना त्यांचा रंग बदलून हिरवा होतो.

अनेक मासे भक्ष्य मिळविण्याकरितां नदीच्या किंवा तलावाच्या तळाशीं जातात. अशा माशांच्या पाठीचा रंग पाण्याच्या तळाशीं असलेल्या चिखलासारखा किंवा वाळूसारखा असतो. त्यामुळें तळाशीं असतांना ते चटकन् दिसत नाहींत.

संरक्षक मायावरणाची कला पूर्णत्वाला पोहोंचलेली जर कोठें आढळत असेल तर ती कीटकसृष्टींतच! कीटकांच्या इतके शत्रू दुसऱ्या प्राण्यांना असतील किंवा नाहीं याबद्दल शंकाच वाटते. बलवानांच्या पासून स्वतःचें रक्षण करावयाचें झाल्यास लपून बसणें हा एकच उपाय दुर्बलांच्या जवळ असतो. कीटकांनीं या उपायाचें अवलंबन पूर्णपणें केल्याचें आढळून येतें. किड्यांचे संमिश्र रंग आणि त्यांच्यांतील पुष्कळांच्या शरीराचे आकार हे शत्रूपासून बचाव करण्याकरितां उपयोगीं पडतात. शत्रूपासून बचाव करण्याचीं हीं साधनें नाहींत असें मानलें तर पर्णकीटकांचें पानांशीं असलेलें आश्चर्यकारक साम्य व [illegible]ल्याचें वाळलेल्या काटकीशीं असणारें सादृश्य यांची संगती कशी लावावयाची? संरक्षक मायावरणाचीं निसर्गांतील हीं पूर्ण व निर्दोष उदाहरणें आहेत, असेंच विचारांतीं दिसून येईल.

टोळ किंवा 'खंडोबाचा घोडा' यांच्यासारखे पुष्कळ कीटक ऋतुमानाप्रमाणें रंग बदलतात. पावसाळ्यांत त्यांचा रंग ओल्या गवताच्या रंगासारखा हिरवा असतो तर उन्हाळ्यांत वाळलेल्या गवताच्या रंगासारखा होतो. स्वसंरक्षणाकरितां या कीटकांना शरीराच्या रंगावरच अवलंबून रहावें लागतें. रेशमी पतंगाच्या पंखांवर डोळ्यांप्रमाणें भासणारे दोन मोठे ठिपके असतात. हा पतंग दाट पानांमध्यें बसलेला असला म्हणजे दुरुन पहाणाराला, या ठिपक्यांमुळें तो पिंगळ्याच्या डोक्यासारखा भासतो. दक्षिण अमेरिकेंत एक प्रकारचें फुलपांखरूं आढळतें. याच्या मागच्या दोन पंखांवर हुबेहुब घुबडाच्या डोळ्यांप्रमाणें दिसणारे आणि साधारण तेवढ्याच आकाराचे दोन मोठे ठिपके असतात. या फुलपांखराचा हा भाग अगदीं घुबडाच्या डोक्यासारखा दिसतो व म्हणूनच पक्षी याच्या वाटेला जात नाहींत. घुबडाच्या डोक्याशीं असलेलें हें साम्य शत्रूला भीति दाखवून त्याला दूर ठेवण्यास पुरेसें होतें.

आपला जीवनक्रम सुरळीत चालावा म्हणून पुष्कळ परोपजीवी प्राणी दुसऱ्या प्राण्यांची हुबेहुब नक्कल करतात. नक्कल ही मायावरणापेक्षां थोडी निराळी आहे. तरी त्याचाच तो एक प्रकार आहे, असें मानायला हरकत नाहीं. कोकिळ हा एक परोपजीवी पक्षी आहे. याच्या अनेक जातीं-पैकीं शिकरा-कोकिळ ही एक आहे. हा कोकिळ बहिरी ससाण्याची हुबेहुब नक्कल करतो. ससाण्याच्या रंगाप्रमाणेंच याचा रंग असतो. इतकेंच नव्हे तर, ससाण्याच्या छातीवर, पोटावर, पंखांवर व शेपटावर ज्या तऱ्हेचे पट्टे असतात तसेच या कोकिळेच्याहि असतात. ससाणा हा शिकारी पक्षी असून तो लुटारू आहे. त्यामुळें सगळे लहान पक्षी त्याला फार घाबरतात. शिकरा कोकिळ हा ससाण्याप्रमाणें दिसत असल्यामुळें साहजिकच सर्व लहान पक्ष्यांची फसगत होऊन ते त्यालाहि फार घाबरतात. या भीतीचा कोकिळाला चांगलाच फायदा मिळतो. कोकिळ कोणत्याहि का जातीचा असेना, तो घरटें मुळींच बांधीत नाहीं. कोकिळा (मादी) दुसऱ्या पक्ष्यांच्या घरट्यांत अंडीं घालते. तेथेंच तीं फुटून पिलें बाहेर येतात व ज्या पक्ष्यांच्या घरट्यांत हीं पिलें तयार होतात त्यांनाच त्यांचें पालनपोषण करून वाढवावें लागतें! शिकरा-कोकिळाची मादी आपलीं अंडीं बैरागी पक्ष्याच्या (यालाच सातभाई असेंहि नांव आहे,) घरट्यांत घालते. कोकिळ आधीं टेहळणी करून बैराग्याचें घरटें हुडकून काढतो व त्याच्या भोंवतीं घिरट्या घालायला सुरवात करतो. शिकरा–कोकिळ दिसल्याबरोबर तो खरा ससाणा आहे व तो आतां आपल्या घरट्यावर हल्ला करणार असें वाटून बैराग्याचें जोडपें संरक्षण करण्याकरितां ससाण्यावर (म्हणजे कोकिळावर) हल्ला करून त्याला पिटाळून लावण्याकरितां त्याच्या मागें लागतें आणि कोकिळ त्यांना हुलकावण्या देत देत घरट्यापासून पुष्कळ लांब नेतो. कोकिळा बैराग्याच्या घरट्याजवळ दबा धरून बसलेली असते. ती आपलीं अंडीं प्रथम जमिनीवर घालते व योग्य संधीची वाट पहात रहाते. बैराग्याचें जोडपें घरट्यापासून बरेंच दूर गेलेलें दिसतांच, ती एकेक अंडें चोंचींत घेऊन बैराग्याच्या घरट्यांत नेऊन टाकते. हा कारभार ती इतक्या थोड्या वेळांत उरकते कीं, बैराग्याचें तें जोडपें परत येण्यापूर्वींच ती तिथून निघून गेलेली असते. कोकिळेच्या अंड्यांचा रंग बैराग्याच्या अंड्यांसारखाच असल्यामुळें आपली कोणी फसवणूक केली आहे हें त्यांच्या मुळींच लक्षांत येत नाहीं. अशा तऱ्हेनें शिकरा-कोकिळाचीं अंडीं उबविण्याचें व पिलें वाढविण्याचें काम बैराग्याकडे येतें.

कावळा हा अत्यंत धूर्त पक्षी आहे [illegible] आणखी एक जातीचा कोकिळ त्यालाहि फसवून त्याच्या घरट्यांत आपलीं अंडीं टाकायला सोडीत नाहीं.

मायावरणाचीं आणखीहि पुष्कळ उदाहरणें देतां येण्यासारखीं आहेत; परंतु मायावरणाचें निसर्गांतील कार्य कोणतें तें लक्षांत येण्यास वर दिलेली माहिती पुरेशी होईल, असें वाटतें.






मगधांत मौर्यसत्ता प्रस्थापित व्हायच्या सुमाराला घडलेली ही एका साध्या भोळ्या कलावंताची हकीकत आहे. किंबहुना, केवळ कलेच्या प्रेमानें प्रेरित होऊन सुंदर मूर्ति घडविण्यासाठीं पडलेले त्याच्या छिन्नीचे टोले नंदराज्याच्या विध्वंसाला कारणीभूत झालेले भयंकर प्रहार झाले; त्याची ती एवढीशी छिन्नी आणि त्याचा तो केवळ प्रामाणिक निर्मितीसाठींच घाव घालणारा हातोडा नंद राजवंशाच्या नाशाचें संहारशस्त्र टरलें हें कुणीं कसें खरें मानलें असतें! आणि तेंहि सुनंदाप्रमाणें कोकरासारख्या गरीब माणसाच्या बाबतींत?—पण राजकारणांत विलक्षण क्रांतिकारक, प्रसंगीं केवळ प्रखर व जागृत बुद्धिमत्ता, वज्रकठोर हृदयें, कधीं न विझणारी आकांक्षा, असंतोषांचीं प्रदर्शनें, परजलेलीं शस्त्रास्त्रें व कौटिल्य यांचीच केवळ गरज असते असें नाहीं. चाणक्यांसारखे मुत्सद्दी,—कोमल, निष्पाप आणि अतीव सृजनशीलतेनें भरलेलीं अंतःकरणें हीं भयंकर क्रांतींचीं अमोघ अस्त्रें आहेत, असें जाणतात आणि त्यांचा विलक्षण चातुर्यानें आणि कलावंतालाच साजेल अशा आकर्षक पद्धतीनें उपयोग करतात. सुनंदाच्या बाबतींत असेंच झालें. कोण हा सुनंद?

सुनंद हा एका गरीब वाण्याचा मुलगा. जन्माबरोबरच सुनंद बापाच्या धंद्याबद्दल

नर्तकी जशा गुणी पुरुषांना भुरळ घालून कायमचे आपले गुलाम करतात, त्यांच्या कलेपासून त्यांना वंचित करतात, तसें इथें झालें नाहीं. भोळ्या सुनंदाला फसवणें मातृकेच्या शक्तीबाहेरचें काम होतें.

पराकाष्ठेचा तिटकारा घेऊन आला होता. विलक्षण बुजरा आणि मुखदुर्बळ होता तो. मुलांनाहि तो बुजे. बापाला भिई. येऊन जाऊन हसणें बोलणें जें काय होई तें आईपाशीं. सुनंद झाला आणि धंद्यात बापाला खोट बसली. त्यांत पुरोहितांनीं सांगितलें होतें कीं जिथें जाईल तिथें हा मुलगा वाटोळें करील म्हणून. आणि झालेंहि तसेंच. सुनंद तीन वर्षांचा व्हायच्या आंतच त्याची आई वारली. बापानें दुसरें लग्न केलें. नवी आई आली आणि सुनंद अधिकच आकसला. एकलकोंडा बनला. नव्या आईनें प्रथम लळा लावायचा प्रयत्न केला. सुनंद आपले मोठे मोठे काळेभोर डोळे तिच्या चेहऱ्यावर क्षणभर रोखून धरी. मग मान खालीं घाली. जेव्हां ती बघत नसेल तेव्हां तो रोखून तिच्याकडे पाही आणि तिनें पाहिलें कीं झटकन् दुसरीकडे मान वळवी. त्याचें तें अलिप्त वागणें व ती विलक्षण नजर नव्या आईच्या उरांत खंजिरासारखी खुपूं लागली. उदासीनतेचें रूपांतर तिटकाऱ्यांत व तिटकाऱ्याचें छळ त झालें. घरीं–दारीं सुनंद आपला एकटा असे. पडेल तें काम तत्परतेनें करावें, मिळेल तें खावें आणि उरलेला वेळ नदीच्या कांठानें, जंगलांच्या कडा-कडांवर, डोंगरांच्या कपारीवर हिंडून हिंडून तऱ्हेतऱ्हेची माती, लाकडें व दगड गोळा करणें हा त्याचा छंद. वारुळांतली काळी माती, शाडूची पिवळी माती, शेतांतली काळी आणि डोंगरांतल्या कडांवरची लाल माती तो आणी. त्यांचे वेगळाले ढीग करून, त्यांतून तो चित्रें तयार करी. शाडूनें व गेरूनें तीं रंगवी. ससे, हरणें, नाग, हत्ती, वाघ, माणसें सारें कांहीं तो बनवी. जरा मोठा झाल्यावर तो लाकडाचीं चित्रें करूं लागला आणि नंतर दगडाच्या मूर्ति बनवूं लागला. त्यानें चित्रें करावीं. तीं तयार झालीं कीं आईनें तीं बेशक उचलून विकून पैसे करावे. जसजसा सुनंद मोठा होऊं लागला तसतशी तिची कमाई वाढूं लागली. जितकी तिची जीभ चपळपणें बेलगाम चाले; तितका तितका सुनंद अधिक अधिक आपल्याच आंत आंत ओढला जाई. कधीं शिवीला प्रत्युत्तर त्यानें दिलें नाहीं. कधीं डोळ्यांत पाणीहि आलें नाहीं. मान अगदीं खालीं घालून ओठ घट्ट मुडपून तो मग माती, दगड, लाकडें यांना कुरवाळी आणि मग आपल्या बोटांतलें कौशल्य उसळून उठे आणि अगदीं नवीं नवीं चित्रें तो घडवी. नव्या सुंदर चित्रांचें हें रहस्य नव्या आईनें ओळखलें होतें. आणि अगदीं चतुर मुत्सद्याप्रमाणें ती तें अमलांत आणीत असे.

अशा प्रकारें सुनंदाची कला पोसली जात होती. ना कुणी गुरु त्याला कधीं लाभला. गांवाच्या बाहेर रानांत एका दगडी कपारींत एक लेणें होतें. तिथें 'सात बहिणीं'च्या मूर्ति कोरलेल्या होत्या. जयंती, वैजयंती, तारा, राधा, कुहू, अरुंधती–बाराही अशा त्या सात मातृकांची विलक्षण मातब्बरी त्या काळीं होती. ग्रामदेवताच होत्या त्या. साऱ्या तारक, मारक शक्ती त्यांच्यांत वसत असून त्यांची पूजा टळल्यास गांवावर महान् अनर्थ कोसळतात, रोगराई, परचक्र सारें कांहीं येतें अशी समजूत होती. भाद्रपद-आश्विनांत या सात बहिणींचा मोठा उत्सव होई. सुनंदाचें मन त्या ओबडधोबड पण अति सूक्ष्म जाणीवा व्यक्त करणाऱ्या शिल्पानें लहानपणापासून आकृष्ट केलें होतें. वेळ मिळेल तेव्हां तास तास—कधीं पहाटे, कधीं भर दुपारीं, तर कधीं संध्याकाळीं—तो त्या मातृकांचें ध्यान न्याहाळीत बसे. कधीं कधीं पौर्णिमेचा चंद्र उगवतांना त्या पूर्वाभिमुखी गुहेंत मूर्तींच्या चेहऱ्यावर चंद्रकिरण पडत. तसेंच कधीं सूर्योदयाच्या वेळीं. त्या वेळीं सुनंद अचूक त्या निर्जन ठिकाणीं जायचा. आणि त्या मूर्तींच्या मुद्रावरील भाव डोळ्यांनीं पिऊन टाकायचा. भाविकांप्रमाणें त्याचें मस्तक कधीं त्यांच्या चरणांवर पडलें नाहीं, कधीं त्याचे हात त्यांच्यापुढें जुळले नाहींत.—मग पूजाअर्चा कुठली? पण सुनंदाच्या संवेदनेचे सारे धागे त्या मातृकांभोवतीं गुंडाळले गेले होते एवढें मात्र खरें.

आणि एक दिवस गांवांत बातमी आली कीं त्या मातृकांचीं नाकें व स्तनमंडळें कुणी तरी फोडून त्या मूर्ति अगदीं विरूप करून टाकल्या आहेत! कुणी केलें हें भयंकर कृत्य? कित्येक वेळां सुनंदाला त्या ठिकाणीं वेळीं-अवेळीं जातांना लोकांनीं पाहिलें होतें. आणि त्याच्या कुठल्याहि कृतींत भक्तीचा लवलेश कुणी पाहिलेला नव्हता. अबोल, माणूसघाणा सुनंद!—त्याचेंच तर हें काम नसेल? गांवांत हां हां म्हणतां अफवा पसरली.

खरोखरच काल रात्रीं सुनंद एकाद्या उन्मत्त माणसाप्रमाणें बेभान स्थितींत घरीं आला होता. आज नेहमींप्रमाणें न निजतां तो विव्हळत हातवारे करीत घरभर हिंडत होता. आई उठली. तिनें दिवा लावला. सुनंदाची भयंकर विचलित अशी मुद्रा पाहून आज मात्र ती खरोखर घाबरली. "सुनंद पहा कसं करतो आहे तें!" तिनें नवऱ्याला उठवून सांगितलें.

"काय झालं रे?"

"मातृकांच्या मूर्ति भंगल्या."

"भंगल्या? कशा?" बापाच्या अंगावर कांटा उभा राहिला.

"पांच-दहा आजीवक श्रमणांनीं आज तें काम केलं. मी बसलें होतों नेहमींप्रमाणें. तिथें ते आले. त्यांनीं मातृकांना लाखोली वाहिली. यज्ञ-यागाला शिवीगाळ केली वेदांचा उद्धार केला. मला हिणवलं, मारलं आणि माझ्या उपरण्यांतला हातोडा आणि छिन्नी पाहून ते भिक्षू हसूं लागले. 'सांपडलं सांपडलं, जनतेच्या मनाला दुबळं आणि विकृत करणाऱ्या या तंत्राच्या नाशाचं साधन आज मिळालं. आतां सत्यधर्माची सुरुवात होणार. माणसाला चिंतनानें मोक्ष मिळतो, प्रकृतीवर संकल्पांचा विजय होतो, हें इथपासून जगाला आतां कळणार. करा सुरुवात आपल्या धर्मप्रवर्तनाची. फोडा या मूर्ति. मूर्ति भंगल्याखेरीज लोकांना नवी दृष्टि मिळायची नाहीं!' आणि मग त्या क्षपणकांनीं भराभरा चुडी पेटवल्या आणि माझ्या हत्यारांनीं त्या मूर्तींचे अवयव छेदून टाकले. आणि मग

अनुक्रमणिका

माझें मुंडण करून बळेंच एक छाटी मला नेसवून सत्य व सनातन धर्माचा पुरस्कार करीत ते तिथून निघून गेले.''

खरोखरच सुनंद त्या भिक्षूच्या वेशांत किती चमत्कारिक दिसत होता. आपली छिन्नी त्यानें उराशीं घट्ट कवटाळून धरली होती. जणूं कांहीं तिचाच त्याला आधार होता.

"" आणि तुझे कपडे?'' आईनें विचारलें. तिची मुद्रा भयानें पांढरी फटफटीत पडली होती.

सुनंदानें कांहींच उत्तर दिलें नाहीं. आतां कळवळून ती ओरडली. ''पोरा, आतांच्या आतां इथनं नीघ. असाच यतिवेश घेऊन जा कुठें तरी. लोकांना समजलं तर तुझं हाड रहाणार नाहीं जागेवर. साऱ्या घरादारीला आग लावतील लोक.''

आणि तोच तिचा पहिला व शेवटचा आशीर्वाद घेऊन सुनंद त्या रात्रीच्या काळोखांत, थंडीनें व भयानें कांपत कांपत दिसेनासा झाला.

दोन दिवसांनीं कांहीं आजीवक श्रमण गांवांत भिक्षा मागण्यासाठीं आले. त्यांनीं एका नग्न तरुण मुलानें देवतांच्या मूर्ति फोडतांना आपण पाहिलें, आणि आपण हटकतांच तो कसा हरणासारखा पळून गेला तेंहि सांगितलें. श्रमणांनीं त्या कपड्यांचें बोचकें गांवकऱ्यांना दाखवलें. ते सुनंदाचे कपडे साऱ्यांनीं ओळखले. सुनंद दिसल्यास त्याला जिवंत जाळण्याची त्यांनीं प्रतिज्ञा केली. पण वर्षावर वर्षें लोटलीं. भग्न मातृकांचें देवस्थान ओस पडलें व सुनंदाला लोक विसरूनहि गेले.

पण सुनंद मात्र दामोदर नदीच्या कांठच्या एका जंगलांत वास्तव्य करून होता. तिथें वस्ती होती ती वन्य जातींची, अगदीं निरुपद्रवी लोकांची. पण त्यांच्याहि वस्तीपासून दूर एक झोपडें बांधून, हा तापसवेशी मूर्तिकार राहूं लागला. त्या झोपडीभोंवतीं मातीच्या, लांकडाच्या, दगडाच्या अशा सुंदर सुंदर मूर्ति मांडून ठेवलेल्या असायच्या. कांहीं तयार तर कांहीं अर्धवट असत. वन्य जातीच्या मुलामुलींनी सदा खेळण्यांची मागणी त्याच्याकडे करावी आणि मग चिकट मातीचे लिबलिबीत गोळे घेऊन हसत हसत सुनंदानें त्यांच्यासाठीं गाई, वाघ, हत्ती—काय वाटेल तें बनवावें. तशींच लाकडाचीं शोभिवंत खेळणीं. त्या बालकांच्या माता या साधुपुरुषावर अपार भक्ति करीत. जंगलांतला ताजा दाट मध, कंद-मुळं यांची वाण सुनंदाला पडली नाहीं. मुका सुनंद आतां बोलायला लागला होता. सात वर्षांत त्या वन्यांच्या सहवासानें त्याचा गाता गळाहि खुलला होता. हातानें मूर्ति घडवतां घडवतां तोंडानें त्यांचीं स्तोत्रपर कवनें त्याच्या कंठांतून बाहेर पडत. हां हां म्हणतां तीं गाणीं वन्यांनीं आत्मसात् केलीं.



सात वर्षांनीं जवळच्या पहाडाच्या एका कपारीवर सुनंदानें शिल्प खोदायला सुरुवात केली. भग्न मातृकांच्या प्रतिमा त्याला पुनरुज्जीवित करायच्या होत्या. स्कंदाला वाढविणाऱ्या सहा कृत्तिका, सातवी पार्वती, मातृका बाराही मिळून स्कंद जन्माचा अति विस्मयकारक देखावा खोदण्यास त्यानें सुरुवात केली. फिरून तो अंतर्मुख झाला. गाणें बोलणें थांबलें. पोरांचीं खेळणीं बंद झालीं. शिल्पयोगाचा अविरत ध्यास त्याला लागला: वर्ष दीड वर्ष तो असा त्या छंदांत गर्क होऊन बसला होता. छिन्नीच्या प्रहाराचे टोले तांबट पक्ष्याच्या बोलाप्रमाणें रानभर घुमत असत. सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत. उन्हांत, पावसांत केव्हांहि त्या आवाजाला विराम नव्हता. लहान पाषाणाची केलेली प्रतिकृति समोर ठेवून तिच्या-सारखें शिल्प खडकांतून काढण्यांत सुनंद मग्न झालेला होता. शिल्प आकार धरीत होतें. एका मूर्तीचा आकार आणि बालस्कंदाचें स्तनपान करणारें एक तोंड काय तें पूर्ण झालें होतें. बाकीच्या आकृतींच्या बहिरेखा तेवढी पूर्ण झाली होती.

सुनंद चैत्राच्या दोनप्रहरीं असाच काम करीत होता. अंगांतून घाम निथळत होता. प्रखर पिवळ्या धमक उन्हानें त्या मातृमूर्तींच्या भव्य मुखावरील स्मित उजळून उठून सभोंवारच्या तरूतरूंवर फुललेल्या वासंतिक स्मितभावांत मिळून गेलें होतें. छिन्नीचे टोले पाखरांच्या तालबद्ध नादांत एकजीव झाले होते. आणि त्या नादातालांत धुंद झालेल्या मनानें सुनंद आपलें काम करीत होता. उन्हानें करपून त्याची काया तो घडवीत असलेल्या पाषाणमूर्तींसारखीच काळी ठिक्कर पडली होती, कातडी उन्हानें उलूं लागली होती. पण त्याला कसलीच पर्वा नव्हती. मधून मधून मडक्यांतलें थंडगार पाणी घटाघट पीत तो आपलें काम करीतच होता.

इतक्यांत "ऐकलं तें कांहीं खोटं नाहीं. सारे शबर लोक म्हणत होते तें प्रत्यक्षच दिसलं. मातृकांचं साक्षात् दर्शन. स्कंदबालकाचं स्तनपान—" हे अपरिचित अति मधुर आवाजांत उच्चारलेले शब्द ऐकून सुनंदानें अतिशय विस्मित होऊन मागें वळून पाहिलें. गेल्या दहा अकरा वर्षांत नागर व्यक्तीला तो पहिल्यांदाच पहात होता. काळ्या रंगाचा, अंगावर शुभ्र वस्त्र पांघरून घेतलेला, उभें गंध लावलेला, मध्यम उंचीचा पण अति तेजस्वी नेत्र असलेला असा तो एक तरुण वयाचा ब्राह्मण होता. तपस्येनें आलेली कृशता व शुचिर्भूतता त्या ब्राह्मणाला पाहिल्याबरोबर नजरेंत भरत असत. वाणी अति सुसंस्कृत, दुसऱ्यावर छाप पाडणारी. या ब्राह्मणाची शेंडी खूप मोठी वाढून पाठीवर स्वैर मोकळी सुटलेली होती. तें पाहून सुनंद कांहींसा बुचकळ्यांत पडला. हा ब्राह्मण कीं दुसरा कोणी? पण अधिक विचार न करतां त्यानें नम्रतेनें त्याला वंदन केलें. "यावं महाराज, बसावं—" असें म्हणून त्यानें थंड पाण्यानें ब्राह्मणाचे पाय धुण्यास सुरुवात केली, तोंच दचकून तो ब्राह्मण मागें सरला आणि म्हणाला, "मित्रा सुनंदा, हे सोपस्कार हवेत कशाला? मी ब्राह्मण तो श्रेष्ठ आणि मातृमूर्ति घडवणारा तूं का कनिष्ठ?" असें म्हणून त्यानें कडकडून सुनंदाला मिठी मारली. सुनंद बिचारा बावरला. भिक्षेकऱ्यांनीं केलेली स्तुति निराळी आणि याची निराळी. ब्राह्मणाचे सुंदर पातळ ओठ हास्य करतांना विलग झाले होते. जणुं कांहीं मातृमूर्तींच्या पाषाणी ओठांवरचें तें हास्य या जिवंत मानवी मुखावर प्रत्यक्ष उमटलें होतें.

"माझं नांव आपणाला कसं कळलं?"

"नांव होय? या मातृमूर्तीनं भिल्लाशबरांच्या तोंडून आमच्या कानीं घातलं. मातांना जंगलांत कोंडून रहायचं नाहीं आहे. पाषाणी देह त्यांना नको आहे. सोन्याचा हवा आहे. नुकतंच आम्हांला त्यांनीं स्वप्नांत सांगितलं आणि तुझ्याकडे पाठवलं. आणि काय नवल? मगधेश्वर महानंद महाराजांनाहि मातृकांनीं दृष्टांत देऊन सांगितलं कीं गांवाबाहेरच्या आमच्या देवळांतल्या ओबडधोबड मूर्ति बदलून तिथें सुवर्णाच्या स्त्री-मूर्ति बसवा तरच राज्य सुरक्षित राहील. महाराजांनीं तें मनांत घेतलं आहे आणि कारागिरांना विचारताहेत. पण जुन्या मूर्ति काढण्याचं नांव काढलं कीं सारे थिथरतात. त्यांत पुरोहित शंकरगुप्त तर मुळींच कबूल नाहीं त्याला. तो म्हणतो, 'पलीकडे दुसरं देऊळ उभारा आणि तिथें बसवा हव्या तर सोन्याच्या मूर्ति.' पाटलीपुत्रांत सगळीकडे हीच चर्चा चालू आहे. शिवाय मातृकांच खरंखुरं ध्यान माहीत असलेला कसबी कारागीर तरी कुठें आहे म्हणा! तेव्हां आम्हीं म्हटलं कीं आधीं कारागिरांचा पत्ता लावावा आणि मगच काम हातीं घ्यावं. तों आज मातांच्या कृपेनं तुझं दर्शन झालं."

"पण–पण मी हें काम सोडून दुसरं कसं घेऊं? मला काय कमी आहे? गोड मध आणि फळं, वाल्कलं–सारं सारं किरातांच्या कृपेनें मिळतं. मी शहरांत कशाला येऊं?"

"हेंच तें मी म्हणतों तं. ज्यांच्या अंगीं कुवत नाहीं ते सरकारी दरबारीं मानानें मिरवतात आणि गुणी माणसं इथें तिथें खितपत पडतात. म्हणूनच राजेलोक उन्मत्त होतात. राज्यं धुळीला मिळतात. गुणीजनांची पारख होत नाहीं. तारुण्यांत कशी माणसानें ब्रह्माण्डाला गवसणी घालायची हिंमत धरली पाहिजे! तुझं ध्येय मला माहीत आहे. तुझा संकल्प परमथोर आहे. पण सुनंदा, माझ्या मुला, आपला संकल्प सिद्धीला न्यायला, आपल्यामागें आपली परंपरा ठेवायला एक रक्ताचं संतान तरी लागतं नाहीं तर विद्येचं संतान. तुला यांतलं कुठलं आहे? मातृकांची निर्मिति सोपी नाहीं. मोठ्या लहरी व घातुक असतात त्या. विचार कर. त्यांची लहर फिरली कीं तुला एक घाव आणखी घालूं देणार नाहींत त्या. आणि मी तरी का आतांच तुला शहरांत नेतोंय, का या मूर्ति करूं नको म्हणून सांगतोंय? सोनं उद्यां मी इथें आणून देतों. अगदीं अशाच मूर्ति करायच्या. तीहि मातृकांचीच इच्छा ना? तुला कसली दगदग नाहीं. मीहि तुझ्यासारखा फटिंग आहें: एका काळीं होतों संसारी. पण लोकांमधला बावळटपणा आणि राजे लोकांचा उन्मत्त मूर्खपणा पाहून माझं पित्त खवळलं. आणि हा दुहेरी मूर्खपणा नाहींसा करण्यासाठीं शेंडी सोडून गेलीं बारा वर्षं मी झटतों आहें—झगडतों आहे. एकदां या व्यापांतून सुटलों कीं मग खरंच अशा शांत ठिकाणीं मातृकांच्या चरणांजवळच राहीन झालं ध्यानधारणा करीत."

"आपण फार थोर आहांत. आपली शान्ति कुठें? आणि माझी कुठें? मी खरंच फार दुबळा आहें. भित्रा आहें. पण आपलं नांव नाहीं कळलं मला?"

"माझं नांव विष्णुगुप्त. मूळचा दक्षिणेंतला, पण या उपद्व्यापापायीं गंगाकाठीं आलों झालं."

आणि मग विष्णुगुप्तानें आपले एकेक अद्भुत अनुभव सांगण्यास सुरवात केली. मध व फळें खात खात तो रसाळपणें गप्पा मारीत होता. भारल्यासारखा सुनंद समोर बसून होता. सूर्य पश्चिमेकडे कलला तरी विष्णुगुप्त बोलतच होता. संध्याकाळीं सुनंदाबरोबरच तो त्याच्या झोपडींत आला. सकाळीं तो परतणार होता. रात्रीं निजतांना त्यानें सुनंदाला विचारलें, "मग काय, लागणार ना उद्यांपासून तयारीला? पौर्णिमेचा चांगला मुहूर्त आहे. भाद्रपद पौर्णिमेला काम पुरं झालं पाहिजे. तुझं जन्माचं कल्याण करीन मी. वेड्या, अगदीं त्या मातृकेच्या चेहऱ्याची मुलगी माहीत आहे मला. असा संसार होईल कीं पुरे नको. नर्तनकला तिच्या पांचवीला पुजली आहे—" पुढें विष्णुगुप्त बोलणार इतक्यांत सुनंद म्हणाला, "नको गुरुजी, मी फार सुखी आहें. मला नका कुठें गुंतवूं."

"कां नको? तें कांहीं नाहीं. तुला तुझं कल्याण नको असलं तरी मला हवं आहे. प्रसंगीं महानंदालासुद्धां दाबायला मी कमी करायचा नाहीं. तूं तर काय रे एवढासा पोर. विष्णुगुप्ताची नजर दाटेल तिथें पडत नाहीं. मी म्हणतों तें झालंच पाहिजे. आणि सुनंदा, तूं इथें पळून यायच्या अगोदरची गोष्ट का मला माहीत नाहीं? सारा गांव तुझ्या बापाचं घर जाळायला उठला. तुला मारायला टपला. पण मींच युक्तीनें तें सारं प्रकरण मिटवलं. तुझं घर सुरक्षित राखलं. त्या आजीव-कांच्याकडून पळवलेले तुझे कपडे अजून माझ्याजवळ आहेत—तूं नकार दे कीं फिरून सारं गांव मी वणव्यासारखं पेटवीन. लोकांच्या क्षोभांत तुझ्या म्हाताऱ्या आईबापांची आहुती पडायला वेळ लागायचा नाहीं."

कधीं नव्हे इतकें भयानें सुनंदाचें अंग शहारलें. मघाशीं मातृ-मूर्तींच्या स्मितमुखाशीं स्पर्धा करणाऱ्या मुखांतूनच का हे शब्द निघाले? सावत्रआईनें त्याला नानाप्रकारें छळलें होतें. पण तिच्यांतहि कपटाचा लवलेश त्याला आढळला नव्हता. आजीवकांनीं मोठा व्यूह त्याच्याभोंवतीं रचला होता. परंतु त्यांतहि पहिल्यापासून शेवटपर्यंत केवळ क्रौर्य व धर्म-वेडेपणाखेरीज दुसरें कांहीं नव्हतें. पण आज मात्र कपटाचा उग्र दर्प पहिल्यानें त्याला आला. त्या अंधारांत सुनंद खडबडून उठला आणि "गुरुजी, मला नका नका फासांत घालूं—" असें म्हणत झोंपडीबाहेर धांवत सुटला. पण विष्णुगुप्त अतिशय चपळ. वायुवेगानें त्या थरथर कांपणाऱ्या सुनंदाला त्यानें पकडलें आणि दरडावून तो म्हणाला, "जाबोस

कुठें ? भिल्लांकडे ? पण माझं जाळं अगोदरच मीं दूरवर विणून ठेवलं आहे. तुझं रहस्य मीं फोडलं तर तेहि तुला जिवंत ठेवणार नाहींत. तुला मरायचं आहे ?' "

सुनंदानें ' नाहीं ' म्हणून मान हलवली. खरोखरच जीवनाशिवाय अजूनपर्यंत कुठल्याहि ऐहिक गोष्टीचा अभिलाष त्यानें धरला नव्हता. जगावें व कलेंत रमावें हेंच त्याचें मागणें होतें. मरणाला आपण किती भिलों हें पाहून तो मनांत शरमला.

चंद्रप्रकाशांत त्याच्या मुद्रेवरचे भाव न्याहाळीत विष्णुगुप्त ऊर्फ चाणक्य म्हणाला, " नामर्दानें बलवानाला नकार देऊं नये. माझं ऐकण्यांत तुझं हित आहे. लाणीला हेवा वाटेल अशी प्रेयसी तुला मिळेल. स्वतः-सारखा कलावान् गुणी पुत्र मागें ठेवणें हीच मातृकांची अनुज्ञा आहे. "

सुनंद पुरता बांधला गेला. आणि दुसऱ्या दिवसापासून विष्णुगुप्तानें दिलेल्या विपुल सुवर्णराशींनीं आणि कारागिरीस लागणाऱ्या अपरंपार साधनसामुग्रीनें दिपून जाऊन तो कामास उद्युक्त झाला.

निरोप घेतां घेतां विष्णुगुप्त म्हणाला, " एक गोष्ट महत्त्वाची आहे. या मूर्ति खूप उंच हव्यात आणि पाठीच्या आंतून पोकळ असून आंत माणूस बसेल एवढी पोकळी हवी. हात, पाय, डोकं, वळ लावून फिरतील अशीं ठेव ! " ही विचित्र अट ऐकून तर सुनंद स्तंभितच झाला. जातां जातां विष्णुगुप्त त्याच्या कानाशीं लागून म्हणाला, " मीं तुला हें करायला सांगितलं हेंहि अगदीं या कानाचं त्या कानाला कळतां कामा नये. नाहीं तर माझ्याशीं गांठ आहे. मगधेश्वराचं भविष्य या मूर्ति घडवणार आहेत हें विसरूं नको. " असें म्हणून विष्णुगुप्त निघून गेला. फिरून कधींहि विष्णुगुप्ताचें दर्शन सुनंदाला झालें नाहीं.

भाद्रपदाच्या प्रतिपदेला मूर्ति तयार झाल्या. एकीहून एक सरस, मुखावर विविध भाव दर्शविणाऱ्या कृत्तिकांच्या पद्ममंडलाकृति मचावर बसलेल्या मूर्ति त्यानें केल्या. एकीच्या तोंडावर, बालकाच्या जन्मानंतर दिसणारा मातेचा अपार आनंद दिसत होता; दुसरीच्या तोंडावर, कारुण्य; तिसरीच्या, बालकाला पीडा देणाऱ्याबद्दल दिसणारें संगोपक क्रौर्य; चौथीच्या मुखावर जागृतता; पांचवीच्या मुखावर खेळणीं देऊन बालकाला रिझविण्यास लागणारा खेळकरपणा; सहावीच्या, आजारी बालकाची शुश्रूषा करण्यास लागणारें मार्दव व निर्धार दिसत होतीं. प्रत्येक मातृकेच्या हातांत अर्थातच वेगवेगळीं आयुधें व उपकरणें होतीं. हातांच्या मुद्रा वेगवेगळ्या होता. मानेची मुरड वेगळी होती. एकमेकींना चिकटून बसून त्यांनी एकच एक मोठी माडी निर्माण केली होती. एक एक पाय त्यांनीं लोंबता सोडला होता. त्यांच्या मांडीवर सहा तोंडांचा बालक-कार्तिकेय निजला होता, आणि मोठ्या तृप्तीनें स्तनपान करीत होता. मांडीच्या खालीं असलेला त्याच्या शरीराचा भाग बाराहीनें —दाईनें—ममतेनें आपल्या मांडीवर तोलून धरला होता.

मूर्ति तयार झाली आणि सहा महिन्यांचा डोक्यावरचा भार उतरल्या-सारखं सुनंदाला वाटलें. मधुरिकेच्या मांडीवर मान टाकून भर दुपारीं आज तो स्वस्थ निजला. नर्तकी मधुरिका विष्णुगुप्ताच्या सांगण्याप्रमाणें गेले सहा महिने सुनंदाची पत्नी म्हणून त्या स्थळीं राहिली होती. अहर्निश त्याची बडदास्त राखीत होती. ऋष्यशृंगाप्रमाणेंच भोळा अजाण सुनंद मधुरिकेच्या प्रेमपाशांत हां हां म्हणतां गुरफटला गेला. मातृका जयंतीच्या तोंडावळ्यासारखाच तोंडवळा घेऊन आलेली ही मधुरिका!

किती कौशल्यानें आर्य विष्णुगुप्तानें आपलें अंतर्याम जाणलें ! ज्या विराट् व प्राकृतिक स्त्रीमूर्तीनें आपलें जीवन समग्र व्यापून टाकलें होतें, ती व्यापकता म्हणजेच मधुरिकेसारख्या हाडामांसाच्या स्त्रीची अमूर्त पण जबरदस्त ओढ होती, हें सुनंदाला आतां जाणवलें. किंबहुना, मातृकां-बद्दलच्या त्या अनावर कलामय आसक्तीचें निसर्गदत्त फल म्हणजेच मधुरिका. ज्या विधात्यानें हा भाव सुनंदाच्या अंतर्यामीं सदैव स्फुरत ठेवला होता, त्यानेंच ही मानवी सौंदर्ययुक्त, अतीव स्नेहमय स्त्रीमूर्ति खास सुनंदासाठींच घडवली होती. आणि नवल हें कीं, मधुरिकेला बुजरा सुनंद बुजला नाहीं. जणूं कांहीं शतजन्मींचा स्नेह घेऊनच ती आली होती. एवढेंच नाहीं तर मधुरिकेकडून सेवा करून घेण्यांत त्याला कसलाहि संकोच वाटला नाहीं. त्यानें सांगावें व तिनें ऐकावें असा तो संसार चालला. रात्रंदिवस सुनंदाच्या डोकीवर विष्णुगुप्ताच्या आज्ञेची तलवार लटकलेली होती; तो कामातच गुंग. मधुरिकाहि त्याच्या जवळ जवळ घोंटाळायची. कुठलें नाचगाणें नि कुठलें काय ?—मधुरिकेच्या बाबतींत मात्र विष्णुगुप्ताचा कयास चुकला. नर्तकी जशा गुणी पुरुषांना भुरळ घालून कायमचे आपले गुलाम करतात, त्यांच्या कलेपासून त्यांना वंचित करतात, तसें इथें झालें नाहीं. पुरुषानें नजरेनें खुणवावें व स्त्रीनें मुकाट्यानें त्याच्या मागें जावें, मग तो कड्यावरूनही का फरफटत नेईना, ही जी प्रेमाची प्रतिक्रिया संवेदनाशील स्त्रियांच्या मनावर होते, तीच या बाबतींत गणिकाकुलांतल्या या स्त्रीच्या मनावर झाली. भोळ्या सुनंदाला फसवणें तिच्या शक्तीबाहेरचें काम होतें.

अर्थात् काम पुरें झालें, तेव्हां पाटलीपुत्रांतून एका धनाढ्य व्यापाऱ्यानें हत्ती पाठवून समारंभानें सुनंदाला पाचारण केलें. गणिकांवर अखेर सत्ता राजाचीच असे. तेव्हां मधुरिकेलाहि परत जाणें भाग होतें. सुनंदाला टाकून ती कशी जाणार ? विवाहासाठीं राजाज्ञा घ्यावी म्हणून तिनें सुनंदाला आपल्याबरोबर चलण्याची गळ घातली. सुनंद केवळ तिच्या प्रेमाखातर निघाला. कारण मधुरिका लवकरच आई होणार होती. विष्णुगुप्ताचें भाकीत फळाला येणार होतें. मुलाला घेऊन तीं दोघें फिरून आपल्या वन्य निवासांत परतणार होतीं. पौर्णिमेच्या पांच दिवस अधीं मूर्ति पाटलीपुत्रांत मधुरिकेच्या वाड्यांत पोंचल्या. राजपुरोहित आले. तें अद्वितीय शिल्प पाहून तेहि मंत्रमुग्ध झाले. जुन्या मूर्ति काढून या नव्या बसवणें अनाठायीं होणार नाहीं असें शंकरगुप्ताला मनापासून वाटलें. जुन्या मूर्तींची नजीकच पुनःप्रतिष्ठा करावी, म्हणजे कुठलाच दैवी कोप व्हायचा नाहीं आणि महानंदाचें स्वप्नहि फळून आपल्या दोघांतली अढी दूर होईल, असें त्याला वाटलें. त्यानें जुन्या देवींचा कौल मागितला, नव्यांचा मागितला. संमतीचें उत्तर आलें. तावडतोब महानंदानेंहि स्वतः कौल लावला; आणि तोहि फळला. चतुर्दशीला जुन्या देवी नव्या जागीं नेल्या आणि पौर्णिमेला चंद्रोदयाच्या मुहूर्तावर नव्या मूर्तींची प्राणप्रतिष्ठा झाली. रात्रभर उत्सव चालू होता. सकाळीं मात्र एक अफवा उठली कीं नंदाचे सात राजकुमार एकाएकीं नाहींसे झाले. रात्रीं त्या साती कुमारांनीं उत्सवांत भाग घेतांना साऱ्यांनीं पाहिलें होतें. आणि सकाळीं साती कुमार कुठें कुठें शोधून सांपडेनात. सकाळच्या पूजेच्या वेळीं मातृकांचीं पावलें व अस्त्रें रक्तांनीं भरलेलीं पाहून राजपुरोहिताच्या काळजानें ठाव सोडला. नव्या मातृकांना विरोध असणाऱ्या कुणीं तरी हें अघोर कर्म केलें असलें पाहिजे हें त्याच्या मनानें घेतलें. तावडतोब मंदिराचें प्रवेशद्वार बंद झालें. नगरांत हाःहाकार उडाला.






ही बातमी ऐकून मधुरिकेच्या काळजानें ठाव सोडला. काल रात्रीं किती मानसन्मानानें ती वावरली होती. प्रतिष्ठापनेनंतर लग्नाचा विधि उरकण्याचेंहि अभिवचन महानंदाकडून तिला मिळालें होतें. सान्यांची नजर सुनंदाकडे लागली होती. पाटलीपुत्राला एक नररत्न मिळालें असें जो तो म्हणत होता. आणि रात्रीं?

पाटलीपुत्रांत जन्मापासून वावरलेल्या मधुरिकेला पुढची अटकळ आली. राजकुमारांच्या नाहींशा होण्याचा अर्थ तिला आतां उमगला. आर्य चाणक्याच्या प्रत्येक बोलाचा दुहेरी अर्थ होतो हें तिला आतां कळलें. लगबगीनें ती सुनंदाला म्हणाली, "पहा! तुम्ही आतां क्षणभरहि इथें राहूं नका. परत म्हणून पाटलीपुत्रांत येऊं नका. देवाची इच्छा असेल तर फिरून भेटूं. मी आलें असतें तुमच्याबरोबर. पण आतां माझ्यामुळें तुमचा जीव मात्र धोक्यांत येईल. वेश बदला. भिक्षूचा वेश घ्या. मागें घेतलात तसा. मीच पहिली भिक्षा वाढीन तुम्हांला सान्यांच्या समोर. असं पाहूं नका. दगडासारखं मन घट्ट करायला हवं. आर्य चाणक्याच्या दाढांत फार मोठाले घांस जावचे आहेत. तुम्ही त्यांतून सुटणार नाहीं. आज किती मोठे झालां आहांत तुम्ही. मी वांचेन. बाळाला मी अगदीं तुमच्यासारखं करायचा प्रयत्न करीन. लहान मातृकांची मूर्ति माझ्याजवळ आहे. ती त्याला कला शिकवील. मुलगी झाली तरी तीहि तुमचं शिल्प शिकेल." क्षणभर दोघें एकमेकांना बिलगून राहिलीं. सुनंद फिरून मुका झाला. झटपट यतिवेश घेऊन चोरदारानें वाड्यापुढें उभा राहिला. मधुरिकेच्या अपूर्व गोपनकौशल्यामुळें कुणीं त्याला ओळखलें नाहीं. हां हां म्हणतां पाटलीपुत्रांतून बाहेर पडून सुनंद जड अंतःकरणानें गंगाकांठच्या अरण्यांत शिरला. आणि इकडे पाटलीपुत्र नगरांत त्या रात्रीं त्या प्रचंड मातृकांच्या मूर्ति देवळांत छिन्नविछिन्न होऊन पडल्या. राजपुत्रांचीं प्रेतें मस्तकें तुटलेल्या त्यांच्या पाठीच्या पोकळींत भरलेलीं होतीं. मातृकांचीं शस्त्रें रक्तानें माखलेलीं होतीं. कुणी तरी मातृकांच्या पाठीच्या पोकळींत बसून कळा दाबून त्या शस्त्रांच्या घावानें राजपुत्रांचे प्राण मोठ्या कौशल्यानें घेऊन तीं प्रेतें त्यांतच लपवून ठेवलीं असावींत हें उघड होतें.

म्हातारा महानंद प्रेतासारखा चेतनाहीन झाला. राजपुरोहित व अमात्य नगरांत झालेली बंडाळी मोडण्यांत गुंतले असतांना परक्या शस्त्रधारी लोकांनीं त्यांना गिरफदार केलें. नगराला परक्यांचा वेढा बसला. दोन दिवसांत पाटलीपुत्रांतून महानंदाचें उच्चाटण होऊन चंद्रगुप्त राजा झाला आणि आर्य चाणक्य त्याचा अमात्य झाला.

मधुरिकेला चाणक्यानें तें नगर सोडून जाण्यास फर्मावलें. एवढेंच नव्हे तर उत्तरेकडे जाण्यास तिला अटकाव केला.

नर्मदातटीं रातोरात तिची उचलबांगडी झाली. मात्र मुलाचें पोषण होईल एवढें द्रव्य तिला देण्यांत आलें. मधुरिकेला मुलगा झाला. अगदीं बापासारखा. उपजत कलावंत. नर्मदातटीं चौसष्ट योगिनींच्या देवाल्यां-तील शिल्प शतानंदाच्याच कल्पनेंतून स्फुरलें. त्याच्या व त्याच्या शिष्य-गणांच्या हातून साकार झालें. आजन्म तोच शतानंदाचा ध्यास होता. या योगिनींच्या पहिल्या मूर्तींची पूर्णता झालेली पाहून, वृद्ध मधुरिकेनें समाधानानें देह ठेवला. तिची आणि सुनंदाची भेट फिरून झाली नाहीं. कारण—

कारण सुनंद पाटलीपुत्रांतून निघून दामोदर नदीच्या रोखानें चालला असतांना एक मोठा हत्ती आपल्याला तुडवण्याच्या हेतूनेंच चवताळून आपला पाठलाग करतो आहे असें त्याच्या ध्यानीं आलें. हत्तीच्या पाठीवर यमदूताप्रमाणें भासणारा एक पुरुष बसलेला होता. जीव घेऊन सुनंद पळूं लागला. पण पळून कुठें जाणार? इतक्यांत समोर एक जुनी विहीर त्याला दिसली. तिच्यांत त्यानें प्राण वांचवि-ण्यासाठीं उडी घेतली. ही विहीर मूळची सुकी असून तिचे झरे आटलेले होते. पावसामुळें पाऊलभर चिखलाचें पाणी काय तें तिच्यांत होतें. सुनंद खालीं पडला आणि कशानें तरी त्याची पाठ कापून रक्तबंबाळ झाली. जरा बाजूला वळून पहातो तों त्याच्याच हातानें घडलेल्या मातृकांचे छिन्नभिन्न तुकडे तिथें टाकलेले होते. वेदनांनीं कळवळून सुनंद ओरडला तोंच कुणाचा तरी गारगार वेढा त्याच्या पायांभोंवतीं पडला. एक जहरी साप दंश करीत होता. घाबरून सुनंदानें विहिरीच्या कड्यांशीं आलेलें पिंपळाचें मूळ घट्ट हातांत पकडलें. आणि वर जायचा यत्न तो करूं लागला. वरून हत्ती गर्जना करीत होता. त्याच्यावरचा मनुष्य अदृश्य झाला होता. रागा-रागानें हत्ती तें झाड गदगद हलवूं लागला. एक फांदी मोडली आणि तिच्या आघातानें खालीं लटकलेलें मधाचें मोहोळ फुटून मधमाश्या घोंघावूं लागल्याबरोबर हत्ती त्यांच्या दंशानें कावून गर्जना करीत पळूं लागला, आणि उरलेल्या माश्यांनीं सुनंदाला चावून चावून बावळ केलें. विहिरींत सुनंद पालथा पडला. त्याची शुद्ध जाऊं लागली. वेदनाहि जाणवेनाशा झाल्या. विहिरीवर लोंबणाऱ्या मोहोळांच्या मधाचा पाझर त्याच्या शुष्क उघडलेल्या तोंडांत पडला. सुनंदानें आंवढा गिळला आणि एक अपूर्व उज्ज्वल आणि अतिशय निरागस असें स्मित त्याच्या चर्येवर उमटलें. "मध गोड आहे, मध गोड आहे—" असे क्षीण उद्गार अडखळत बाहेर पडले. त्याच्या डोळ्यांवर झांपड आली. चेहऱ्यावर अपार चैतन्याची चित्कळा पसरली, आणि त्याबरोबर त्याचें सारें अंग क्षणभर थरथरलें. त्याच्या कंठांतूनसुद्धां अगदीं लांबून कुठून तरी, ब्रह्मांडाच्या अगदीं खोलवरच्या गाभ्यांतून यावा तसा हुंकार बाहेर पडला. आणि मग मधाची धार आंत न जातां त्याच्या ओठांच्या कोपऱ्यांतून बाहेर गळू लागली. त्या भग्न मातृकांच्या कुशींत, मोडून तोडून पडलेल्या रुंडमालकाबरोबर तोहि योगनिद्रेंत विलीन झाला.














मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास






# GRAND DIPAVALI ANNOUNCEMENT

*Women Care for Lovely Clothes*

FOR YOUR PRETTIEST THINGS, DELICATE SILKS, GAY COTTONS, STURDY LINENS AND OTHER LATEST AND PETITE FASHIONS, VISIT FASHIONS PARADE WHO HAVE THE LATEST ARRIVALS FROM SWITZERLAND, U. K. AND OTHER COUNTRIES IN THE CONTINENT TO PLEASE LADIES OF ALL AGES AND TASTES.

## FASHIONS PARADE



अनुक्रमणिका

## आईसाठीं जगन्नाथानें ओलांडलेला

# उंबरठा!





दुर्दैव आधीं येऊं नये अन् आलेंच तर तें नातेवाईक माणसाच्या रूपानें येऊं नये. कारण त्याच्याशीं मुकाबला करणें मोठें दुर्घट होऊन बसतें. बाह्य आल्यास सामर्थ्य असलें तर त्याच्या अंगावर बंदुकीचा बार काढतां येईल. पण मेहुण्याला—प्रत्यक्ष बहिणीच्या नवऱ्याला तुम्ही काय कराल! त्याला चटका दिला कीं त्याचं दुःख बहिणीच्या डोळ्यांत उभें रहायचें. तें पाहिलें कीं आईचें काळीज गलबलायचें. अन् आईला दुखलें कीं सरतशेवटीं ती संवेदना आपल्यालाच येऊन भिडायची. जगन्नाथाची नेमकी हीच अवस्था झाली होती.

त्याची आक्का आईची लाडकी होती, अर्जुन सडी होती आणि त्यामुळें अनेकदां माहेरीं ये-जा करीत होती. ती आली कीं तिला पोंचवायला म्हणा, न्यायला म्हणा, तिचा नवरा, म्हणजे जगन्नाथाचा भावजीहि येत होता. पण आजचें त्या दोघांचें येणें कांहीं निराळेंच होतें. आज गड्यांच्या डोक्यावरें पेट्या; वळकट्या होत्या आणि चिरगूट-पांघरुणांचीं गाठोडींहि होतीं. जगन्नाथाला प्रथम कांहीं उमजेना पडेना. संध्याकाळीं मायलेकी एकत्र बसल्या. आक्केनें आत्मपुराण सुरू केलें. आणि तें ऐकल्यावर त्याला उलगडलें कीं—

— पं. महादेवशास्त्री जोशी

अनुक्रमणिका

जगन्नाथाची आई हें सगळं अगतिकपणें पहात होती. तिला आपल्या मुलीची करुणा येत होती. पण प्रकरण तिच्या हाताबाहेर होतें. पोरगी तिच्या हातची गेली होती, आणि पोरगा मात्र अजून हाताला चढायचा होता.

आक्काच्या घरीं हस्तिनापुर निर्माण झालें आहे. कौरव–पांडवांची भाऊबंदकी माजली आहे. भावजीच्या भावानें, बापाच्या मृत्युसमयीं मिळालेलें डबोलें गडप केल्याचा भावजींवर आरोप केला आहे; 'सुईच्या अग्राएवढी मातीसुद्धां तुला आतां इथें मिळायची नाहीं,' म्हणून त्याला घरांतून बाहेर काढलें आहे. या प्रकरणांत सगळा अन्यायी काय तो आक्काचा मोठा दीर असून भावजी अगदीं धुतल्या तांदळागत निर्मळ आहे—अन् तो आतां इथेंच राहून भावाविरुद्ध सरकार-दिवाण करणार आहे...

आणि हें पुराण संपवल्यावर त्याची फलश्रुतीहि आक्कानें आईला ऐकवली—

"शेवटीं 'सत्यमेव जयते'च होईल. आम्हांला घराभायरीं करणीऱ्या त्या दिराचं तळपट होईल. बघशील तूं आई! आतां 'हे' पुरते खवळले आहेत. अन् ह्यांचा राग म्हणजे—"

जगन्नाथाच्या आईनें 'तसंच होवो ग बयो' म्हणून लेकीला आशीर्वाद दिला आणि जगन्नाथ अन् त्याची बायको वत्सला या दोघांना भावजी-साठीं घरच्या डाव्या अंगाची उभी खोली साफ करायला सांगितलें. सुनेनें लगेच केरसुणी उचलली. जगन्नाथानें पाठोपाठ सामान लावलें. स्वतःसाठीं तयार झालेल्या त्या खोलींत आक्का अन् भावजी हें जोडपें "सुखं च मे शयनं च मे' साठीं प्रविष्ट झालें तेव्हांच जगन्नाथ अन् वत्सला यांना स्वतःच्या शयनगृहांत जाण्याची अनुज्ञा मिळाली. त्या रात्रीं जगन्नाथाला लवकर झोप येईना. तो वत्सलेला म्हणाला

"आतां कसं ग?"

"हा प्रश्न माझा आहे."

"म्हणजे?"

"इतके दिवस सासूबाई एकट्या होत्या. आतां त्यांच्या जोडीला वान्सं. दोन पात्यांची कात्री अन् मध्यें माझे तुकडे."

"कांहीं घाबरूं नकोस तूं. मी आहें."

"कशाला मी आहें? यां घरांतल्या काडीवर तरी सत्ता चालते का तुमची? सासूबाई तुम्हांला अजून कुकुलं बाळ समजतात!"

"अग चल! पाहीन-पाहींन अन् अधिकच झालं तर एक घाव अन् दोन..."

तीं कांहींहि म्हणोत; पण त्या दोघांच्या पोटांत त्या दिवशीं भयाचा गोळा उठला हें खरें. आतां त्यांना एकमेकावांचून कोणाचा आधार नव्हता. एकमेकांचें बळ घेऊन त्यांना आतां दुप्पट व्हायला हवें होतें. न बोलतां त्यांना तें कळलें आणि त्या रात्रीं त्या दोघांची मिठी अधिकच दृढ झाली.

जगन्नाथ म्हणजे त्या गावचा ग्रामामित्र. त्याच्याच वयाचे सात आठ तरुण त्या गांवांत होते. ते एकमेकांच्या घरीं जात होते, खात होते, पीत होते, कामाधामांत एकमेकांना मदत करीत होते, अन् फुरसतीच्या वेळीं सगळे जमून पत्तेहि खेळत होते. अगदींच छोटेंसें गांव; त्यामुळें तिथें सद्भाव होता, सहकार्य होतें. प्रत्येकाला प्रत्येकाची गरज पडायची. एका पाटाच्या पाण्यावर जगणारा, नांदणारा तो लहानसा मानवगुच्छ होता. कोणाला कोणाच्याहि घरीं परकेपणा नव्हता.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं जगन्नाथ गुरें राखण्याच्या स्वाधीन करून घरीं आला, तेव्हां त्याच्यासंगें गणप्या आणि मोऱ्या हे दोघे सोबती होते. आल्यावर त्यानें आईला म्हटलें,

"आई गे! आम्हांला खायला दे."

आईनें त्या तिघांसाठीं केळीचे फाळके मांडून त्यांवर दशमी अन् चटणी वाढली. तिघेहि गप्पागोष्टी करीत खाऊं लागले. त्यांचा तो घरांतला हास-परिहास माजघराच्या अंगणांत आपलीं कागदपत्रें वाचीत बसलेल्या भावजीच्या कानीं आला. त्याची एकतानता भंगली. तो उठला अन् घरात आला. गणपतीच्या दोंदाचा, बेंबीखालीं पंचा नेसलेला, जानव्याची निवीति पोटावर रुळणारा, थलथलीत थोबाड खांद्याला चिकटलेला, लठ्ठपणामुळें कायमचे आडवेच डोळ्यांत भरणारा, बाहुल्याच्या शेंगांसारख्या जाड चिकटलेल्या बोटांच्या मुठींत केळीच्या शेनवताची लांब विडी धरलेला एक काळासांवळा पुरुष पुढें उभा राहून आपल्यावर डोळ्यांतले निखारे फुलवीत आहे, हें जेव्हां गणप्या अन् मोऱ्या यांनीं पाहिलें तेव्हां त्यांचें हास्य तर मावळलेंच; शिवाय तोंडांतला घास तोंडांतच घुटमळला.

"काय रे, तुम्हांला तुमचीं घरं नाहींत? लोकाच्या घरीं मांड्या ठोकून दशम्या हादडायला शरम नाहीं वाटत?"

तें मुलगे लगेच पान टाकून उठले अन् चालते झाले. आक्कानें आईकडे दृष्टिक्षेप करून सुचवलें कीं, 'बघ आई! याला म्हणतात व्यवहारज्ञान.' पण हें जावयाचें व्यवहारज्ञान सासूला विशेषसें रुचलें नाहीं. जगन्नाथ तर 'आ' वासून बघतच राहिला. त्या बिचाऱ्याला मान तोडल्यागत झालें. पण एवढ्यांत भावजी जगन्नाथावरहि घसरला

"काय रे जगन्नाथ! तुझ्या घरांत काय समाराधना आहे? आल्या-गेल्याला म्हणे दशमी दे. मडक्या-मुळ्यावर चढतील अशानं."

जगन्नाथाचा तो दिवस अत्यंत अस्वस्थतेंत गेला. ती बातमी त्याच दिवशीं गांवभर पसरली. दुसऱ्या दिवशीं गुरांच्या नाळेवर तिची चर्चाहि झाली. "आतां जग्याच्या घरीं जाणं म्हणजे विचार करायला हवा!" गणप्या म्हणाला. जगन्नाथानें तोंड बघण्यालायक झालें. म्यायाकडे त्याचे सोबती येणार नाहींत म्हणजे त्यानें तरी कोणत्या तोंडानें त्यांच्या घरीं जायचें?—त्या दिवशीं मोऱ्याच्या दाराकडून तो आला. पण त्यानें बोलावलें तरी त्याच्या पेडवीवर चढला नाहीं.

घरीं येतो तों भावजी दह्याचें पाळें समोर घेऊन न्याहारीवर यथास्थित ताव मारीत बसला होता. जगन्नाथाला तें पाहून अंतरीं सहस्र विंचू डसले. वस्तुतः तो घराचा मालक; पण तो घरीं येईपर्यंतहि






अनुक्रमणिका

भावजीला दम निघाला नव्हता अन् पोगआर्धां जावयापुढें 'चाळघटी' ठेवतांना आईच्याहि जिवाला कांहीं वाटलें नव्हतें. वत्सलेनें जेव्हां त्याचें पान पुढें आणलें, तेव्हां तो बुटकपणें म्हणाला, 'मला नको. मी खाऊन आलों आहें.' आणि तो तेथून बाहेर चालता झाला. वत्सलेला त्यांतलें खोटेपण उमगलें होतें. ती पाटावर तांदूळ धूत असतांना तो जेव्हां निसाण्यावर कोरती घासायला आला, तेव्हां ती म्हणाली, "तुम्हीहि खाऊं नका. अन् मी पण खात नाहीं. आपण दोघे समिधेसारखीं सुकून राहूं या. हं ऽऽ!"

"म्हणजे ? तूं दशमी खाल्ली नाहींस ?"

"घरांत उपाशीं असतांना आपण खायचं हें माझ्या आईनें शिकवलं नाहीं मला." वत्सलेनें एक सजल कटाक्ष जगन्नाथावर टाकला.

त्यानें 'च्-च्' म्हटलें; पण पुढचें ऐकायला ती थांबली नाहीं. ती वाटेवरून अंगणांत अन् अंगणांतून पडवीवर गेली आणि तिच्या जोडीनें रोवळीच्या कोपऱ्यांतून अखडपणें एक जलधाराहि गळत गेली. जगन्नाथाला वाटलें कीं ती वत्सलेच्या अंतरांतली प्रेमधाराच आहे.

जगन्नाथाच्या पडवीवर एक उंच सोपा होता, त्यावर बसून भावजी वाटेनें जाणाऱ्या-येणाऱ्यांच्या बचेऱ्या मारी. तो त्याचा नित्याचा व्यव-साय ठरला होता. घरीं आलेल्याचें कांहीं तरी [illegible] नसलें, वैगुण्य काढून तो आपणच खो खो हसत सुटे अन् तो माणूस खट्टू झाला कीं वर आक्काकडे पाहून डोळे मिचकावी. एक दिवस शेजारचा दामूआण्णा कांहीं तरी कामासाठीं पडवीवर आला तर भावजीनें 'या गुरुमहाराज !' म्हणून त्याचें स्वागत केलें. तो गांवांतलें पुढारीपण करी म्हणून त्याला तो टोला होता. पण त्यानें अगदीं भोळा भाव दाखवून प्रत्युत्तर केलें,

"भावजी, माझी एवढी पदवी चढली नाही अजून."

"मग केव्हां चढायची ?"

"भावाच्या टाळूवर हात फिरवून सासुरवाडीला जाऊन पडलों, म्हणजे मग !"

दामूआण्णाचा हा फटकारा अगदी ओल्या वादीचा होता. भावजींना तो अगदी कडकडून झोंबला. त्यानें हातांतली विडी टाकून खोलीची वाट धरली. जगन्नाथाला हायसें वाटलें. त्यानें वत्सलेकडे नेत्रसंकेत केला, आणि तिचेहि डोळे समाधानानें लुकलुकत असल्याचें त्याला दिसलें.

त्या दिवशीं संध्याकाळी पडवीवर बैठक भरली. भावजीनें डाव्या हाताच्या तळव्यावर उजव्या हाताची बुक्की मारीत आणि आपली फांफशी काया गदगदा हलवीत नाकांतल्या आवाजांत म्हटलें 'मी सासुरवाडीला येऊन पडलों म्हणून या ग्रामस्थांच्या बापाचं काय खरचलं ?' त्यावर 'बघवत नाहीं; डोळे फुटतात लोकांचे' म्हणून आक्कानें अटकित्यानें कच्दिशीं सुपारीचा रोटा कापला. 'लोकांचं कशाला ऐकावं आपण ! बोलतील तिकडे ऐकतील.' प्रेमळ सासूनें त्यावर सांत्वनाचें सारवण घातलें.

अलीकडे घरांतल्या त्या तिघांहि मोठ्या माणसांनीं वांटणी करून घेतली होती. आक्का अन् आई यांनीं वत्सलेला सरळ करायचें अन् आक्का अन् भावजी मिळून जगन्नाथाला शिस्त लावायची. भावजीचें स्पष्ट मत होतें कीं जगन्नाथानें कुळागरांतलें, शेतांतलें काम झाल्यावर सरळ येऊन पडवीवर बसावें. ते मित्र नकोत नि त्या चकाट्या नकोत. आपल्या पायांवर पाय द्यावे, कमरेवर बुक्क्या माराव्या, पाठ कांडुळावी, हेंच त्याच्या दृष्टीनें जगन्नाथाच्या नरदेहाचें सार्थक होतें. अन् आईचें त्याला पाठबळ. त्याला आपल्या दृष्टीसमोर ठेवून सुतासारखा सरळ करणें हें

जसं भावजी या नात्यानें तो आपलें कर्तव्य समजत होता. जगन्नाथानं झुरुडी दिली अन् तो शेजाऱ्याघरीं पत्ते खेळत असल्याचा वास लागला कीं भावजींची हलट ठेवलेली—

"जगन्नाऽऽथ !"

बिचारा जगन्नाथ शेतांतला डाव टाकून घरीं पळत येई. आल्यावर भावजींचा डावा तळव्यावर उजव्या मुठीचा बुक्का मारून भोकांतला सवाल—

"कॉय मिळालॅं राजावर एक्का मारून रे? कुठला मोकासा घेत-लॉस रेऑं! मूर्ख कुठला! विष्णुसहस्रनॉम म्हण बसून इथें."

या नित्य जाचाला कंटाळून तो एक दिवस एकांतीं आपल्या आईला म्हणाला,

"भावजींना घरांतून जायला सांग.—तुला जड वाटत असलं तर मी सांगतो."

त्यावेर आई त्याच्यावर वाडग्याएवढे डोळे करून कडाडली,

"मूर्ख आहेस. त्यांच्या घरीं अन्न नाहीं म्हणून का ते तुझ्या घरीं आले आहेत? तुला वडिलांचं छत्र नाहीं, पाठीचा भाऊ नाहीं. अशा स्थितींत ते तुझ्या घरों आले हा केवढा आधार तुला! मेल्या, दगड समजून चिंतामणि पायांनीं लोटायला निघालास, तें तुला कांहीं कळतं का? त्यांचं सरकार-दरबारांत केवढं वजन आहे! अन् हीच का तुझी बहिणीची माया?—तरी बरी, एकच आहे. भलतं-सलतं त्यांना कांहीं बोलशील तर नाक आदळून प्राण देईन तुझ्यापुढं..."

जगन्नाथाला आईचा राग आला; पण पुढं बोलतां येईना. तो तिथून उठून कुळागरांत चालता झाला. कुळागराच्या शीतल छायेंत आणि जळाच्या जवळकेंतहि त्याची ती मानसिक आग शमली नाहीं. एवढ्यांत तिथं त्याला वत्सला. दिसली ती तळींत धुतलेलं धुणें जवळच्या पोफळींना बांधलेल्या दांडीवर वाळत घालीत होती. तिनं त्या वस्त्राचा एक पदर ओढला आणि त्या भारानें दांडी सुटून खालीं आली. तिनें जगन्नाथाला पाहिलें आणि उभारत हाक मारली. तो जवळ येतांच त्याला दांडी बांधून देण्याबद्दल विनवलें. तो तिला मदत करायच्याऐवजीं 'वेंधळी आहेस—गाढव आहेस—अक्कलशून्य आहेस !' अशी तिची खरडपट्टी काढीत सुटला. वत्सलेनें तें सगळें निरपराध बोलणें ऐकून घेतलें अन् न राहवून त्याला म्हटलें,

"ही वर्षा वन्संच्या अन् भावजींच्या धुण्याची मोट. धुतां धुतां माझ्या दंडांचे तुकडे पडले अन वर तुम्ही मलाच तापतां. मलाच नव्हे; माझ्या आई-बापांनामुद्धा अक्कल नव्हती म्हणून त्यांनीं मला तुमच्या घरीं दिलं. घरांत सगळ्यांची बोलणीं खातें तीं तुमच्या आशेवर. अन् तुम्हींच असं करूं लागलांत तर..."

वत्सला मटकन् खालीं बसली अन् तिनें आरक्त तळव्यांमध्यें आपलें तोंड झाकून स्फुंदायला सुरुवात केली. जगन्नाथाची सणक एकदम उतरली. त्या अश्रुंनीं अन् कटल्या जिवाला आपल्या बोलण्याने क्लेश दिल्याबद्दल त्याला फार वाईट वाटलें. घरांतल्या त्या दूषित वातावरणांत तीच एकटी त्याची कैवारीण होती. मग त्यानें तिची धाडी ते बांधून दिलीच अन् जातां जातां इकडेतिकडे पाहून तिच्या आसवांचें हास्यांत रूपांतर करायलाहि कमी केलें नाहीं.

भावजी एकच महत्त्वाचा उद्योग करी आणि तो म्हणजे डिचोलीच्या वाऱ्या. डिचोली हें कोर्टकचेऱ्यांचें ठाणें. त्यानें तिथें भावाविरुद्ध दावा मांडला होता. डिचोलीहून घरीं आला कीं जेवायला बसल्यावेळीं तो आपल्या बायकोला नि सासूला आपण त्या रणक्षेत्रावर आज वाणीची तलवार कशी वापरली तें मोठ्या फुशारकीनें सांगे. मग सासू कौतुकानें मनांत म्हणे, 'वकील ग बाई!'

भांडणें, भांडायला लावणें आगींत तेल ओतणें, मजा पहाणें अन् शक्य तर त्यांतूनच आपल्या पोळीवर तूप ओढणें हा भावजीचा जातिस्वभाव होता. त्यामुळें त्या गांवचा एकोपा त्याच्या डोळ्यांत खुपे. कुठें तरी ठिणगी पडावी, तें प्रकरण कोर्टांत जावें आणि त्याची वकिली आपल्याला मिळावी अशी त्याची आकांक्षा होती. त्या उद्देशानें त्याची काकदृष्टि सगळीकडे भिरभिरत होती.

चिंतोबा आणि रामनाथ हे दोघे त्या गांवचे सख्खे भाऊ. दोघेहि वांटण्या करून विभक्त झाले होते; पण एकमेकाचें प्रेम संभाळून होते. या भावजीची विखारी नजर त्यांच्यावर गेली. त्या दोघांत धाकटा होता तो रामनाथ. भावजीनें त्याच्याशीं सलगी धरली. आपलें मोठेपण नि शहाणपण तो त्याच्या अक्कल हुशारींत कोंबू लागला. तो भारला जातो आहे असें दिसून आल्यावर हळूच एक दिवस त्याच्यापुढें त्यानें सूतोवाच केलें,

"तो झरीपासला माड तुझा भाऊ खातो याचा अर्थ काय रे? तो तर चक्क तुझ्या सीमेंत आहे. भाऊ तुला 'पिशाक पिंपळ' दाखवतो अन् आपली तुंबडी भरतो. अन् तूं आपला तुकाराम. अरे, एक माड म्हणजे वर्षाचं बारा पंधरा रुपयाचं उत्पन्न. तूं यंदा गणेशचतुर्थीच्या पाड्याला तो माड पाड. जाऊं दे भावाला कोर्टांत. मी बघून घेईन."

एकदा, दोनदा, तीनदा असें परोपरीनीं भरवल्यावर रामनाथाचा लोभ जागृत झाला. मग खरोखरच एक दिवस त्यानें तो माड पाडला. भावजीला हर्षाच्या उकळ्या फुटल्या. एक मासा त्याच्या गळाला अडकला. चिंतोबानें तें पाहिलें आणि तो संतापला. भावाभावांत बाचाबाची झाली. रामनाथाचीं दुरुत्तरें ऐकून चिंतोबानें डिचोलीला जाण्यासाठीं डोक्याला रुमाल बांधला.

वाटेंत दामूआण्णाची आणि त्याची गांठ पडली. दामूआण्णा हा त्या गांवचा अनभिषिक्त पंच. त्यानें चिंतोबाला फिरवून आणलें. दुसऱ्या दिवशीं गांवकीचा मेळा बोलावला. दोघांहि भावांना एकत्र आणलें. रामनाथाला प्रश्न विचारताच तो भावजीच्या जोरावर भिशाटें उडवूं लागला. दमूआण्णानें त्याला म्हटलें,

"तुझं बाष्कळ बोलणं नको. तो माड चिंतोबाचा आहे हें सगळ्या गांवाला ठाऊक आहे. तुलाहि तें ठाऊक होतं. पण आज नळराजाप्रमाणें तुझ्या हृदयांत कलि शिरला आहे. या गांवांत चार महिने तो दबा धरून बसला होता. आज त्यानें तुला गाठलं. ठीक आहे. मी हा एक नारळ तुळशीच्या पायरीवर ठेवतों. 'मीं पाडलेला माड माझा आहे,' असं या गांवकीच्या देवत म्हणून तूं तो नारळ उचल. चिंतोबाला मी तो माड तुला द्यायला लावतों. आजच नव्हे; वंशपरंपरेनें."

दामूआण्णा उठला. त्यानें तुळशीपाशीं समई लावली आणि पायरीवर एक असोल्या नारळ ठेवून दिला. "हं, ऊठ" त्यानें रामनाथाला म्हटलें. पण रामनाथाचें बूड उचलेना. तो बसल्या जागीं कांपूं लागला नि काळाठिक्कर पडला. त्यानें आपली चूक कबूल केली. दामूआण्णाचा हेतु साध्य झाला. तो म्हणाला,

"तूं वाईट वाटून घेऊं नको. ही तुझी बुद्धि नव्हे, हें मी जाणतों. दुर्जनांची सावली पाडून घेतली कीं असाच बुद्धिभ्रंश व्हायचा. अरे, 'हर हर' म्हणणारे पुष्कळ असतात, पण आगीचे चटके सोसावे लागतात जी सती जाणारी असते तिला. झालं तें झालं. तुझ्यांतलं सत्य अजून मेलं नाहीं, ही समाधानाची गोष्ट आहे. घरीं जा, तूं पाडलेले नारळ चिंतोबाच्या घरीं पोंचते कर."

त्यावर चिंतोबा म्हणाला,

"नको. ते त्याच्या मुलाबाळांना खाऊं देत. त्याची बुद्धि ताळ्यावर आली त्यांतच मला सगळं पावलं."

तो विषय संपला. जमलेले लोक पंचे झटकून उठूं लागले, हें पाहून दामूआण्णा पुन्हा म्हणाला—

"थांबा. ही बैठक एवढ्यावर संपली नाहीं. आज आपल्याला आणखी एक महत्त्वाचा निर्णय घ्यायचा आहे. आपल्या गांवांत एक दुष्ट कीड येऊन बसली आहे. जगन्नाथाच्या आईनें तिला आपल्या घरी पोसलें आहे. जगन्नाथाच्या भावजी आपल्या घराला चुडणी लावून इथं आली आहे. या गांवातहि त्याला आगी-जाळ उठवायची आहे अन तिच्यावर आपली पोळी भाजायची आहे. याच्याकडे त्याची निंदा अन त्याच्याकडे याची चुगली असं त्यानें चालवलं आहे. एकाला सांगायचं 'रां' अन् दुसऱ्याला सांगायचं 'डे' आणि कशी काय ठिणगी उडते तें पहात बसायचं. या गांवांतली निंदणूक बिघडली कीं त्याची पंढरी पिकणार आहे. याला आतां एकच उपाय—तो म्हणजे आजपासून आपण सर्वांनीं जगन्नाथाचं घर वर्ज्य करायचं. जोंपर्यंत त्याची आई आपल्या कौतुकाच्या जावयाला घरांतून घालवीत नाहीं, तोंपर्यंत जगन्नाथाच्या घरीं अन्नोदक घेणं नाहीं. त्याच्या कवाडींत पाय ठेवणं नाहीं मंडळी मी म्हणतों हें तुम्हांला कबूल आहे का?"

सगळ्यांनीं एकमुखानें 'कबूल' म्हटलें. पांचामुखीं परमेश्वर गरजला. बहिष्कार हें त्या छोट्या गांवाचें नारायणास्त्र होतें. बहिष्कृत म्हटलें कीं त्याचा गावाशीं संबंध तुटला. तो गांवांत असून गांवाबाहेरा झाला. मग त्याचें हाल कुत्रा खायचा नाहीं. या अस्त्राच्या भीतीनें प्रत्येक जण आपापल्या मर्यादेंत वागे. त्यामुळें गांवाचें ऐक्य अबाधित राही. एखादे-वेळीं चीर गेली तर ती चटकन् सांधली जाई. बहुतेक न्यायनिवाडे तिथल्याच निःस्वार्थी पंचांच्या मुखानें होत. कोणी उडूं लागला, मातूं लागला तर तावडतोब त्याच्या डोळ्यात अंजन घातलें जाई.

भावजीला हा गांवकीचा निर्णय कळला. त्याला वाईट वाटलें. त्याच्या कपाळाला आठ्या पडल्या—पण त्या बहिष्कार पडला म्हणून नव्हेत, तर एक आयतें हातीं आलेलें रामनाथाचें सावज निसटलें म्हणून. गांवच्या लोकांनीं हा कोर्टांत जाण्याजोगा नामी विषय आपसांत निकालांत काढला, ही गोष्ट त्याच्या स्वार्थाच्या दृष्टीनें बिघडली.

पण खरें दुःख झालें तें जगन्नाथाला. आपण समुदायांतून वेगळे पडलों, जणुं माणसांतून उठलों, या जाणिवेनें तो तळमळूं लागला. त्यानें घरीं येऊन घडला वृत्तांत आईला सांगितला. तीहि क्षणभर अस्वस्थ झाली. जावयामुळें ही आपत्ति ओढवली, हें न कळण्याइतकी ती मूर्ख नव्हती. बहिष्काराचे परिणाम तिला ठाऊक होते. तिनें पर्यायानें सूचना व्हावी म्हणून भावजीपुढें तो विषय काढला. लगेच भावजीच्या डाव्या तळव्यावर उजव्या हाताची बुक्की बसली.

"तुम्ही मुळींच घाबरूं नका. दशम्या-पोहे वांचले. जेवे-खौंवे वांचले. गांववाल्यांवाचून कांहीं अडत नाहीं तुमचं. मी आहें खंबीर. एकेकाला असा वेगवतों! बहिष्कार घालतात काय!—इथें कांहीं भाजून पेरलेलं नाहीं म्हणावं..."

सासू जावयाच्या शब्दशौर्यावर आश्वासली. दुसऱ्याच दिवसापासून बहिष्काराचा अंमल दिसूं लागला. कोणी त्यांच्या कवाडींत पाय देईना. गणेशचतुर्थीच्या दिवशीं चंद्र दिसूं नये म्हणून माणसें जशीं विरुद्ध दिशेला किंवा खालीं पाहून चालतात, त्याप्रमाणें वाटेनें जाते-येते शेजारी त्या घरावर नजर पडूं नये म्हणून पाटाकडे पहात चालूं लागले. जगन्नाथाचें घर जणुं महारोग्यांचें घर ठरलें

जगन्नाथ त्या दिवसापासून उदास झाला. त्याला कशांतच गोडी उरली नाहीं. तो घरांत धड जेवीना कीं कोणाशीं धडपणें बोलेना. घरां-



अनुक्रमणिका

तल्या कोणांचेंहि मुखावलोकन नको असें त्याला वाटूं लागलें. तो कारणा-पुरेसा घरीं येई अन् दिवसभर कुळागरांतच मांडलेला असे, म्हणा, चुडतांच्या ढिगाऱ्यावर म्हणा, सुंदपणें पडून राही. वत्सलेचा जीव त्यामुळें तिळ-तिळ तुटे. ती मोठ्या माणसांची नजर चुकवून कुळागरांत येई, त्याच्या आळवी आणि डोळे ओले करी. मनांत आलें तर तो तिच्याशीं दोन शब्द बोले, नाहीं तर तसाच तिच्या अंगावर खेकसे. मग ती त्याला ऐकूं जाईल असें रडतच बोले,

"तुम्हां सगळ्यांना राग आहेत, लोभ आहेत, दुःखं आहेत. मी तेवढी त्या घरांतली भावनाशून्य शिळा. माझी कशाला कोणी वास्तपुस्त करायची! माझी तडफड दिसत नाहीं तुम्हांला. ईश्वराला तरी डोळे असू देत म्हणजे झालं"

प्रतिवर्षाप्रमाणें भाद्रपद उगवला अन् घरोघर गणपती आले. पण धुपारतीसाठीं, उत्तरपूजेसाठीं जगन्नाथाच्या घरीं कोणी आलें नाहीं. पंच-खाद्याची एक मूठसुद्धां खर्च झाली नाहीं. वर्षाला तो गणपतीची मांडवी भरगच्च बांधायचा; पण या वर्षी आंब्याचे चार टाळे लोंबण्यापलीकडे त्यानें कांहीं केलें नाहीं. फटाक्यांच्या एकाहि माळेला उदबत्ती लावली नाहीं. भावजीनें गणपतीची पूजा सांगितली आणि त्यानें केली. त्या पूजेंत अंतःकरणाचा ओलावा नव्हता. आनंदाचा अनुभव नव्हता. दुसऱ्या दिवशीं त्यानें गणपति उचलला अन् तो अश्रूंनीं ओला करीत चोरा-सारखा एकट्यानेंच नेऊन वहाळांत बुडवला!

त्या रात्रीं गांवांत उत्सव मांडला होता. घुमटें धिमधिमत होतीं, मृमेळ कडकडत होते. झांजा खळखळत होत्या. फटाके वाजत होते. आरत्या-मंत्रपुष्पाचे द्वारस्वर उठत होते. ती काळी, पावसाची रात्र नुसती दुमदुमून राहिली होती. एकेका घरचे गणपती बुडत होते. केळीं, पपनसें, नारिंगें, महाळुंग, काकड्या हीं मांडवीचीं फळें तटातट तुटत होतीं आणि पंचखाद्याबरोबर सर्वांच्या मुखीं लागत होतीं. गांवांतलीं लहानथोर माणसें एकत्र जमून आपापल्यापरी सणाचा आनंद लुटीत होतीं.

पण तसें पाहिलें तर गावांतल्या लोकांनाहि त्या उत्सवानें खरें सुख नव्हतें. त्या रात्रीं शंभरदा तरी त्यांनीं जगन्नाथाची आठवण काढली या उत्सवाच्या महापर्वात आणि जगन्नाथाला अडगळीसारखें फेकून दिलें ही बोंचणी सर्वांनाच लागली होती. जगन्नाथ हा या गांवची उत्सवमूर्ति होता. प्रत्येक गोष्टींत पुढें. पोंचवायच्या वेळीं प्रत्येक गणपति तो उच-लायचा. वाजवतां वाजवतां एक तरी घुमट त्यानें त्या रात्रीं फोडायचेंच. 'राजाधिराजाय' सुरू झालें कीं त्याचा आवाज टिपेला भिडायचा. पत्ते खेळायला बसला तर त्याचें पान सर्वांत मोठ्यांदा वाजायचें. कुठेंहि ढकला, सदा हसतमुख. त्यामुळें लोकांना घरोघरीं त्याची अनुपस्थिति जाणवत होती. त्याच्यावर कोणाचाच रोष नव्हता; पण तो मात्र त्यांच्यां-तून बाजूला पडला होता.

बहुतेक गणपती दीड दिवसाचे गेले. उरलेले पांचव्या, दहाव्या दिवशीं गेले. पुढें आला पक्षपंधरवडा. घरोघरीं महालय सुरू झाले. 'इष्टैःसह भुज्यताम्' ही धर्माची आज्ञा पाळण्यासाठीं प्रत्येक गृहस्थ शेजारच्या सगळ्यांना जेवायला बोलवी. जगन्नाथानें तेंहि पाहिलें. त्याहि बाबतींत तो वंचित झाला. ज्या घरीं पक्ष असेल त्या घरीं मांडवावरची शाकभाजी आणि दह्याचा गाडगा रवाना करायचा ही त्या गांवची रीत. जगन्नाथाच्याहि घरीं दुभतें होतें. त्याच्याहि मांडवावर दोडकीं–पडवळें लोंबत होतीं. पण तीं सगळीं अभागी होतीं. दिल्या-घेतल्यांचें दुःख तीं जगन्नाथाला देऊं शकत नव्हतीं. त्याला हें सगळें असह्य झालें. आला दिवस दीर्घ नि कंटाळवाणा होऊं लागला.

मग एक दिवस त्याला कांहीं तरी वाटलें अन् तो दामूअण्णाच्या घरीं आला. दामूअण्णानें त्याला प्रेमानें 'ये–बस' म्हटलें. तो कांहीं क्षण मूकस्तंभ बसला अन् मग म्हणाला,

"दामूअण्णा! तुम्हीं मला टाकलंत. टाका बिचारे. पण मला आतां या गांवांत जगणं अशक्य आहे. मीं ग्रामत्याग करायचं ठरवलं आहे. सांगून गेला नाहीं असं होऊं नये, म्हणून तुमच्या कानांवर घालतों. घरीं कोणाला न कळवतां मी काळ्या रात्रीं..."

आणि जगन्नाथला हुंदका फुटला. त्यानें ठरवलें होतें तें कुडी आणि प्राण यांच्या वियोगाइतकेंच दुर्धर होतें. दामूअण्णाहि त्यामुळें विचलित झाला. जगन्नाथाच्या जवळ जाऊन अन् त्याच्या खांद्यावर हात ठेवून त्यानें म्हटलें,

"जगू, असं कांहीं करूं नको. हा बहिष्कार आम्हीं तुझ्यावर घातला नाहीं, तर आमच्यावरच घातला आहे. मी दरवर्षी गणपतीची गोवसमा-राधना घालतों, तुला ठाऊक आहे. यंदा मीं ती घातली नाहीं. कां, सांग पाहूं? तुला बोलावतां येणार नाहीं म्हणून. मीं तुझ्याबरोबर ओलं जाळलं. निरुपाय होता माझा. पण तूं मात्र असला अविचार करूं नको










असून थोडं सोस. मग सगळं गंगाजळ होईल. मी डोळ्यांत तेल घालून बसलों आहें—"

"नाहीं, दामूआण्णा—यापुढें सोसायची तयारी नाहीं माझी. गौरी-गणपती असे गेले. आतां दिवाळी तशी जाईल. तुम्ही सगळे एकत्र जमाल. घरोघरीं जाऊन पोहे खाल. मजा करशाल. माझं घर वगळाल. पत्ते खेळाल, आनंद कराल. मला मात्र तोंड लपवून बसावं लागेल. महारोग्यासारखं दूर रहावं लागेल. रागानं ज्याला ओवाळून टाकलं त्यानं गांवांत राहूं नये हेंच खरं! माझा निश्चय आतां बदलायचा नाहीं."

जगन्नाथानें दामूआण्णाला चांगलेंच पेंचांत धरलें. तो बहिष्कार वस्तुतः त्याच्यावर नव्हता; पण बाधला होता मात्र त्याला. दामूआण्णाला तें ठाऊक होतें. तो जर आता गांव सोडून निघून गेला असता तर तें त्याच्या वांट्याला मोठेंच अपयश होतें. त्यामुळें दामूआण्णा विचारांत पडला. थोड्या वेळानें त्याला कांहीं तरी सुचलें. तो जगन्नाथाला म्हणाला,

"तूं जाणार हें निश्चित ठरलं का?"

"होय, निश्चित."

"मग चल माझ्याबरोबर."

"कुठं?"

"मी नेईन तिथं."

"हा आलों. चल!"

ते दोघेहि निघाले. दुर्गाच्या खाचऱ्यांतून कुळागरांत उतरले. तिथून अरुंदश्या उभ्या दांड्यानें चितोबाच्या घरापर्यंत पोंचले. अन् मग पुढें कुठें गेले तें मात्र कळलें नाहीं. दामूआण्णा थोड्या वेळानें परत घरीं आला. पण त्याच्याबरोबर जगन्नाथ नव्हता. दुपार झाली, दक्षिणायनांतला सूर्य मध्यान्हावरून कलला. घरोघर नैवेद्य-वैश्वदेव चालू झाले, कावळे काकबळीसाठीं गोळा झाले, तरी जगन्नाथ घरीं पोंचला नाहीं. वाट पाहून पाहून त्याची आई दमली आणि अंगणांत उभी राहून त्याला कुकारे घालूं लागली.

"जगन्नाथ रे हु हूऽऽऽ!"

भावजीचें पित्त तापलें होतें. वैश्वानर खवळला होता. घरांत पानें मांडून तयार होतीं. केवळ जगन्नाथामुळें त्याच्या हाता-तोंडाची गांठ पडायला विलंब लागत होता. भावजीला त्याचा राग आला. तो नाकांतल्या नाकांत पिरपिरूं लागला, 'रांडेच्याला दुपार नाहीं, तिपार नाहीं. कुठें तर तोंड करून भटकतो देव जाणे!' आणि त्यानें बायकोला आपल्या पानांत भात वाढायला सांगितलें. अत्रीच्या अनसूयेनें त्याची आज्ञा पाळली. भावजी आपोष्णी घेऊन घांस भरूं लागला.

जगन्नाथाची आई अंगणांतून सारखी हाकाटीत सुटली होती; पण तिच्या एकाहि हांकेला 'ओ' आली नाहीं कीं जगन्नाथ कुठूनहि उमटला नाहीं. तिचें काळीज गलबललें. वत्सला कावरीबावरी झाली. भावजी आचवून पोटावर हात फिरवीत बाहेर आला आणि शिर्डीचे झुरके घेतां घेतां त्यानें जगन्नाथाचें श्राद्ध करायला सुरवात केली, 'गाढव सुटलाँ! अक्कलच कमी!... हैवान नुसता!...'

त्या वेळीं मात्र सासूला जांवयांचा सोम्यस राग आला. ती म्हणाली, "पडवीवर बसून गोळी मोजून काय होणार आहे? आधीं त्याचा शोध लावा अन् मग काय शिव्या द्यायच्या असतील त्या द्या!"

"कांहीं नको शोध करायला. कुकुलं बाळ नव्हे. येईल संध्याकाळ-पर्यंत. तुम्ही जेवून घ्या आधीं."

पण आईचें आंतडें तें. तें काय असल्या शुष्क उपदेशाला मान तुकवील! तिनें वत्सलेला अलतडचीं घरें धुंडाळायला पाठवलें. आपण उठून पलतडीस गेली. 'माझा कृष्ण देखिला काय' म्हणून गोकुळांत गल्लोगल्लीं हिंडणाऱ्या यशोदेच्या व्याकुळतेनें घरोघर फिरली. पण भेटेल तो कानांवर हात ठेवी. ती परत घरीं आली तर वत्सला तुळशीजवळ उभी राहून मुळुमुळु रडते आहे.—म्हणजे तिलाहि पत्ता लागला नव्हता.

जगन्नाथाच्या आईला कळेना कीं पोरगा गेला कुठें! कुठें झाडावर चढून पडला असेल का? कुठें नदीनाल्यांत उतरला असेल का? कुठें देवचारानं पळवला, लपवला असेल का?......तिला नाना कुशंकांनीं घेरलें. तिचें चित्त सैरभैर झालें. भावजी पडवींतल्या सोप्यावर उताणा पडून वामकुक्षीं घोरत होता, त्याला तिनें निकरानें उठवलें. तो डाव्या तळव्यावर उजवी बुक्की मारून कपाळावर आठ्या चढवीत म्हणाला,

"आतां मी कुठें म्हणून शोधूं त्याला? जाणाराच्या दहा वाटा—छेः! आफतच आली."

"गांवांत चला. शेजाऱ्यापाजाऱ्यांना गोळा करा. त्यांची मदत घ्या. पुरुषासारखे पुरुष तुम्ही—"

"मी गांववाल्यांचं तोंडसुद्धां पाहणार नाहीं."

त्याच वेळीं तुळशीवृंदावनाच्या आडून वत्सलेनें भावजीच्या नांवानें कडाकडा बोटें मोडलीं. म्हातारीला जावयाचा अंदाज लागला. ती उठून दामूआण्णाच्या घराकडे धावली. तिला माहीत होतें कीं, प्रसंगीं पोंचेल तर तो दामूआण्णाच! ती तिथें पोंचते तो गणप्या, मोन्या, रामनाथ वगैरे बरेच गांवकरी दामूआण्णांच्या पडवीवर बसून जगन्नाथाच्या नाहींसें होण्याचीच चर्चा करीत होते. दामूआण्णा त्यांना सांगत होता,

"...परवां दिवशीं माझ्याकडे आला होता तो. मला म्हणाला, 'मी ग्रामत्याग करून जातों.' मीं म्हटलं, जातोस तर जा. नाहीं तरी घरांत तुला कोण विचारतंय! सासूला जावई आहे भला भक्कम..."

जगन्नाथाच्या आईनें ते शब्द ऐकले. किंबहुना, तिनें ते ऐकावे म्हणूनच दामूआण्णा बोलला होता. ते तिच्या वर्मावर पडले. ती अंगणांतच बसकण घेऊन दामूआण्णाला म्हणाली,














"मागचं आतां काहूं नको. आधी माझ्या पोराचा शोध लाव."

"सांग कीं तुझ्या जावयाला, तो शंभर माणसं आणून उभीं करणार होता ना. तुझं कीं दोघांत ? तुला गांववाले काय करायचे आहेत?"

"असं नको रे म्हणूं!"

"नको कसं! आम्हीं सर्वांनीं तुझ्या घरीं येणं-जाणं नि अन्नोदक वर्ज्य केलं. एकदां तरी विचारायला आलीस का कीं, "बाबांनो, आमच्या घरावर हा बहिष्कार कां?" तुझं कर्तव्य होतं का नाहीं? पण तुला चढला होता जावयाचा माज. आपला जावई शहाणा. कायदे-पंडित, बोलका बृहस्पति—तो काय आपल्यावर आपत्ति येऊं देतो, असं तुला वाटत होतं. गावानें वाळींत टाकल्यामुळें आपल्या चारचौघांतल्या पोराला काय यातना होत असतील याचा कधीं तरी विचार केलास का? कां त्यान पळून-जाऊं नये? मी म्हणतों, बरं झालं! जाईल तिथें सुखी तरी होईल तो....."

जगन्नाथाच्या आईला दामूआण्णाचा तो भडिमार सहन होईना. ती ओक्साबोक्शीं रडूं लागली. "काय चुका झाल्या असतील त्या पदरांत घ्या; पण माझ्या पोराला परत आणा..." तिनें रडतां रडतां काकुळत्या सुरू केल्या.

"हें बघ, गांवांत कलागती लावणारा, दुहीचे सुरुंग पेरणारा तुझा कर्कोटक जावई घरांतून निघाल्याशिवाय आम्ही कोणीहि कान हलवायला तयार नाहीं!"

"पण मी माझ्या तोंडानं कसं सांगूं त्यांना?"

"मग आम्ही सांगतों. नव्हे, घालवतोंसुद्धां. आणि तुझा मुलगाहि शोधून आणतों. आहे कबूल?"

"आहे, काय हवं तें करा. पण घराचा खांब घराला लागूं दे!"

लगेच दामूआण्णा शेजाऱ्यांना म्हणाला. 'गणप्या, मोन्या, रामनाथ, उठा रे!' सगळे उठले आणि दामूआण्णाच्या मागोमाग जगन्नाथाच्या पडवीवर गेले. भावजी जानव्याची माळ करून संथपणें विडी वळीत बसला होता, त्याला दामूआण्णानें म्हटलें,

"काय भावजी! फक्त विड्याच वळीत बसायचं का? एवढा मोठा मेहुणा घरांतून परागंदा झाला, त्याचं काहीं—"

"मग तुम्ही गावकरी, शिमगेजारी आहांत ते कशाला हो?"

"आम्ही आहांत ते तुला घालवायला!"

"तें टाऊन आहे मला. पण घर माझ्या सासूचं आहे. तुम्ही कोण मला घालवणार!"

"तें मग पाहूं. तूं ऊठ. कपडे कर. आमच्या मुखानं सासूच तुला सांगते आहे असं समज."

"मी बरा जाईन! इथल्या अर्ध्या इस्टेटीवर माझ्या बायकोचा म्हणजे पर्यायानें माझा हक्क आहे. हें अर्धं घर माझं आहे!"

"ऐक, जगूच्या आई! या तुझ्या बृहस्पतीचे पोटांतले पाय आतां तरी दिसले का तुला? 'जावई माझा भला' म्हणत होतीस, पण याचा मुळावर डोळा होता हें आतां तरी लक्षांत आलं का तुझ्या?" दामूआण्णानें विचारलें.

"त्यांत काय झालं? कायदा-बोलतो आहे तसं" भावजी निगरगट्टपणें म्हणाला.

"कायदा राहिला कोर्टांत. पण तूर्त तूं इथून चल! गणप्या, मोन्या, तुमची ताकद बघूं दे आज मला. या भावजीचं हें चुरमुऱ्यांचं पोतं इथून उचला अन् वहाळापलीकडे गांवाच्या सीमेबाहेर फेकून द्या."

"तें काम आमचं." ते दोघेहि उठले

भावजी काय समजायचं तें समजला. त्यानें हातांतली विडी टाकली अन् खोलींत जाऊन कपडे चढवले. पाठोपाठ त्याची आक्काबाईनेंहि गंगा-यमुना वाहवीत गाठोडें बांधलें. जगन्नाथाची आई हें सगळें अगतिकपणें पहात होती. तिला आपल्या मुलीची करुणा येत होती. पण प्रकरण तिच्या हाताबाहेर होतें. त्या दोन तासांत जावई मात्र तिच्या मनांतून पुरता उतरला होता.

भावजीनें पाट ओलांडून पलीकडे पोस्टावर घराकडे तोंड करून म्हटलें, "याचं उट्टं न काढीन तर त्या बापाचं नांव सांगणार नाहीं!" त्याला कोणी प्रत्युत्तर दिलें नाहीं. सगळे खो खो हसले फक्त. आई लेकीला चार पावलें पोंचवून परत आली. पोरगी तिच्या हातची गेली होती, आणि पोरगा मात्र अजून हाताला चढायचा होता.

पाठोपाठ सगळे गांवकरी पांगले. एका तासाच्या आंत दामूआण्णा जगन्नाथाला घेऊन घरीं आला. बाकीच्या सगळ्या शोधकांना कुकारे पडले. तेहि इकडून तिकडून तिथें जमले. आईचा जीव भांड्यांत पडला. वत्सलेनें आळवलेले सगळे देव तिला पावले.

"होतास कुठें बाबा तू? केवढी धोंड आणली होतीस आमच्या उरावर!—" आईनें विचारलें.

"काय सांगूं तुला आई! गांवचा देवचार वाटोरी! त्यानं मला अलगद उचललं अन् वायंगणाच्या मधल्या पळंदीच्या तोंडावर तें सांडि-वणाचं झाड आहे ना, त्याच्या टेकशींत नेऊन बसवलं. भावजी अन् आक्का त्या पाळंदींतून जातांना मला दिसलीं. मी हाक मारूं लागलों तर शब्दच उमटेना बघ. तीं दोघं जेव्हां पायवाट सोडून मोठ्या रस्त्याला लागलीं, तेव्हां मला त्या वाठाऱ्यानं खालीं उतरून ठेवलं. जसं चढवलं, तसं उतरलं.

"काय आश्चर्य आहे!" गणप्या म्हणाला.

"आश्चर्य कसलं त्यात! वाठारी असले प्रकार लीलेनें करतो." चिंतोबा अधिकारवाणीनें म्हणाला.

"म्हणजे याचा अर्थ असा कीं भावजी या गांवांत राहिला आहे, हें वाठाऱ्यालासुद्धां मान्य नव्हतं." रामनाथानें भाष्य केलें.

"तें जाऊं दे. जगूच्या आई, तुमच्या घरावरचा बहिष्कार उठला. आतां दिवाळी जवळ आली आहे, यंदा पावलीचे पोहे अधिक कांड. या वर्षी दिवाळीचं पहिलं पोहेखाणं तुमच्या घरीं. कळलं?" दामूआण्णानें उठतां उठतां समारोप केला.

थोड्या वेळानें सासू जरा डोळ्यांआड झाल्यावर वत्सला जगन्नाथाला म्हणाली,

"देवचारानं झाडावर चढवून ठेवलं काय? खोटारडे कुठले!"

"खरं असो, खोटं असो. तुझ्यामाझ्या मागची तीं ब्याद तरी टळली ना!"

"टळली खरी; पण एक प्रहर इथें माझ्या अंतमाळा उडाल्या."

"बरं झालं. नवऱ्याची किंमत आतां कळेल तुला!"

"बायकोची किंमत तुम्हांला केव्हां कळायची?"

"ही, आतांच—" म्हणून जगन्नाथ दार पाकलें पुढं सरकला आणि वत्सलेनें हळूच दार आड करून त्याला अडवलें.





हिमालयाला कालिदासानें पृथ्वीचा मानदंड असें म्हटलें आहे, तें आकारमानाचा मानदंड म्हणून तर खरें आहेच, पण पृथ्वीच्या आयुष्याचा मानदंड म्हणूनहि खरें आहे.



# ...हिमालयो नाम नगाधिराजः ॥

डॉ. मल्हार विनायक आपटे

अस्त्युत्तरस्यां दिशि देवतात्मा
हिमालयो नाम नगाधिराजः ।
पूर्वापरौ तोयनिधी वगाह्य
स्थितः पृथिव्या इव मानदण्डः ॥
कुमार०

—उत्तरसीमेवरी विराजे
पर्वत नामें हिमालय ।
पावंति ज्याचीं पूर्वपश्चिमीं
टोकें सिंधूमधें लय ॥
भव्य तयाचें शरीर पाहुनि
दैवत मानिति जन त्यातें ।
दंड पसरला जणुं ईशानें
पृथिवीमापन करण्यातें ॥

दोन हजार वर्षांपूर्वी कालिदास कवीनें कुमारसंभव काव्य लिहिलें त्याचा आरंभ नगाधिराज हिमालयाच्या वर्णनापासून झालेला आहे. हिमालय हा भला मोठा पर्वत आहे. तो थेट पूर्वसमुद्रापासून पश्चिमसमुद्रापर्यंत पसरलेला आहे. त्याचीं दोनहि टोकें समुद्रांत बुडालेलीं आहेत. आपल्या देशाची उत्तर सीमा म्हणजे हिमालय होय. हिंदुस्थानास तीनच सीमारेषा आहेत. पूर्व, पश्चिम आणि उत्तर. पूर्व आणि पश्चिम समुद्रकिनारे आहेत. त्यांना जोडणारी उत्तर सीमा म्हणजे हिमालय होय. आज आपण सिंधू आणि ब्रह्मपुत्रा या नद्यांच्या वळशांत सापडलेल्या पर्वतालाच केवळ हिमालय म्हणतों. परंतु त्याच्या पूर्व-पश्चिम टोकापासून निघालेले आराकान आणि हालासुलेमान हे सुद्धा त्याचेच फाटे आहेत. ते जमेस धरले असतां कालिदासाच्या वर्णनाचा प्रत्यय आजहि येतो. हा पर्वत लांबीनें भला मोठा तसाच उंचीनेंहि भला मोठाच आहे. त्याच्याइतकी उंची दुसऱ्या कोणत्याच पर्वताला लाभलेली नाहीं. यामुळेंच त्याचें वरिष्ठ शिखर गाठणें हा जागतिक बहुमानास योग्य असा विक्रम समजतात. हिमालयाचें वरिष्ठ शिखर चढून जाणें हा जसा एक विक्रम आहे, तसाच हा पर्वत ओलांडून जाणं हा देखील एक विक्रमच आहे. आपण हिमालयाच्या दक्षिणेस राहतों. हिमालयाचा दक्षिण काठ अगदीं खालपट आहे. त्याची उंची अवघी १००० फूट आहे. हिमालयाच्या मध्यवर्ती हिमवती रांगेतील कोणती हि खिंड ६००० फुटाहून ठेंगणी नाहीं. हिमालयाच्या उत्तरसीमेवर जें तिबेट पठार आहे तें साधारणतः १३००० फूट उंच आहे. तेथील अगदी जवळचीं स्थळें म्हणजे मानससरोवर (१४९५०) आणि कैलास पर्वत (२२०००) हीं होत. साहजिकच कैलासाला जाऊन येणें म्हणजे एक दिव्यच समजलें जातें. आमच्या देवांतला जो महादेव त्याची वसति कैलासावर असते, असें पुराणकारांनीं कल्पिलें आहे.

हिमालय हा खरा पर्वत आहे. पर्वत म्हणजे पर्वांची संतत किंवा रांग, आपल्या बोटाला जशीं पर्वें म्हणजे पेरीं असतात तशीं पर्वताला पर्वें म्हणजे शिखरें असतात. हिमालयाचें वरिष्ठ शिखर २९००० फूट उंच आहे. हिमालयाची दक्षिण रांग सर्वांत ठेंगणी आहे, तरी तिच्यांत सुद्धा ५००० फूट उंच शिखरें आहेत. अशा या उंचच उंच पर्वताची लांबी, त्याचीं बुडलेलीं पूर्व-पश्चिम टोकें सोडून सुद्धा १५०० मैल आहे. पृथ्वीचा घेर २४००० मैल आहे. तो हिमालयरूप मानदंडानें अवघ्या १६ मापांत मोजला जातो!

हिमालयाच्या उत्तररांगेंत कैलास आहे. तेथें आमचे महादेव राहतात. पण त्यांनीं आपल्या जटेंत जी गंगा झेलली म्हणतात, ती हिमालयाच्या मध्यम रांगेंत आहे. तेथून निघून ती दक्षिण रांग फोडून खालीं वहात आली आहे. हिमालयाच्या उत्तर रांगेंत वर्षांत चार सहा महिने हिम असतें, पण मध्यम रांगेच्या अत्युच्च भागांत सतत हिम असतें; म्हणून तिला हिमवती रांग म्हणतात. बदरी आणि केदार हीं यात्रास्थानें हिमवती रांगेंत आहेत. केदार हें शिखर आहे, बदरी हें पठार आहे. त्याच्या दोनहि अंगांस नर आणि नारायण नांवाचीं शिखरें आहेत. या शिखरांवर सतत हिम असतें. पठारावर मात्र तें सहाच महिने असतें. तीनहि शिखरें २०,००० फुटांपेक्षां उंच आहेत. नरनारायणामधील खिंड मात्र १०,३०० फूट उंच आहे. या पठारापलीकडे उत्तरेस थोड्याच अंतरावर अलकानगरी आहे. तेथून अलकनंदा नदी निघते. केदार शिखराखालच्या पठारावरून मंदाकिनी नदी निघते. त्याच्या पश्चिमेस गंगोत्री-जम्नोत्री हीं शिखरें आहेत. त्यांवरून भागीरथी आणि यमुना या नद्या निघतात. या चारी नद्यांच्या दऱ्या आरंभाजवळच हजारों फूट





खोल आहेत. या द्वारा नद्या मिळून आपली मोठी गंगा तयार होते.

### शिवालिक

हिमालयाची जी दक्षिण रांग आहे तिला शिवालिक म्हणतात. सिमल्याच्या दक्षिणेच्या टेकड्यांस तेथील लोक 'शिव-वाल' म्हणतात. हरद्वाराजवळील कांहीं टेकड्यांना 'शिवालिक' असें नांव पूर्वापार चालत आलें आहे. त्यावरून सर्वच दक्षिण रांगेला तेंच नांव हल्लीं रूढ झालें आहे. वाल म्हणजे वळणदार केस आणि अलक म्हणजेहि तेंच. गंगेच्या ओघांनीं हिमालयाची दक्षिण रांग कापली गेली आहे. हे ओघ ज्या दऱ्यांत वाहतात त्यांत त्यांची अंतर्गत रचना उघडी पडली आहे. पुलिनाचे थरावर थर रचले जाऊन तेथील खडक बनले असून ते ठिकठिकाणीं वळणदार झाले आहेत. शिवमस्तकावरून खालीं पसरलेले हे वळणदार केस होत, अशा कल्पनेनें त्यांना 'शिवालिक' असें नांव दिलें गेलें आहे. गंगा स्वर्गांतून शिवाच्या डोक्यावर उतरली आणि त्याच्या कुरळ्या केसांतून वहात गेली अशी कल्पना आहे. हिमालयाचा आकार असामान्य तशी त्याची घडणहि असामान्य आहे. पृथ्वीच्या कवचास भेगा पडून त्यांच्या आंतला शिलारस वर वाहवला व तो निवून आपला सह्याद्रि तयार झाला. पण हिमालयाची गोष्ट तशी नाहीं. जेथें आज हिमालय आहे तेथें पूर्वी समुद्र होता त्यांत नदीमुखांतून येणारा गाळ साचून त्याचे खडक बनले, ते सुरकुतून वर आले, तेव्हा शिवालिक टेकड्या सिद्ध झाल्या! हिमालयाचे खडक गाळवट आहेत, आगवट नाहींत. गंगोत्रीच्या काठानी जातां जातां या खडकांतल्या थरांच्या आडव्या, तिरप्या, उभ्या रेषा जागोजाग चांगल्या दिसून येतात; म्हणूनच त्यांना 'शिवालिक' असें नांव पडलें आहे.



### पशुपति

हिमालयाचा लोकोत्तरपणा त्याच्या केवळ आकारांत आहे असें नाहीं, तर तो त्याच्या घटनेंतहि आहे. हिमालयाचे पत्थर जीवांकित आहेत. सह्याद्रि पाषाणांचा बनलेला आहे. त्यांत जीवांचा मागमूसहि नाहीं. पण हिमालयाची गोष्ट तशी नाहीं. तो ज्या प्रस्तरांचा बनलेला आहे त्यांत जीवांच्या खाणाखुणा विपुल आहेत. शिवालिक पत्थरांत नानाविध पशूंचीं हाडें सापडतात. हे पशू एवढाले मोठाले आणि इतके मोठाले आहेत कीं, तसले आणि तेवढाले पशू आज जिवंत सांपडत नाहींत. आपल्या पुराणकारांनीं महादेवाला पशुपति म्हटलें आहे. नंदीवर बसणारा महादेव पहाण्यास मोठेंच पुण्य पाहिजे. पण शिवालिक रांगेंतले खडक तपासण्याची सामान्य पुण्याई जरी पदरीं असली तरी शिवाच्या अलकांत गुरफटलेले प्रचंड हत्ती आणि भले मोठे बैल दिसूं शकतात. १० फूट लांब दात असलेला हत्ती, आणि चार पांच फूट लांब शिंगें असलेले बैल शिवालिक पत्तरांत सापडतात. किरातार्जुनीय युद्धांत एक भला मोठा डुकर दोघांनीं एकदम मारला, अशी कथा आहे. विद्यमान वराह एकाच जातीचे आहेत. तथापि शिवालिकांत गुंतलेले अनेक जातींचे भले मोठाले वराह आढळून आले आहेत.

### शिवमाता

शिव म्हणजे परमेश्वर. त्याला कोणी माता असण्याची शंका आहे असें नाहीं. परंतु कालीमाता म्हणून एक शिवमाता सांगितलेली आहे खरी. आतां शिव म्हटला तरी तो रुद्र





म्हणजे भयंकर आहे, असें वर्णन आहे. या रुद्राच्या मातेला शोभेल असेंच तें मातेचें वर्णन आहे. कालीमातेच्या गळ्यांत मुंडमाळा असल्याचें सांगितलें आहे!—मुंड म्हणजे राक्षसांचीं मुंडकीं! कोणा भक्ताला त्याचा कसा प्रत्यय आला असेल तो असो. आज आपणाला त्याचा प्रत्यय येतो तो असा कीं, शिवलिकांमध्यें माणसांचीं किंवा राक्षसांचीं हाडें सापडत नाहींत, पण गंगापठारांत माणसांचीं हाडें सापडतात. शिवालिकांतले पशुपक्षी विलक्षण आहेत. गंगापठारांतले पशुपक्षी सामान्यच आहेत. यावरून वाटलें तर असें म्हणता येईल कीं, शंकर कैलासावर रहात असला तरी हिमालयाच्या शिवालिक रांगेत वावरत असे. कालीमातेनें मात्र आपल्याकडे केवळ गंगापठारच ठेविलें होतें.

### शिव-भक्तगण

मातेची जागा कळली, पण आता परमेश्वराचे जे भक्तगण त्यांची खास जागा कोणती, असा कोणी प्रश्न केला तर त्याचेंहि समाधान करतां आलें पाहिजे. शिवाच्या भक्तगणांच्या हातांत शंखहेंच वाद्य असतें, दुसरें नसतें. शिवगण कांही टाळ वाजवीत नाहींत. हिमालयाच्या हिमवती रांगेत एक दरी आहे; तिची खोली ६००० फूट आहे. या दरींत अगदी तळाजवळच्या खडकांत शुक्ति, शंख व प्रवाळ असे सागरी प्राण्यांचे अवशेष सापडतात. तेव्हा हीच या शिवगणांची खास जागा असली पाहिजे. याच्या अंमळ वरच्या थरांत शालग्राम भरपूर आढळतात. त्याच्या वर शालिग्रामहि तितकेच विपुल आहेत. शालिग्राम चांगले मोठाले दोन दोन हात व्यासाचे आहेत. हे शालग्राम आणि शालिग्राम समुद्रांत रहाणारे प्राणीच होते. आतां मात्र आपण त्यांना परमेश्वराच्या स्वयंभू मूर्ति समजतों. याहून थोडीं भिन्न पण पुष्कळ अंशीं अशींच करोळीं हीं ज्यांचीं कवचें आहेत असे लहान प्राणी आजहि समुद्राच्या तळाशीं वावरतांना आढळतात.

सिंधू नदीला मिळणारी सतलज नदी प्रसिद्ध आहे. तिला मिळणारी एक लहानशी नदी आहे, तिचें नांव स्पिती. ती हल्लीचा हिमाचल प्रदेश आणि तिबेट यांच्या सीमेवर आहे. स्पिती नदी ज्या दरींत आहे, त्याच दरींत शुक्ति-शंख-प्रवाळ आणि शालग्राम-शालिग्राम सापडतात. याच दरीच्या काठाजवळ नाण्यासारखे चपटे वाटोळे रुपयाएवढे किंवा त्याच्या दुप्पट व्यासाचे देखील नाणक नामक नाणे सापडतात. हे देखील समुद्रातल्या प्राण्यांचेच अवशेष आहेत. शालिग्राम आणि नाणक यांच्या थरांत मिसळलेले खाऱ्या पाण्यांतले मत्स्य जागोजाग सापडतात. अर्थात् ते जिवंत नाहींत हें उघडच आहे. त्यांचीं मृत शरीरें देखील जशींच्या तशीं सापडतात असेंहि नाहीं. कांहींचे खवले सापडतात, कांहींच्या प्रतिमा सापडतात आणि कांहींच्या केवळ मुद्राच सापडतात. यावरून या प्राण्यांचा वावर ज्या खाऱ्या पाण्यांत असावयाचा, असा सागर, या ठिकाणीं पूर्वी होता, याविषयीं शंका उरत नाहीं.

### मीनध्वज मदन

आजच्या पुराणकारांनीं मदनाच्या ध्वजावर मत्स्याची स्थापना केली आहे. मीनकेतन मदन शंकराला विवाहोन्मुख करण्याकरितां इंद्रानें









नेमला अशी कथा आहे. पंचाईत ही होती कीं, हिमालयाची कन्या पार्वती, आपणाला शंकरच पति पाहिजे म्हणून त्याची आराधना करीत होती; पण तो तिजकडे पहातहि नव्हता. तेव्हां मदनानें पार्वतीच्या देखत शंकरावर आपला बाण रोखला. तें पाहतांच शंकरानें मदनालाच जाळून टाकलें! मग पार्वतीनें स्वतःच्या तपश्चर्येनें बळ संपादन केलें. तेव्हां शंकरांनी प्रसन्न होऊन सप्तर्षींच्याकरवीं पार्वतीची मागणी हिमालयाकडे केली.

### वास्तववाद

आधुनिक विद्वान भारीच रुक्ष आहेत. ते असल्या प्रेमकथांत कांहीच तथ्य नाहीं असें मानतात. सागरी प्राण्यांच्या खाणाखुणा हिमालयांत आहेत यावरून ते असा निष्कर्ष काढतात कीं, हिमालयाचे खडक, जे आपणाला दिसत आहेत ते, समुद्राच्या पाण्यांत कोट्यवधि वर्षांपूर्वी साठणाऱ्या गाळाचे बनलेले आहेत. पृथ्वीच्या कवचाचा हा नवीन बनलेला दोन तीन मैल जाडीचा पापुद्रा, पांच कोटी वर्षांपूर्वी सुरकुतून समुद्राच्या वर येऊं लागला, आणि त्यानतर दोन कोट वर्षांनी गगनाला भिडला. अर्थातच त्यावर पाऊस पडून तो झिजूं लागला, अद्याप झिजत आहे आणि उचलून वर येत आहे! नद्यांच्या योगानें हिमवती रांगेची जी झीज होत आहे, तिजमुळेंच नदीमुखांजवळ शिवालिक रांग तयार झाली आहे. शिवालिकरूपी या भूकवचाला केव्हा केव्हा तडे जातात तेव्हा भूकंप होतात; केव्हा केव्हा या तड्यांच्या दोनहि बाजूंचे प्रस्तर एकमेकांपासून खाली-वर सरकतात; केव्हा केव्हा खडकांना दुमड पडून ती तिच्या दक्षिणेच्या खडकावर दडपली जाते. शिवालिक हिमालयाच्या पायथ्याशी एक रुंदच रुंद फाट पडलेला आहे. या फाटांत वरच्या टेकाडांवरून वहात येणारें रेताड भरलेलें आहे. हें रेताड म्हणजेच गंगापठार होय.

### अवतारकल्पना

आधुनिक विद्वान कल्पना चालविण्यांत कांही कमी नाहींत. ते असें सांगतात कीं, हिमालयभूमि पूर्वी समुद्राच्या पोटांत असतांना गाळाचे बनलेले खडक आपल्या जीवसूचक खाणाखुणांसह जेव्हा पाण्यांतून वर निघाले तेव्हा पृथ्वीवर वराहवतार झाला. त्याच्या अगोदरच वानराचा अवतार झालेला होता. वराहावतारांच्या नंतर हरिणावतार झाला, गवयावतार झाला, सिंहावतार झाला, तरी वानरें आपलीं झाडांचाच आश्रय करून होतीं, कारण त्या त्या काळचे पशू महाभयंकर होते. परंतु सिंहावतारानंतर हे भयंकर महापशू लोपत गेले. त्यांची संततीहि उरली नाहीं. ते निःसंतान झाले! जे पशू थोडे सौम्य होऊन राहिले त्यांचेच वंशज आज आपणाभोवतीं वावरत आहेत. जे पशू विलुप्त झाले त्यांचीं शवें जुन्या टेंगण्या हिमालयीन नद्यांच्या पाण्यांत वहात जाऊन शिवालिकरूपी नदीमुखांतल्या गाळांत गुंतून राहिलीं! यानंतर वानरांनी झाडावरून उतरून नररूप धारण केलें. त्या गोष्टीला आज उणीं पुरीं दहा लाख वर्षे लोटत आहेत. पूर्वी शिवालिकांच्या पायथ्याशी असलेला समुद्र आज सिंधू-गंगापठाराच्या टोकापर्यंत हटला आहे! त्याला हटवणाऱ्या रेताडांतच या मानवकालांतल्या मृतांचीं हाडें पुरलीं गेलीं आहेत.

### पार्वतीविवाह

पृथ्वीवर वानराचा अवतार झाला त्यापूर्वीच मोठाले वृक्ष, लहानमोठीं झुडपें, गवतें, इत्यादि स्थावर जीव पृथ्वीवर इतरत्र नांदत होते. तथापि त्यांत फुलझाड अगदी विरळा असे. वानरावतारानंतर एक कोट वर्षांनी वराहावतार झाला. त्या वेळीं समुद्रांतून हिमालय वर निघाला. हळू हळू त्याजवर वनें वाढलीं. त्यांत फुलझाडें वाढीस लागलीं. फुलें एकाहून एक सुरेख आणि विपुल होत होत हल्लीचे संतानक वृक्ष (बुरास) उत्पन्न झाले. यांना हल्लीं रंगीबेरंगी फुलांचे मोठमोठाले झुबके येतात. मंदाकिनी नदीच्या काठीं उष्ण पाण्याचा एक झरा आहे. त्याचें पाणी एका कुंडांत सोडलेलें आहे. या कुंडांत पार्वती स्नान करी, म्हणून त्याला गौरीकुंड असें नांव पडलें आहे. त्याच्या शेजारच्या एका टेकडीला त्रिजुगीनारायण म्हणतात. तेथें लहानमोठीं फुलझाडें आणि लताहि आहेत. ही जागा हिमालयानें आपली राजधानी केली आणि तेथें पार्वतीचें दान शिवाला दिलें.



### पृथ्वीचें वय

हिमालयाला कालिदासानें पृथ्वीचा मानदंड असें म्हटलें आहे, तें आकारमानाचा मानदंड म्हणून तर खरें आहेच, पण पृथ्वीच्या आयुष्याचा मानदंड म्हणूनहि खरें आहे. वानरावतारापूर्वी हिमालयभूमि समुद्रांत असतांना तिच्या खडकांत शालिग्रामांचे थर रचले गेले आहेत. या शालिग्रामावताराचीं १२ कोटी वर्षे लोटलीं असावींत, असा तर्क आहे. याच्या पूर्वी शुक्ति, शंख, प्रवाल, मत्स्य, मंडूक आणि कूर्म इतके अवतार झालेले होते. त्यांनाहि एकंदर ३३ कोटी वर्षे लागलीं असावींत, असा तर्क आहे. सर्व अवतारांची गणती केली म्हणजे, पृथ्वीवर जीव उत्पन्न झाल्याला ५१ कोटी वर्षे झालीं असल्याचें कळून येतें. पृथ्वी आरंभी द्रव होती. ती जीवनाला योग्य होण्याइतपत निवेपर्यंत अगोदर १५० कोटी वर्षे गेलीं असलीं पाहिजेत. तो अवधि जमेस धरतां पृथ्वीचें आयुर्मान आज २ अब्ज वर्षे असलें पाहिजे, असें दिसून येतें!

हिमालय हा आपल्या प्रचंडपणामुळे पृथ्वीच्या केवळ आकाराचाच नव्हे तर आपल्या आंतरघटनेमुळें पृथ्वीच्या आयुष्याचा देखील मानदंड झालेला आहे. पृथ्वीच्या अलीकडील चतुर्थांश आयुष्यांतील खुणा या पर्वताच्या अंगांत भिनून राहिल्या आहेत. शुक्तीच्या अवतारापासून नराच्या अवतारापर्यंत सर्व अवतारांचीं चिन्हें या पर्वतानें जतन केलेलीं आपणांस पहावयास सापडतात. जे शोध करतील त्यांनाच तीं सांपडतील!



*We wish all our patrons a Happy Diwali and Prosperous New Year!*

*Please Consult us Before going in for everything in Cycle and Cycle Parts*

# SHAH TRADING CO. LTD.

## LARGEST IMPORTERS OF CYCLE AND CYCLE PARTS

**157/161, PRINCESS STREET, BOMBAY 2**

Tel. No. 23425 Office
Tel. No. 24850 Residence

Telegraphic Address
"SHAHTRACO"



*Branches:*

38, MAHARANI ROAD, **INDORE,**
CHAR RASTA, **AHMEDABAD,**
**NEW DELHI,**
AND
**BANGALORE.**

अनुक्रमणिका



# एक जिप्सी आहे माझ्या खोल मनांत दडून !

एक जिप्सी आहे माझ्या खोल मनांत दडून
आठवतें बालपण जेव्हां होतों मी खेळत
होतों बांधीत मी घर खेळगड्यांच्या संगत
कौलें पानांचीं घराला आणि झावळ्यांच्या भिंती
आठवतें अजूनही होतों रंगत मी किती!
पण अकस्मात होतों जात सारें उधळून
एक जिप्सी आहे माझ्या खोल मनांत दडून

शाळेंतले ते दिवस... पाटीपुस्तक हातांत
टोपी जरीची सुंदर... स्वारी निघाली थाटांत
जाड कांचेची चाळिशी लावूनियां डोळ्यांवर
होते बोलत पंतोजी उग्र रोखून नजर
पण ठरेनाच मन चार भिंतींच्या जगांत
उडे खिडकीमधून दूरदूरच्या ढगांत
झाडें पानांच्या हातांनीं होतीं मला बोलावीत
शेपटीच्या झुबक्यानें खार होती खुणावीत
कसें आवरावें मन? गेलों पळून तिथून
एक जिप्सी आहे माझ्या खोल मनांत दडून

आणि पुढें कशासाठीं गेलों घर मी सोडून
सारीं सारीं सुखें होतीं कांहीं नव्हतेंच न्यून
पण खोल खोल मनीं कुणीतरी होतें दुःखी
अशा सुखांत असून जिप्सी उरला असुखी
दिसूं लागले डोंगर जरा मिटतां लोचन
तिथें कुणीतरी मला नेऊं लागलें ओढून
मिटलेल्या डोळ्यांपुढें खळखळणाऱ्या लाटा...
खळखळणारीं पानें... दूर पळणाऱ्या वाटा
वाटांसवें त्या पळालों सारें कांहीं झुगारून
एक जिप्सी आहे माझ्या खोल मनांत दडून

कधीं कधीं पहाटते उरीं आगळी प्रतीती
जाळीमधून धुक्याच्या तेज झिरपतें चित्तीं
जाचूं लागते जिप्सीला ज्ञात विश्वाची चौकट
आणि जाणवतें कांहीं गूढ अंधुक-अस्पष्ट!
खेळ मांडिलेला सारा पुन्हा उधळाया सजे
आपणच निर्मिलेलें आपणच मोडूं धजे
गूढ अज्ञात धुक्यांत प्राणि जातसे बुडून
एक जिप्सी आहे माझ्या खोल मनांत दडून

घर असूनही आतां घर उरलेलें नाहीं
चार भिंतींची जिप्सीला ओढ राहिलेली नाहीं
कुणी सांगावें? असेल पूर्वजन्मींचा हा शाप
घडी सुस्थिरपणाची विसकटे आपोआप
कुणीतरी साद घाली दूर अनामातून
एक जिप्सी आहे माझ्या खोल मनांत दडून!

—मंगेश पाडगांवकर

कंदील घेतल्याशिवाय खुदीराम वर कठड्याकडे धांवला. त्याला त्या मखमली काळोखांत शिव्बन दिसला नाहीं. तेव्हां कठड्यावरूनच वादळाच्या आवाजावर आपला आवाज चढवून तो एकदम किंचाळला—
"शिव्बन! शिव्बन! कुठं आहेस तूं?"

खुदीरामचें वय चाळिशीच्या आसपास असेल. धिप्पाड बांध्याचा, जिवाला उगाचं कसलीच त्रास करून न घेणाऱ्या जातीचा तो आहे. तिशीच्या आसपास असलेला शिव्बन शरीरानें यथातथा आणि मनानें अगदींच हळवा आहे.

दर पंधरवड्याला बदली राखणदार घेऊन येणारी बोट वादळी हवेमुळें सहा आठवडे येऊं शकलेली नाहीं. या गोष्टीचा शिव्बनच्या मनावर फार परिणाम झाला आहे.

**शिव्बन :** (खिडकीकडे उभा राहून, नाक मधून मधून 'सूं' 'सूं' करीत) काळोख म्हणजे एक विलक्षण चीज आहे, नाहीं खुदीराम? (खिडकीतून दूरवर पहातो.) शेंकडो मैल लांब, वर, खालीं काळोख कसा दाटून राह्यलाय् पहा. (खुदीराम विडी पेटवण्यांत गुंतला आहे. त्याच्या बोलण्याकडे तो लक्ष देत नाहीं.) बाहेर हात काढला तर मला वाटतं, हा काळोख हाताला लागेलसुद्धां. खुदीराम, तुला नाहीं वाटत काळोखाचं कांहीं? मला काळोखाची मुळींच भीति वाटत नाहीं. काळोख मला फार आवडतो. गंमत काय आहे...मी अगदीं लहान होतों ना, तेव्हां आम्ही एका चाळींत रहात होतों. आमच्या खोलीच्या समोरच म्युनिसिपालिटीचा दिवा होता. तो सबंध रात्र पेटलेला असे. त्यामुळें चांगलासा काळोख असा आम्हां पोरांना कधीं दिसलाच नाहीं.

**खुदीराम :** तुझी ही गोष्ट शंभराव्या खेपेला ऐकतोंय् मी, शिव्बन.

**शिव्बन :** म्हणूनच मला वाटतं, भयंकर काळोखांतलं हें काम मीं मोठ्या आनंदानं पत्करलं. काय गंमत आहे पहा, लहानपणापासून काळोखाची अशी ओढ नसती तर या 'काला खडक' दिवादांडीवर तुझ्याबरोबर काम करायचा मला योगच आला नसता. (क्षण दोन क्षण खिडकींतून बाहेरच्या काळोखाकडे पहातो. एकदोनदां 'सूं सूं' करून बोलूं लागतो.) पहा, पहा. अरे; इकडे येऊन पहा तर खरं, खुदीराम. काळोख म्हणजे कसा काळ्याकुळकुळीत मखमलीसारखा दिसतोय्. वर दिवादांडीच्या टोंकावर जावं, नि उडी घेऊन या मखमली काळोखांत पोहावंसं वाटतं. काळोखांत पोहायचं म्हणजे स्वर्गांतल्या पऱ्यांच्यासारखे माणसाला पंख पाहिजेत, नाहीं खुदीराम?

**खुदीराम :** खुळ्या, असाच बडबडत राह्यलास तर लवकरच स्वर्गांत जाशील तूं. पुरे कर बडबड

**शिव्बन :** बडबड केली म्हणजे जरा बरं वाटतं. गप्प बसलों कीं मला कसंसंच वाटूं लागतं

**खुदीराम :** बोल रे तूं. पण हें काळोखाचं पुराण आतां पुरे झालं.

(बेचैन होऊन शिव्बन खिडकीबाहेर पाहूं लागतो.)

**शिव्बन :** तुला काय वाटतं? केव्हां येईल आपली बदली घेऊन येणारी आगबोट?

**खुदीराम :** कांहीं सांगतां येत नाहीं. वादळ हें असं चालूच आहे. एखादे वेळीं उद्यांसुद्धां येईल. एखादे वेळीं आणखी महिनाभर येणार नाहीं.

**शिव्बन :** काय म्हणतोस महिनाभर? तुला बोलवतं तरी कसं असं? पंधरवड्यानं यायची ती सहा आठवडे झाले तरी आलेली नाहीं, नि तूं म्हणतोस आणखी महिनाभरहि कदाचित् येणार नाहीं. 'कालाखडका'चे राखणदार म्हणजे काय काळ्या पाण्यावर पाठवलेले कैदी आहोंत कीं काय आमग? छे, छे, असं कसं होईल?

**खुदीराम :** अरे, मुद्दाम का ते आगबोट पाठवायचं टाळताहेत? या वादळापुढं ते तरी काय करणार? खुळ्या, आपल्याला तरी काळजीचं काय कारण आहे? अजून तीन महिने पुरेल इतकी शिधासामुग्री आहे. भरपूर गोडं पाणी आहे. विड्यांची सबंध पेटी आहे. तिकडे किनाऱ्यावर पोटभर अन्न नाहीं म्हणून उपासमार काढणारे किती तरी गोरगरीब आहेत, त्यांचा विचार कर थोडा वेळ, म्हणजे आपली चैन आहे असं वाटेल तुला.

**शिव्बन :** आमच्यासारखा मखमली काळोखहि नाहीं त्या बापड्यांच्या वांट्याला आलेला. (खिडकींतून बाहेर पहातो.) अधांतरीं एखादा पिंजरा लोंबकळत असावा तसं या समुद्रांतल्या दगडी पिंजऱ्यांत आपणां दोघांना कोंडून ठेवलंय्, असं नाहीं वाटत तुला, खुदीराम? वर खालीं, आजूबाजूला काळोख, काळोख, काळोख! कधीं आगबोट येईल नि सुटका करील कुणाला ठाऊक! तोंपर्यंत या दगडी कोंडवाड्यांत काळोखाकडे टक लावून बसायचं. कांहीं सुटकाच नाहीं.—सांपळ्यांत सापडलेले उंदीर असतात ना, तसं; नाहीं, खुदीराम?

**खुदीराम :** पुरे कर रे तुझी बडबड. असाच भरकटायला लागलास तर कांहीं वेळानं स्वतःची सावली बघून भीतीनं ओरडशील!

**शिव्बन :** भीति नाहीं रे वाटत. भीति कसली आलीय्? पण काय रे, एखादे वेळीं ते लोक आपणाला पार विसरूनच गेले—एक काला-खडक दिवादांडी आहे, तिथं दोन माणसं आहेत याची त्यांना आठवणच राहिली नाहीं तर?—तर-तर आधीं, पाणी संपून जाईल—मग कांहीं आठवड्यांनीं दाणागोटा संपेल—बाप रे! मग काय रे करायचं, खुदीराम?

**खुदीराम :** आतां तूं बंद करतोस बडबड कीं देऊं एक ठेवून थोबाडींत? माझा तापट स्वभाव तुला माहीत आहे, शिव्बन. आतां देत उठवलंस डोकं तितकं बस् झालं.

**शिव्बन :** असा रागावूं नकोस गड्या. तुला चिडवायचा माझा मुळींच उद्देश नव्हता रे. ('सूं सूं' करीत खिडकींतून काळोखाकडे पहात कांहीं क्षण उभा रहातो.) बघीच झोत पहा कसा लोंबतोय, गिरकी मारुन फिराबी तसा काळोखाला कापीत जातोय्, खुदीराम......ह्यः ह्यः हाः! काळ्याकुळकुळीत लोण्याची कल्पना मोठी चमत्कारिक आहे, नाहीं? काळोखाच्या गोळ्यांत दिवादांडीचा हा काळा दगडी पिंजरा, नि त्या पिंजऱ्यांत उड्या मारणारे आपण दोघे उंदीर! ऊं! ('सूं सूं' करीत काळोखाकडे पहातो आणि स्वतःशीं पुटपुटतो.) पिंजऱ्यांतले उंदीर...






उंदीर...पिंजऱ्यांतले उंदीर...चितगांवच्या चोरबाजारांत कधीं गेलायस् तूं, खुदीराम?

खुदीराम : नाहीं बुवा. कां?

शिब्बन : तिथं एका आळींत कुत्रीं, मांजरं, पक्षी, घरांत बाळगायचे रंगीत मासे वगैरे विकायचीं दुकानं आहेत. पांढऱ्या उंदरांचा एक पिंजरा तिथं एकदां पाहिलेला मला आठवतो. दोन चांगले टुणटुणीत पांढरे उंदीर त्यांत होते. मध्यें एक चाक बसवलेलं होतं. आळीपाळीनं एक एक उंदीर त्या चाकांत जायचा नि धावधाव त्या चाकांत धावायचा. तें चाक आपलं गरगर गरगर फिरत रहायचं.

खुदीराम : त्या चाकांत शिरून कां बुवा ते धावत सुटायचे?

शिब्बन : त्यांना वाटायचं धांवून धांवून ते लांब कुठं तरी जाताहेत; शेवटीं एकदां त्या पिंजऱ्यांतून आपण सुटून जाऊं असं कांहीं तरी त्यांना वाटायचं...बिचारे!...ते तिथंच रहायचे; चाक मात्र ज्यास्त ज्यास्त गरगर फिरायचं नी त्यांचा उगाच दम निघायचा.

खुदीराम : बरं मग? पण तूं हें सगळं जीव तोडून सांगतोय्स कशाला, शिब्बन?

शिब्बन : कशाला म्हणजे? आपली त्या उंदिरांसारखीच गत आहे. खालीं जायचं, खाणं खायचं, वर जायचं, दिवा बघायचा, इथं येऊन बसायचं, पुन्हा वर जायचं, पुन्हा खालीं उतरायचं—दिवसाचे चोवीस तास, तासाचे दिवस, दिवसांचे आठवडे, आठवड्यांचे महिने—सुटकेचं नांव नाहीं—चाक आपलं फिरतंय् गरगर गरगर!—बोटीचा पत्ता नाहीं!

खुदीराम : तुझ्या असल्या बडबडीनं बोट लवकर येईल असं तुला वाटतं कीं काय? वादळामुळें झाला तीनचार आठवडे उशीर, येईल उद्यांपरवां. आतां तुझी बडबड बस् कर. तिकडचा तो कागद नि माझी कातरी दे बघूं.

(शिब्बन कागद आणि कातरी त्याच्या अंगावर टाकतो.)

शिब्बन : (नाक 'सूं सूं' करीत) आतां कागदाचीं फुलं कातरीत बसणार वाटतं?—पुरुषांनीं असलं काम करायचं म्हणजे—

खुदीराम : तोंडाची वटवट करीत बसण्यापेक्षां हें काम बरं.

शिब्बन : कसलं बायकी काम! जरा वेळ सांपडला कीं फुलं कातरीत बसतोस तूं.

खुदीराम : हातांना कांहीं काम असलं म्हणजे बरं वाटतं. असल्या एकांत ठिकाणीं दिवसच्या दिवस काढणारांना तर असला कांहीं तरी छंद पाहिजेच. तूं बघ कांहीं तरी छंद, नाहीं तर डोकं फिरेल तुझं. खुळ्यासारखी कांहीं तरी टडबड करून माझं उठवतोच आहेस डोकं!—

शिब्बन : म्हणजे माणसाला बोलायचीहि बंदी आहे कीं काय? तोंड दाबून या पिंजऱ्यांत तडफडून मरायचं कीं काय? (खिडकीकडे जाऊन काळोखाकडे चिडखोर नजरेनं पहात रहातो.) बोलायची सुद्धां बंदी अं? चोवीस तास तुझ्या त्या कातरीची 'कुर्रकुर्र' मीं ऐकत बसावं, होय ना?—कुर्र–कुर्र–कुर्र–अगदीं त्या चाकाच्यासारखा आवाज.

खुदीराम : कुठल्या चाकाच्यासारखा?

शिब्बन : त्या पांढऱ्या उंदरांच्या.

खुदीराम : चुलींत घाल तुझे ते पांढरे उंदीर!

शिब्बन : तुझा तो कागद नि कातरच चुलींत घाल. सारा दिवस कुर्र–कुर्र–कुर्र–कुर्र–! माझं डोकं उठून जातं अगदीं.

खुदीराम : (संतापून उठतो.) माझ्या कातरीचं कुर्र–कुर्र, नि तुझ्या नाकाची सूंसूं काय? म्हणणे मला कायमची सर्दी आहे. तुला सर्दी आहे हे काय माझ्यावर उपकार? सकाळीं उठावं तर सूंसूं, दुपारीं जेवतांना सूंसूं, रात्रीं बिछान्यावर पडावं तर सूंसूं—माझं डोकं कुजून जातं तुझ्या या सूंसूंनं. तुझं सूंसूं बंद नाहीं केलंस तर ठोसा मारून घोणा फोडून टाकीन नाकाचा. (तो एकदम थांबतो. शिब्बनचा भेदरलेला चेहरा पाहून आपण फार वाहवलों असें त्याला वाटतें). अरे अरे, काय रे, शिब्बन? अरे, असा घाबरलास काय? खरोखरच तुला मी मारीन असं वाटलं कीं काय? हत् खुळ्या!

शिब्बन : खरंच मी घाबरलों. कोंडल्यासारखं होतं रे इथं. त्यामुळं मी कांहीं तरी बडबडतों.

(खुदीराम आपल्या जागेवर जाऊन बसतो आणि फुलें कातरूं लागतो. शिब्बन खिडकीकडे जाऊन उभा रहातो.)

शिब्बन : खरंच कोंडल्यासारखं होतं. कोंडवाडा नाहीं तर काय? कोंडवाडा कीं उंदरांचा पिंजरा?

(खुदीराम वर मान करून त्याच्याकडे पहातो. कांहीं बोलत नाहीं. हातांतलें काम बाजूला ठेवतो, आणि टेबलावरचीं कांहीं बंगाली, इंग्रजी मासिकें चाळून पहातो.)

खुदीराम : (मासिकांतलें एक चित्र शिब्बनला दाखवीत) ही गंमत बघ, शिब्बन.

शिब्बन : (खिडकीकडून येतो आणि चित्र पहातो) यांत कसली आलीय गंमत? नटींचे हे नागडेउघडे फोटो पहाण्यांत मला नाहीं वाटत आतां गंमत.

खुदीराम : ओ हो! लग्न ठरल्याबरोबर तूं, अगदीं साधुपुरुष झालेला दिसतोस!








शिव्वन : तसं नव्हे रे.

खुदीराम : लग्न झाल्यावर वर्ष सहा महिने टिकेल तुझा हा साधुपणा मग येशील ताळ्यावर पुन्हा!

शिव्वन : साधुपणा विधुपणा कांहीं नाहीं रे. कंटाळा आलाय् असल्या चित्रांचा.

खुदीराम : ठीक आहे. दुसरं कांहीं दाखवतों तुला. (कोपऱ्यांतली ट्रंक उघडून त्यांतून एक फोटो बाहेर काढतो.) हा कंवलबाबांचा फोटो पहा.

शिव्वन : कोण हे कंवलबाबा?

खुदीराम : फार मोठे साधुपुरुष आहेत. कलकत्त्याहून शेंकडों लोक त्यांच्या दर्शनाला येतात. हा फोटो टेबलावर ठेवून रोज त्यांच्यापुढं हात जोडून प्रार्थना कर. म्हणजे बरं वाटेल तुला.

शिव्वन : हट्!

खुदीराम : हट् काय?

शिव्वन : असल्या भोंदूवर आपला विश्वास नाहीं.

खुदीराम : कोण भोंदू?

शिव्वन : अरे, असले बुवा सगळे भोंदूच असतात.

खुदीराम : तोंड संभाळून बोल, शिव्वन. कंवलबाबांबद्दल भलते कांहीं शब्द ऐकून घेणार नाहीं मी.

शिव्वन : अरे, असले खूप पाहिलेत बाबा.

खुदीराम : शिव्वन, शिव्वन—

शिव्वन : शिव्वन–शिव्वन काय? अलीकडे फार बाबा बोकाळलेत; त्यांतलाच हा कुणी तरी—

खुदीराम : दांत पाडून टाकीन. कंवलबाबांना अरे तुरे करतोस! कुठं तुझ्यासारखा गांढ्ळ, नी कुठं तो महापुरुष!

शिव्वन : खुद्या–खुदीराम!—शिव्या कुणाला देतोयस्?—गांढ्ळ-बिंढ्ळ असलं कांहीं ऐकून घेणार नाहीं हं मी!

खुदीराम : अस्सं? काय करणार रे तूं, उंदरा?

शिव्वन : तूं काय त्या बाबाचा गंडा बांधलायस् कीं काय?

खुदीराम : तुला काय करायचं? पुन्हा बाबांच्याबद्दल अरे तुरेची भाषा बोलायला लागलास.—तुझे दांत पाडल्याशिवाय तूं गप्प—

शिव्वन : अरे, हो हो खुदीराम. असा अगदीं मारामारीवर काय येतोस? तुझ्या त्या बाबांना मीं पाहिलेंहि नाहींत. मला काय करायचंय् त्यांना अरे तुरे म्हणून?

खुदीराम : हां. असा वळणावर ये.

शिव्वन : तूं उगाच आपला—

खुदीराम : ठीक-ठीक. जाऊं द्या तें सगळं. आपण दोघेहि कावळ्या-सारखे झालोंत. त्यामुळं उगाच कारणाशिवाय कांहीं तरी करतों आहोंत झालं.

शिव्वन : खंच तर मी म्हणतों. पिंजऱ्यांत अडकलेल्या उंदरासारखं झालंय् आपलं. (खुदीराम आपल्या जागेवर जाऊन बसतो.) काय रे खुदीराम?

खुदीराम : काय!

शिव्वन : गोविंदबाबूंच्या पोटांत एकदम कळ आली, आणि त्यांना ऑपरेशनसाठीं बोटीवरून घेऊन गेले त्याला किती दिवस झाले असतील?

खुदीराम : मला वाटतं, सहा आठवडे होऊन गेले—हा सातवा आठवडा—

शिव्वन : काय? सात आठवडे झाले?—सात आठवडे!—अरे बाप रे!—गेल्या आठवड्यांत रेडिओवरून काय म्हणाले होते ते? आतां आपल्या रेडिओची बॅटरीच संपलीय्, तेव्हां कांहीं ऐकूं येणार नाहीं म्हणा आतां. काय बरं म्हणाले होते ते? हां.—(रेडिओवरल्या आवाजाला वेडावण्याच्या स्वरांत) 'काला लईक दिवादीडीचे हुशार शल्यगदार गोविंदबाबू यांना ॲपेंडिसायटिसच्या ऑपरेशनसाठीं बोट घेऊन आली तेव्हांपासून कित्येक आठवडे भयंकर वादळी हवेमुळें बोट तिथें जाऊंच शकलेली नाहीं. गोविंदबाबूंच्या हाताखालचे दोन शल्यगदार तिथं आहेत. दांडीवर दाणा-पाणी भरपूर आहे; त्यामुळे त्यांचं ठीक असेल असं वाटतं...' ठीक असेल असं वाटतं!—अगदीं ठीक आहे!

खुदीराम : बरोबर आहे त्यांचं. ठीक आहे कीं आपलं.—काय वाईट आहे?

शिव्वन : सध्यां कांहीं वाईट नाहीं. पण समज, गोविंदबाबूंसारखंच आपल्या पोटांत कांहीं झालं नि कळा येऊं लागल्या...माझे एक चुलते होते. तुझ्यासारखेच एका बाबांचे भक्त होते.

खुदीराम : बाबांची गोष्ट सोडून दे—

शिव्वन : ठीक आहे, ठीक आहे.—त्या चुलत्यांचं काय झालं त्यांच्या पोटांत अशीच एकदां कळ आली. कळ म्हणजे काय? डोळे बाहेर आले—कांदे लोंबावे तसे लोंबायला लागले—त्यांना एकदम हॉस्पिटलांत नेलं. मला वाटतं, तिथंच ते मेले.

खुदीराम : बरं मग तुला म्हणायचंय् काय?

---





**शिब्बन** : दुसरं काय म्हणायचं असणार? समज, तुला बसं कांहीं झालं,—नि डोळे बाहेर पडायला लागले— ।

**खुदीराम** : ए, शिब्बन! बस् झाल्या तुझ्या या गोष्टी. दुसरं कांहीं तुला सुचत नाहीं का?

**शिब्बन** : तसे कांहीं उपाय मला माहीत आहेत रे. कालथा चांगला लाल तापवायचा नि पोटावर चरचरून डाग द्यायचा. पण डाग देऊनहि तूं जगशीलचं असं नाहीं—

**खुदीराम** : आतां दांत.पाडून टाकीन तुझे बघ.

**शिब्बन** : पोटावर तो फोड—नि तूं मरून पडलेला—बोट येईपर्यंत मुडद्यांबरोबर राहूं कसा मी?—

**खुदीराम** : ए मुडदेफरास! (उठून त्याच्याजवळ जातो). तुझं डोकं फिरायला लागलंय्.—असाच बोलत राहिलास तर माझंहि फिरून जाईल—आज संध्याकाळपासून तुझ्या डोक्याला कांहीं तरी झालंय्—काळोखाचे गोळे काय—चाक चालवणारे उंदीर काय—पोटावर डाग देतोयस काय!—तुझं डोकं फिरलंय् नक्की तुझं डोकं फिरलंय्.

**शिब्बन** : कांहीं तरी बोलूं नकोस. माझं डोकं चांगलं शाबूत आहे.

**खुदीराम** : मग कांहीं तरी चांगलं बोल. नसेल कांहीं चांगलं बोलतां येत तर गप्प तरी बस.

**शिब्बन** : गप्प बसूं? कां म्हणून गप्प बसूं? तूं कोण मला गप्प बसायला सांगणार? तूं कांहीं या दांडीचा साहेब नाहींस. या दांडीचा साहेब गोविलबाबू आहे. त्याचं पोट कापलंय् नि तो इथं नाहीं, म्हणून तूं दादागिरी दाखवतोयस मला? संध्याकाळपासून बघतोय् मला वाटेल अशी दमदाटी करतोयस तूं....तुला काय वाटतं, गोविलबाबू इथं नाहीं तेव्हां तूं माझा साहेब झालास? अरे, असले छप्पन्न साहेब पाहिलेत तुझ्यासारखे! याद राखून ठेव, ज्यास्त गडबड करशील तर त्या गॅलरींतून खालीं समुद्रांत ढकलून देईन तुला....मोठा साहेब झालाय्. फुलंकातऱ्या, बुकस्वाज लेकाचा!—माझा साहेब!

(खुदीराम संतापानें थरथरत उठतो. डाव्या हातानें शिब्बनचा सदरा धरून उजव्या हातानें त्याच्या.एक थोबाडींत भडकावतो.)

**खुदीराम** : खूप ऐकून घेतली तुझी वटवट. आतां समजलं मी कोण आहे तें?

**शिब्बन** : मा—मा—माफ कर मला—खुदीराम कांहीं तरीच बोललों मी तुला. नको—नको बोलायला होतं तसं—माझा तसा कांहींच हेतु नव्हता. माझं डोकं फिरलंय तूं म्हणालास तेव्हां मी भेदरून गेलों,—खरंच भेदरून गेलों—खुदीराम!

**खुदीराम** : ठीक, ठीक! आतां गप्प बस. मी तुला कांहीं करणार नाहीं. (शिब्बन खिडकीकडे जाऊन उभा रहातो. खुदीराम कागद घेऊन फुलें कातरूं लागतो. कांहीं वेळ खुदीरामच्या कातरीचा कुर्र—कुर्र आवाज आणि शिब्बनचें 'सूं सूं' इतकेंच ऐकूं येतं.)

**शिब्बन** : किती आठवडे—किती म्हणून आठवडे...पिंजऱ्यांतले उंदीर नाहीं तर काय?...गरगर गरगर चाक फिरतंय......गरगर गरगर......चाक फिरतंय—उंदीर तिथल्या तिथंच...कसं सुटायचं?... सुटायचं तरी कसं, खुदीराम? केव्हां येईल बोट, खुदीराम?

**खुदीराम** : तें मी काय सांगूं खुळ्या? हवा जरा सुधारली कीं येईल. त्यांनासुद्धां कल्पना आहेच कीं. उगाच उशीर करणार नाहीत ते. तुला काळजी कसली इतकी वाटते शिब्बन?

**शिब्बन** : काळजी नाहीं वाटत रे! (खिडकीबाहेर पहात) काळोख पहा किती आहे तो. किती म्हणून हा काळोख—छे, छें! नाकांत, तोंडांत, डोळ्यांत हा काळोख भरतो नि मला गुदमरायला होतं... छे—छे!...छे छे! (किंचित् थांबतो, आणि एकदम ओरडतो.) बंद कर तुझं तें कुर्रर कुर्रर, नाहीं तर डोकं फिरेल माझं तें ऐकून...त्या कुर्कुरीमुळं डोक्यांतले विचारच कांहीं समजत नाहींत.

**खुदीराम** : समजण्यासारखे नाहींतच ते विचार. करूंच नकोस तूं विचार. काय रे, माझ्या कातरीच्या कुर्कुरीचा तुला त्रास होतो, नि तुझ्या नाकाच्या त्या 'सूं सूं' चं काय? तें कांहीं अजून थांबलेलं नाहीं.

**शिब्बन** : तें कसं थांबेल? नाक कांहीं मला बाजूला काढून ठेवतां येत नाहीं. तुझी कातर तुला बाजूला टाकतां येईल. ठेव कीं जरा बाजूला.

**खुदीराम** : हें बघ, शिब्बन, तूं माझ्या वाटेला जाऊं नकोस. तुला कांहींच सुचत नसेल तर वर जा, नि बत्तींत तेलपाणी बरोबर आहे का पाहून ये.

**शिब्बन** : संध्याकाळीं मी गेलों होतों. आतां तुझी पाळी आहे.

**खुदीराम** : मुकाट्यानं बत्ती बघून ये. आतांपर्यंत तुझा खूप फाजीलपणा ऐकून घेतला. आतां मात्र मुळींच गय करणार नाहीं मी. याद राखून ठेव. चल, ऊठ!

**शिब्बन** : कोण समजतोस तूं स्वतःला?—गोविलबाबू?

**खुदीराम** : मी स्वतःला कुणी समजत नाहीं. गोविलबाबू इथं नाहींत. मी तुझ्यापेक्षां जुना आहें. तेव्हां गोविलबाबू नसतांना मीच इथला मुख्य...चल, ऊठ. एक जादा शब्द बोलशील तर—

**शिब्बन** : माझ्यावर दादागिरी करतोस?

**खुदीराम** : असं? (उठतो). बऱ्या बोलानं नाहीं ऐकणार तं! (त्याच्या खांद्यावर हात ठेवतो.) चल, ऊठ.

**शिब्बन** : माझ्या अंगाला हात लावूं नको, खुदीराम!

**खुदीराम** : (त्याची मान पकडून त्याला वर उठवीत), स्वतःच्या पायांनीं वर जाणार कीं—

**शिब्बन** : (त्याच्या पकडींतून सुटण्याकरितां धडपडत) नाहीं जाणार वर मी.

**खुदीराम** : (त्याला वर जाणाऱ्या लोखंडी जिन्याकडे ढकलीत) पहातों कसा जात नाहींस तो! (जिन्याच्या पायरीवर रेटून चढवतो.)

**शिब्बन** : (स्फुंदत) खुद्या, खुद्या, तुला याचीं फळं भोगावीं लागतील—तुझा सूड घेतल्याशिवाय रहाणार नाहीं मी—मी—मी—

**खुदीराम** : चूप. (शिब्बन त्याचा गळा दाबण्याचा प्रयत्न करतो खुदीराम त्याच्या नाकावर एक ठोसा मारतो. त्याच्या नाकांतून रक्त वाहूं लागतें.) बघ, नाकांतून रक्त आलं तुझ्या. हा घे रुमाल. नाक पूस नि वर जा गुपचूप. मी जरा खालीं जाऊन येतों. जरा डोकं थंड झाल्यावर तुझं तुलाच वाईट वाटेल.

(कंदील घेऊन खुदीराम खालीं जातो. कंदील गेल्यामुळें खोलींत काळोख होतो. जिन्याच्या पायरीशीं शिब्बन धडपडतो आहे.)

**शिब्बन** : माझ्या नाकांतून रक्त काढलंस काय? ठीक आहे.

अनुक्रमणिका








पाहून घेईन. तुला या कर्माचीं फळं भोगावींच लागतील. तुझा सूड घेतल्याशिवाय रहाणार नाहीं मी, खुद्या! (वेड्यासारखा हसत जिना चढूं लागतो.) तूं काय समजलायस?...धरतीचा चक्काचूर करून टाकतों. म्हणजे काळोख—चांगलाचं काळोख होईल...मग येऊं द्यां बोट—तूं इथलां साहेब नाहीं कीं?—तुझाच गळा धरतील ते—मला काय करणार ते—मी आहेंच कुठं इथं?—मी चाललों—मी चाललों—मी चाललों वर काळोखांत पोहायला—मखमली-मखमली काळोखांत—काळोखांत—काळोखांत—काळोखाच्या काळ्या समुद्रांत—(तो वर जातो. कांहीं वेळ स्तब्धता. कांचा फुटल्याचे, घण मारल्याचे आवाज ऐकूं येतात. ठराविक वेळानें खिडकींतून दिसणारा दांडीचा प्रकाशझोत दिसावयाचा बंद होतो. कांहीं वेळानें शिब्बन खालीं येत असलेला दिसतो.)—आतां खरा काळोख झाला. अगदीं हात लावून पहावा. हाताला लागतोय् काळोख! लहानपणापासून मला काळोख आवडतो. —काळोखाची मला मुळींच भीति वाटत नाहीं.

(शिब्बन गॅलरींत उघडणाऱ्या मधल्या लोखंडी दरवाज्याकडे जातो आहे. घाईघाईनें वर येणाऱ्या खुदीरामच्या पावलांचे आवाज ऐकूं येतात.)

**खुदीराम :** (जिन्यावरूनच) शिब्बन, शिब्बन, काय, झालं काय? कुठं आहेस तूं?

**शिब्बन :** काळोखांत उडी घेतोंय मी, खुदीराम—हा बघ गॅलरीच्या कठड्यावर चढलों—चांगला शेंकडो मैल पोहत जाणार काळोखांत... (लोखंडी दरवाज्याची कडी काढण्याचा तो प्रयत्न करतो आहे. कडी निघते. वाऱ्याच्या जोरानें धाड्कन् दरवाजा उघडतो. तो कठड्याकडे धावतो. वादळाचें घोंघावणें एकदम मोठ्यांदा ऐकूं येऊं लागतें. शिब्बन कठड्यावर चढलेला दिसतो. कंदिल घेतल्याशिवाय खुदीराम वर धांवला आहे. त्याला काळोखांत एकदम शिब्बन दिसत नाहीं.)

**खुदीराम :** शिब्बन! शिब्बन! आहेस कुठं तूं! कांचा फुटल्याचे आवाज मघाशीं कुठून आले!

**शिब्बन :** (कठड्यावरून वादळाच्या आवाजावर आपला आवाज चढवून) काळोखांत-काळोखांत—इथं कठड्यावर मी आहें, खुदीराम! इकडे पहा, इकडे पहा. मखमली काळोख कसा हाताला लागतोय् पहा! काळोखावर पोहत जाणार मी—पोहत जाणार. तूं मात्र फांसावर लटकणार, खुद्या!...त्यांनी खात्रीनें वाटणार, तूंच मला पाण्यांत ढकलून मारलंस म्हणून—तूं फांसावर लटकणार—खुद्या, तूं फांसावर लटकणार!

**खुदीराम :** शिब्बन वेड्या, आंत ये. अरे, आंत ये. नाहीं तर वाऱ्याच्या झपाट्यानें पाण्यांत उडून जाशील—

**शिब्बन :** अरे, मी पोहायला चाललों—तूं मात्र लटकणार—अच्छा, खुदीरामसाहेब, अच्छा-अच्छा!—

(कठड्यावरून झुकांडी जाऊन तो एकदम खालीं जातो. त्याचे शब्द वादळाच्या आवाजांत विरतात. त्या उघड्या दरवाज्याकडे पहात खुदीराम पुतळ्यासारखा निश्चल उभा आहे.)

पद्मा

('दि डार्क' या इंग्रजी एकांकिकेवरून)



अनुक्रमणिका





ही मंगल दिवाळी
आणि
नूतन वर्ष
आमच्या
असंख्य ग्राहकांस
आणि
हितचिंतकांस
सुखसमृद्धीची
जावोत !

चित्रांच्या आणि छायाचित्रांच्या एकरंगी, दुरंगी, तिरंगी, लाईन आणि हाफटोन ब्लॉक्स व स्टिरिओज्साठीं प्रसिद्ध.

**प्रभात प्रोसेस स्टुडिओ**

**शंकर आणि कंपनी**

धोबीवाडी, ठाकुरद्वार रोड, मुंबई २

टे. नं. २७४६७






एखाद्या स्त्रीनं एखाद्या पुरुषाशीं लग्न करायचंच असा निश्चय केला असला, तर तिच्या तडाख्यांतून सुटण्याचा फक्त एकच मार्ग आहे, अशी माझी खात्री आहे. आणि तो म्हणजे, तातडतोब शक्य तितक्या लवकर तिच्यापासून शक्य तितकं दूर पळून जाणं, एवढाच. अर्थात् कधीं कधीं हा खात्रीचा मार्ग सुद्धां अगदीं निरुपयोगी ठरतो. माझ्या एका मित्रानं एकदां हा मार्ग पत्करून पाहिला. आतां वेळी जीव अगदीं भाग आहे, अशी खात्री झाल्याबरोबर तो मुंबई बंदरांतून सटकला. तो सुद्धां कुणाला कांहीं न सांगतासवरतां. फक्त अंगावरच्या कपड्यानिशीं. इतकी धास्ती त्याच्या मनानं घेतली होती. पुढचं सारं वर्ष त्यानं जगभर भटकण्यांत घालवलं. नंतर मात्र त्याला वाटलं कीं आतां घरीं परत जाण्यांत कांहीं धोका नाहीं.—स्त्रिया चंचल असतात, आणि वर्ष-भराच्या अवधींत ती बहुतेक मला विसरून गेली असेल.—अशा समजुतीनं त्यानं परत फिरण्याचं ठरवलं. पण कर्मधर्मसंयोग असा कीं धक्क्यावर हर्षभरानं रुमाल फडकवणारी पहिली व्यक्ति त्याला दिसली ती नेमकी तीच, कीं जिच्या-पासून त्याला संरक्षण हवं होतं!

त्याच्या सहनशीलतेंत कधीं रतिमात्र अंतर पडलं नाहीं. प्रत्येक दिवशीं न चुकतां तो तिला पत्र लिही. तिच्या खुशालीची विचारपूस करी. लगेच एखाद्या घराचं किचकट वर्णन करी.

आणि मग एके दिवशीं अनपेक्षित असं तिचं पत्र त्याच्या हातीं पडलं—

मध्येया या साऱ्या आयुष्यांत मीं फक्त एकच पुरुष असा पाहिला आहे, कीं जो अशा परिस्थितींतसुद्धां वेडा राहिला. आणि त्या अटळ संकटांतून त्यानं आपली सुटका कशीबशी करुन घेतली. दत्ता त्याचं नांव. दत्ता देवधर. तो जेव्हां कामिनीच्या प्रेमांत पडला,—खरं म्हणजे त्याला पडण्याचं कांहींच कारण नव्हतं,— तेव्हां वयानं तो कांहीं लहान नव्हता. असल्या भानगडींचा त्याला अनुभव नव्हता, असंहि नाहीं. आणि अशा नाजुक परिस्थितींत पुरुषानं चोवीस तास सावध असायला हवं, हें पण त्याला चांगलं माहीत होतं आणि असं असून सुद्धां कामिनीनं त्याचा बळी घेतला. या अशा प्रकरणांत पुरुषाला निःशस्त्र आणि असाहाय्य करण्याची कला कांहीं स्त्रियांना फार चांगली साधलेली असते. आणि अशा एखाद्या स्त्रीच्या सहवासांत पुरुष आपलं सारं चातुर्य, शहाणपण, कर्तृत्व आणि केव्हां केव्हां सर्वस्व सुद्धां गमावून बसतो. अशा वेळीं मग पुरुषाची अक्कल पण अगदीं काम देईनाशी होते. खांडेकरांच्या किंवा सानेगुरुजींच्या एखाद्या करुण कथेची नायिका म्हणून कामिनी खचित शोभली असती. कारण अश्रूंचं भांडवल तिच्याजवळ भरपूर होतं.

कामिनी बिचारी विधवा होती. तिचे डोळे काळेभोर होते. आणि या डोळ्यांतून काळजाला हात घालण्याची किमया कळत न कळत तिला चांगली साधली होती. तिचे ते डोळे नेहमीं रडण्याच्या बेतांत असल्यासारखे दिसत. त्या डोळ्यांकडे पाहिलं कीं असं वाटायचं कीं, हें जग तिला अगदीं असह्य झालं आहे. अरेरे, गरीब बिचारी! तिनं फार भोगलं असलं पाहिजे. सहन केलं असलं पाहिजे. खरोखर, असं आणि इतकं दुःख बाई-माणसाला सहन करायला लागणं हा देवाघरीं मोठाच अन्याय ठरला पाहिजे.

दत्ता सशक्त होता, देखणा होता, आणि त्याच्या बापानं त्याच्यासाठीं गडगंज पैसा मिळवून ठेवला होता. तेव्हां स्वाभाविकच कामिनीकडे पाहिल्यावर त्याला असं वाटलं कीं या असाहाय्य, दुर्बल आणि सुंदर स्त्रीचं जगाच्या क्रूर आघातांपासून आपण संरक्षण करायला हवं—आणि तिच्या त्या मोठाल्या काळ्याभोर डोळ्यांतले अश्रू तिला जवळ घेऊन पुसून टाकायला हवेत. त्याच्या जागीं तुम्ही असतांत, तर तुम्हांला सुद्धां खात्रीनं असंच वाटलं असतं. जगानं सर्वांनींच कामिनीची कशी छळवणूक मांडली होती, त्याचं सविस्तर वर्णन त्याच्याच तोंडून मला एकदा ऐकायला मिळालं. बिचारी अशी दुर्दैवी होती, कीं जगांत कसलं म्हणून अगदी लहानसं सुख सुद्धां तिच्या वांट्याला आलं नव्हतं. सुखाच्या यत्किंचित् अपेक्षेनं बिचारीनं जी जी गोष्ट केली, ती ती तिच्या असह्य दुःखाला कारण झाली होती. तिनं लग्न केलं, तर नवरा मिळाला तो दारुड्या. सदा मारहाण करणारा. तिनं आपलं दागिने कुणाच्या स्वाधीन केलं, तर तो तें दाबून बसला. सैंपाकासाठीं तिनं बाई ठेवली, ती नेमकी चोरटी. धारोष्ण दूध आणि साजूक तूप मिळावं, म्हणून तिनं गाय घेतली; तर ती दोन दिवसांत तडफडून मेली आणि तिनं घर बांधलं, तर तें चार महिन्यांत जळून खाक झालं. तेव्हां अशा या स्त्रीच्या सहवासांत दत्ताचं अंतःकरण करुणेनं आणि दयेनं कांठोकांठ तुडुंब भरुन आलं, तर त्यांत नवल नाहीं.

—शेवटीं एके दिवशीं त्यानं मला ती आनंदाची बातमी सांगितली. अखेरीस मोठ्या कष्टानं लग्न करण्यासाठीं त्यानं तिचं मन वळवलं होतं. बातमी लग्नाची होती. आनंदाची होती. तेव्हां तो ऐकतांक्षणींच त्याचं अभिनंदन करणं माझं कर्तव्यच होतं. त्यावर तो म्हणाला, "हें बघ, आजपर्यंत तूं कधीं तिच्याशीं फारसा बोलला नाहींस, हें ठीकच आहे. पण आतां मात्र ती माझी बायको होणार आहे. आणि तूं नेहमीं माझ्याकडे येतोस. दररोजची तुझी फेरी कधीं चुकत नाहीं. तो तुझा क्रम तसाच चालू राहिला पाहिजे. त्यांत मुळींच अंतर पडतां कामा नये. आतां तुझी तिला थोडी भीति वाटते, ही गोष्ट खरी. तिला वाटतं कीं तूं फार कठोर आहेस, निष्ठुर आहेस. फार काय, थोडासा दुष्टहि आहेस. मीं परोपरीनं तिला सांगून पाहिलं—पण काय रे, तिला असं कां वाटतं?"

"तें तिचं तिलाच विचारुन पहा कीं."

"तुला ती आवडते, खरं ना?"

"अर्थातच. अशी सुंदर स्त्री कोणाला आवडणार नाहीं?"

"मग असं कां? दुर्दैवी आहे बिचारी. फार भोगलं तिनं."

"हूं ऽ"—म्हणून मीं सुस्कारा सोडला.

आता तुम्हीच सांगा, यावर मी तरी आणखी काय बोलणार होतों! मला माहीत होतं कीं कामिनी अगदी मूर्ख आहे. मूर्ख आहे, एवढंच नाहीं तर चांगली कावेबाज आहे. धूर्त आहे. आणि मला तर अगदीं नक्की वाटत होतं कीं शरीरानं ती फार नाजुक होती, तरी मनानं तशी ती खासच नव्हती.

...अगदीं पहिल्यांदा कामिनीला मीं पाहिलं, तें क्लबांत. योगायोग असा कीं आम्ही ब्रिज खेळायला म्हणून बसलों. आणि मला पार्टनर मिळाली ती नेमकी कामिनी. खेळतांना दोन वेळां माझीं भारी पानं हुकूम टाकून तिनं मारलीं. त्यांतला एक तर एक्का होता. अर्थातच ती कितीहि मूर्खपणानं खेळली, तरी बोलण्याची कांहीं सोयच नव्हती. पण त्यावेळीं जर कोणाच्या डोळ्यांत अश्रू यायलाच हवे होते, तर ते माझ्याच; हें तर तुम्ही कबूल कराल कीं नाहीं? पण रडली मात्र ती. थोड्या वेळानं आम्हीं पार्टनर्स बदलले. आणि दुसरा डाव मांडला. आणि मग मात्र ती पुष्कळसे पैसे हरली. उद्यां चेक पाठवून देतें, म्हणून म्हणाली. तो चेक तर तिनं कधीं पाठवला नाहींच. म्हणजे याचा अर्थ असा कीं तिनं चक्क माझे पैसे बुडविले. आता यानंतर पहिल्या भेटीच्या वेळीं गुन्हेगार म्हणून कोणी कुणाशीं वागावं? पण तिच्या लेखीं गुन्हेगार ठरलों होतों तो मी. आता यावर तुम्ही काय म्हणाल, बोला?

...दत्तानं आपल्या मित्रमंडळीशी तिची ओळख करुन दिली. तिच्या अंगाखांद्यांवर मौल्यवान् वस्त्रालंकार घातले. आपल्याबरोबर तिला तो सगळीकडे घेऊन जायला निघाला. मॅजिनींत लंचला, ताजमध्यें डिनरला, सी. सी. आय. मध्यें पार्टीला, मेट्रोंत सिनेमाला, रविवारीं जुहूला आणि






क्वचित् तेव्हां खंडाळ्याला नाहीं तर माथेरानला. 'आतां त्यांच्या लग्नाला थोडाच अवकाश होता.

दत्तला स्वर्ग दोन बोटं उरला होता.

आणि मग यापुढची गंमत अगदी सांगण्यासारखी आहे. कां, कसं, तें त्यीचं त्याला सुद्धा कधीं कळलं नाहीं; पण एकदम त्याचं प्रेम ओसरलं. तो प्रेमात पडला होता, तो आता शुद्धीवर आला. आणि एकदम उठून उभा राहिला. आणि पळून जाण्यासाठीं दाही दिशा शोधायला लागला. त्याला एकदम तिचा असा कंटाळा कां आला, तें त्याचं त्यालाच धड सांगतां येत नव्हत, तर मी तरी कसं सांगणार ? तिच्या संभाषणाला तो विटला असेल, असं म्हणावं तर संभाषण असं कधीं ती करीतच नसे. मग नक्की काय झालं ? कदाचित् तिच्या त्या मोठाल्या डोळ्यांतून ओघळणारे अश्रू त्याला बघवेनासे झाले असतील. तें काहीं का असेना, पण त्याचे डोळे एकदम खाडकन उघडले, ही गोष्ट मात्र खरी. आणि मग मात्र तो पुन्हा माणसांत आला आणि शहाणपणानं वागायला लागला. आतां अडचण एकच होती. आपल्याशीं लग्न करण्यासाठीं कामिनीनं कबर कसली आहे, हें त्याला कळून चुकलं होतं. उलट आतां काहीं झालं, तरी कामिनीशी लग्न करायचं नाहीं, अशी त्यानं भीष्मप्रतिज्ञा केली होती. पण आताची त्याची स्थिति मात्र मोठी विलक्षण होती. शुद्धीवर आल्याबरोबर कोणत्या स्त्रीशीं आपली गाठ पडली आहे, हें त्याला कळून चुकलं होतं. आणि आतां जर का या बंधनांतून आपली सुटका करण्यासाटीं त्यानं तिला गळ घातली असती.—छेः छेः ! तें तर अशक्यच होतं म्हणा—तर लगेच आपल्या मोठाल्या डोळ्यांत तिनं थेंबसे अश्रू गोळा केले असते. आणि या अशा व्यवहाराबद्दल बऱ्याच मोठ्या रकमेची तिनं त्याच्याकडे नक्कीच मागणी केली असती. शिवाय दुसरं असं कीं पुरुषानं स्त्रीचा नाहीं म्हणणं, हें कांहीं नाहीं तरी थोडंसं विचित्रच दिसतं. जसं कांहीं नाहीं म्हणायचा अधिकार फक्त स्त्रीयांचाच आहे! आणि पुरुषानं जर कधींकाळीं नाहीं म्हणून सांगितलं, तर लोक त्यालाच शिव्या घालतील, आणि त्यानं तिला टाकलं, असच म्हणत राहतील.

म्हणून दत्ता बोलला नाहीं कीं चालला नाहीं. योग्य संधीची वाट पहात स्वस्थ बसून राहिला. कामिनीविषयीं आपली भावना बदलली आहे, हे एका चकार शब्दानं त्यानं कधीं तिला कळूं दिलं नाहीं. पूर्वीसारखाच अजूनहि तिची प्रत्येक इच्छा तो पुरी करीत असे. तिची प्रत्येक आज्ञा विनयोभाव पाळीत असे. पहिल्यासारखाच अजूनहि तो तिला ताजमध्ये, मॉजिनींत, एरॉसमध्यें, मेट्रोंत, किंवा जुहू-माथेरानला नेत असे. लहानमोठ्या मौल्यवान् प्रेझेन्टस्चा तिच्यावर वर्षाव करत असे. आणि त्याची तिच्याशीं असलेली वागणूक पहिल्यासारखीच अकृत्रिम मनकळेपणाची होती. खरं म्हणजे आतां त्यांनीं तातडतोब लग्न उरकून घ्यायला पाहिजे होत. त्यात एकच चारीकसा अडथळा होता. लग्न झाल्यावर आरामांत राहाण्यासाटीं घर शोधूनसुद्धां अजून त्याला सापडत नव्हत. घर मिळालं कीं लगेच लग्नाचा बार उडवून द्यायचा, हें दोघानींहि मनोमन टरवलं होतं. आज पुष्कळ दिवस झाले, त्यांनी संयोस्कर घराचा शोध करायला सुरुवात केली होती. दर आटड्यात दत्ताच्या टेबलावर इस्टेट एजंटाच्या पत्रांचा ढीग पडत असे. मग दोघामिळून तीं काहीं मोजक्या घराची पहाणीसाटीं निवड करीत आणि मग गृहसंशोधनाच्या मोहिमेवर तीं निघत. दुर्दैव असं कीं मनासारखं समाधानकारक घर त्याना अजून सांपडत नव्हतं. दत्तानं आणखी काहीं नव्या एजंटाकडे विचारणा केली. त्यांच्या टेबलावर पत्रांचे ढीग आणखी गोळा व्हायला लागले. तीं सारीं पत्र तीं काळजीपूर्वक वाचून पहात. आणि मग पायापासून छपरापर्यंत प्रत्येक घराची





अनुक्रमणिका

लक्षपूर्वक पहाणी करीत. कधीं कधीं घर फार लहान असे. तर कधीं कधीं फार मोठं असे. कधीं कधीं मुंबईपासून फार दूर असे. तर कधीं कधीं फार जवळ असे. कधीं कधीं त्याची किंमत परवडण्यासारखी नसे, तर कधीं कधीं दुरुस्त्यांचा खर्च भारं करावा लागेल असं त्याला वाटे. कधीं कधीं घरांत फार काळोख असे. कधीं कधीं फार उजेड असे. एकूण काय प्रत्येक घरांत दत्ताला कांहींना कांहीं दोष काढी. त्याला खूप कारण एकंदरींत फार कठीण. त्याच्या लेखकाच्या कामिनीसाठीं जें घर घ्यायचं, तें स्वाभाविकच त्याच्या दृष्टीनं अगदीं निर्दोष असायला हवं होतं. आणि कांहीं केल्या असं निर्दोष घर अजून दृष्टीच्या टप्प्यांत येत नव्हतं. घरं पाहण्याचं काम अत्यंत किचकट आणि कंटाळवाणं आहे. आणि पुढं पुढं तर ती बिचारी अगदीं त्रासून गेली. दत्तानं दरेक खेपेस प्रत्येक घरांत कांहीं ना कांहीं खोड काढावी आणि असं कांहीं झालं म्हणजे मग तो तिला आणखी दम धरण्याचा सल्ला देई. याचा परिणाम असा झाला कीं कामिनी चिडखोर बनली. त्याला असं खात्रीनं वाटत होतं कीं कुठें ना कुठें त्याला अगदीं हवं होतं तसं निर्दोष आणि सर्वगुणसंपन्न घर असलंच पाहिजे. थोडा दम धरला आणि कळ सोसली, तर असं घर शेवटीं सांपडेलच. त्यांनीं शेकडों घरं पाहिलीं. हजारों जिने पायांखालीं तुडवले. असंख्य स्वैंपाकघरांची पहाणी केली. कामिनी अगदीं कंटाळली. आणि हळू हळू तिच्या मनाचा तोल सुटत चालला. एके दिवशीं रागावून ती म्हणाली, "आतां जर का तूं घर लवकर शोधून काढलं नाहींस, तर मला सगळ्याच गोष्टींचा फेरविचार करावा लागेल. तुझा हा घरांचा शोध असाच अखंड चालू रहाणार असेल, तर आणखी अनेक वर्षेपर्यंत आपलं लग्न होण्याची आशाच नको."

"हूं. असं कांहीं बोलू नकोस हं कामिनी. माझं म्हणणं एवढंच आहे कीं जरा दम धर. आणखी कांहीं एजंटांकडे विचारणा केली आहे. आणि त्यांचीं उत्तरं पण यायला लागलीं आहेत. ही पहा. ही यादी पाहिलीस? अजून शंभर एक घरं तरी आपल्याला पहायला हवीत."

आणि पुन्हा त्यांचा कधी न संपणारा शोध चालू झाला. घर शोधायला जायचं, तें फक्त रविवारीं, नाहीं तर सुट्टीच्या दिवशीं. त्यापायीं दोन वर्ष गेलीं तीन वर्षं झालीं. कामिनीचं बोलणं खुटलं. ती अबोल झाली. हुंदके देऊन डोळ्यांत गोळा होणारे अश्रू आतां ती डोळ्यांच्या कडांवर थोपवून धरायला लागली. रागावली. दमली. क्वचित् कधीं भांडायला लागली. माणसाच्या सहनशक्तीला कांहीं मर्यादा आहे. कामिनी सहनशील होती, आणि वाट पहाण्याची तिची तयारी होती; नाहीं असं नाहीं. पण माणसानं वाट तरी किती पहायची? म्हातारपणापर्यंत? मरेपर्यंत? का अनंत काळपर्यंत? वाट पहायला कांहीं सीमा आहे कीं नाहीं? शेवटीं एक दिवस चिडून, आवाज चढवून तिनं त्याला विचारलं, "आतां पुन्हा एकदांच आणि अखेरचं विचारतें, तुला माझ्याशीं लग्न करायचं आहे कीं नाहीं?"—तिच्या आवाजांत अपरिचित कठोरपणाची धार होती. पण त्यामुळें त्याच्या सौम्यपणाला जरासुद्धां धक्का पोंचला नाहीं.

"लग्न तर अवश्य करायचं. ज्या क्षणाला घर सांपडेल, त्या क्षणाला आपण लगेच पुढची तिथी ठरवून टाकूं. ही पहा आणखी कांहीं घरांची यादी, मग काय? निघायचं ना आता दौऱ्यावर?"

"नाहीं. आतां मला बरं वाटत नाहीं. डोकं दुखायला लागलं आहे माझं."




















"डोकं दुखतं आहे ? खरंच ? मग काय ? मेंथॉल चोळूं ? का अॅस्प्रो घेतेस ? थोड्या तेलानं बरं वाटेल—आज सबंध दिवस मला मोकळा आहे. तेव्हां वेळेची तशी फारशी चिंता नाहीं."

शेवटीं एक दिवस कामिनी खरोखरच आजारी पडली. आणि गंमत अशी कीं त्याला समाचाराला आला, तरी ती आतां त्याची भेट घेण्याची टाळाटाळ करी. मग तो बिचारा हातांतलीं फुलं तशींच मागें ठेवून परत जात असे. पण त्याच्या आणि सहनशीलतेंत कधीं रतिमात्र अंतर पडलं नाहीं. प्रत्येक दिवशीं न चुकतां तो तिला पत्र लिही. तिच्या खुशालीची विचारपूस करी. आणि लगेच एखाद्या घराचं किचकट वर्णन करी.—क्षेत्रफळ, घनफूट, इत्यादि शब्दांच्या परिभाषेंत. असेच आणखी कांहीं दिवस लोटले. आणि मग एके दिवशीं अनपेक्षित असं तिचं पत्र त्याच्या हातीं पडलं.—

"दत्ता

तुझं माझ्यावर खरोखर प्रेम आहे, असं मला वाटत नाहीं. माझी काळजी घ्यायला समर्थ असा दुसरा एक पुरुष-माझ्याशीं लग्न करायला तयार आहे—आणि खरं सांगायचं म्हणजे आजच संध्याकाळीं आमचं लग्न होणार आहे. कळावें.

—कामिनी"

दत्तानं तिच्या पत्राचं उत्तर तांतडीनं रवाना केलं :

कामिनी,

तुझ्या पत्रांतली आनंददायक बातमी वाचून मनस्वी दुःख झालं. पण अर्थातच तुझ्या सुखाचा विचार मला पहिल्यांदा करायला हवा. या पत्रासोबत मी एक नव्या घरांची यादी जोडीत आहे. यांतलं कोणतंहि घर आपण पाहिलेलं नाहीं. या यादींतलं कोणतं तरी एक घर तुला—नव्हे, तुम्हांला—नक्की आवडेल, अशी मला आशा आहे. कळावें.

—दत्ता

[मॉम्‌च्या 'कॉस्मॉपॉलिटन्स्' मधून]



## अखेर कळलें

वावदूक हा म्हणुनि गाजला
शब्दचतुर ही म्हणुनि गाजली
परंतु येतां समोर, त्यांच्या—
गळ्यांत सगळी भाषा थिजली !

धीट धीर हा करि बलसाधन
ती प्रतिपादी बंधविमोचन
परंतु होतां भेट तयांचे
वळले खालीं लाजुन लोचन !

ती सांगे मी अबला नाहीं
हा शिव-बाजी पूजित राही
सन्निध येतां पण, उभयांच्या—
पराभवाची फिरली द्वाही !

चाचरला तो, चाचरली ती
शब्द मोडले ओठावरती
कुठें कर्म तें कुठें क्रियापद
अखेर कळलें कीं ही प्रीती !

—कुसुमाग्रज.








गीतेचें सभासभांतून विनाप्रतिकार टाळ्या मिळवीत हिंडणारें वैभव आणि माहात्म्य निखालस खोटें असल्याचा निर्णय महाभारतांतील इतिहासानेंच दिला आहे.



# श्रीकृष्णांनीं अर्जुनाचा रथ अखेर नरकांत नेला!!

लेखक : पांडुरंग भानुदास [illegible], एम्.ए.

यत्र योगेश्वरः कृष्ण यत्र पार्थो धनुर्धरः।
तत्र कुलक्षयो नाशो नर्को भारतनिर्णयः ॥

### गीतेचें मोकाट सुटलेलें माहात्म्य—

"श्रीमद्भगवद्गीता हा हिंदुधर्माचा सर्वश्रेष्ठ ग्रंथ असून त्यांतील अध्यात्मच केवळ अपूर्व नाहीं, तर कार्याकार्यविचारहि अलौकिक आहे. —आणि त्या दृष्टीनें गीताधर्म हा विश्वधर्म होण्याच्या लायकीचा आहे." अशीं वाक्यें उच्चारिलीं कीं सभेंत हमखास टाळ्या मिळतात आणि गीतेचें हें वैभव किंवा माहात्म्य फारसा प्रतिकार न होतां एका सभेंतून दुसऱ्या सभेंत असें गांवोगांव आणि कालोकाल फिरत रहातें. योगेश्वर कृष्ण आणि धनुर्धर पार्थ यांचा महिमाहि तसाच मोठा असल्यानें त्याच्या रक्षणाखालीं दिग्विजयार्थ निघालेला हा गीतावारू रहेतां कोणी अडवूं धजत नाहीं. पण ५००० वर्षांपूर्वीं विश्वसंचारार्थ निघालेला हा अश्व आज खरोखरच फालतू झालेला असून रामाच्या अश्वाप्रमाणें त्यासहि दावणीस बांधणारे कोणी बाल लव-कुश निघतील तर त्याच्या रक्षणकर्त्यांना शस्त्रें खालीं ठेवावीं लागतील अशी परिस्थिति निर्माण झालेली आहे.

### गीता सांगणाऱ्या व ऐकणाऱ्या दोघांचाहि सर्वनाश

"महाभारतकालीं रणांगणावर प्राप्त झालें तसलें कुरुक्षेत्र सर्वकालीं बहुतेकांच्या हृदयांत उत्पन्न होत नसून तुकाराम महाराज सांगतात त्याप्रमाणें 'रात्रंदिन आम्हा युद्धाचा प्रसंग' निर्माण होत असतो. या युद्धांत अर्जुनाप्रमाणें मोहवश आणि किंकर्तव्यमूढ स्थितीहि सर्वांच्या हरहमेश वांट्यास येणारी असल्यानें या व्यामोहांतून मुक्त होऊन कर्तव्यतत्पर बनण्यास भगवंतांनीं अर्जुनापुढें गायिलेला संदेश तेव्हांच नव्हे तर सर्वकाल उपयुक्त आहे..." अशी गीतेची थोरवी सदैव सांगण्यांत येते. या तरफदारीऐवजीं कुरुक्षेत्राच्या सार्वकालिकत्वासंबंधींचा सिद्धांत खरा असला तरी या नित्य कुरुक्षेत्रात विजयी होण्यासाठीं श्रीकृष्णाचा आदेश सर्वकाळीं उपयुक्त ठरेल हें बोलणें व्यर्थ आहे. श्रीकृष्णाच्या उपदेशाची आजची किंवा सार्वकालीन उपयुक्तता तर सोडाच, पण ज्या काळीं, स्थळीं आणि ज्यांना तो उपदेश केला तेव्हां, तेथें आणि त्यांनाहि तो उपयुक्त ठरला नाहीं. एवढेंच नव्हे तर त्या उपदेशाच्या आचारानें ऐकणाराचा आणि सांगणाराचा दोघांचाहि सर्वनाश झाला असा प्रत्यक्ष घडलेला इतिहास आहे.

### लोकांचा नाश करण्यासाठीं श्रीकृष्णाचा अवतार—

या इतिहासावरून गीता हें आत्मोद्धाराचें नव्हे, तर सर्वनाशाचें शास्त्र आहे. आणि असा सर्वनाश करण्याची लहर परमेश्वराला जेव्हां येते किंवा असा विनाशकाळ जेव्हां प्राप्त होतो, तेव्हां आत्मघाताचा हा गीतेंत सांगितला तसला उपाय स्वतः परमेश्वर मानवाला दाखवून देतो, आणि लोकक्षयाचें आपलें कार्य मानवाच्या हातून घडवून आणतो असें दिसतें. परमेश्वर हा केवळ प्रेमस्वरूप असून तो विश्वाचा प्रतिपाळ करतो आणि भक्तांना हातीं धरून चालवितो, हें कल्पन भोळेपणाची आणि ईश्वराच्या दुसऱ्या सर्वभक्षक स्वरूपावर स्वतःच्या सोईसाठीं अज्ञानाचें पांघरूण घालणारी आहे. विश्वाचा प्रतिपाळ करण्यासाठीं म्हणून जेव्हां परमेश्वर उभा रहात असेल तेव्हांचा त्याचा अवतार आणि उपदेश काय असेल तो असो. पण प्रस्तुत गीतेंत परमेश्वराची भूमिका लोकपालनाची नसून योगी अरविंद आपल्या गीतेवरील निबंधांत म्हणतात त्याप्रमाणें—"कुरुक्षेत्रावरील देव सारथी हा सर्व लोकांना क्षय करण्यास प्रवृत्त झालेला काळ आहे." खुद्द भगवान श्रीकृष्णाहि 'कालोऽस्मि लोकक्षयकृत्प्रवृद्धो लोकान्समाहर्तुमिह प्रवृत्तः।' म्हणजे 'मी लोकांचा क्षय करणारा काळ असून मानवांची कत्तल करण्यासाठीं येथें प्रवृत्त झालों आहें,' अशी आपल्या स्वरूपाची आणि प्रस्तुत अवताराची अर्जुनाला (गीता अ. ११ : श्लो. ३२ मध्यें) ग्वाही देत असून हें लोकक्षयाचेंच कार्य त्यांनीं कुरुक्षेत्रावर पार पाडलेलें आहे. आणि या जगत्संहाराला उपयुक्त असाच उपदेश गीताशास्त्रांत त्यांनीं अर्जुनाला केलेला आहे.

### पृथ्वीचा भार हलका करण्याचें वचन

पृथ्वीवर मानवसंभार फार होईल त्या वेळीं तो भार हलका करण्याचें वचन ब्रह्मादिकीं देवांनीं पृथ्वीला दिलेलें असून हें वचन आतां पुरें करावें म्हणून या भारती युद्धापूर्वीं पृथ्वी देवांकडे गेलेली होती. तेव्हां 'ह्या भार












हलका करण्याचें कार्य दुर्योधन करील' असें भगवान श्रीकृष्णांनीं तिला सांगितलें आणि त्याप्रमाणें त्यांनीं गांधारीच्या पोटीं पृथ्वीचा भार हलका करण्यासाठीं दुर्योधनाचा अवतार घेतला. पण दुर्योधनादि कौरव म्हणजे दुष्ट माणसें शेंकड्यांनीं झालीं तरी तेवढ्यानें लोकक्षय होत नसून त्यासाठीं पांच तरी पांडवांची म्हणजे सज्जनांची बुद्धि फिरून त्यांनीं संहाराला प्रवृत्त व्हावें लागतें. पैकीं दुष्ट पुरुष निर्माण होऊन त्यांनीं दुष्कृत्यें करण्याचें कार्य हें सोपें आणि नेहमीं होणारें असून सज्जनांची बुद्धि फिरण्याचें कार्य हें त्या मानानें कठीण असल्यानें त्यासाठीं भगवंताला अवतार घेऊन गीताशास्त्र सांगावें लागलें. येवढेंच नव्हे तर अशा कार्याला कचरणाऱ्या अर्जुनाचे घोडे चाबूक मारून या अनिष्ट मार्गाला वळविण्यासाठीं त्याचें सारथ्यहि पत्करावें लागलें.

## कलियुगाची पूर्वतयारी कृष्णांनीं केली

मार्गशीर्ष शकपूर्व ३१८० मध्यें श्रीकृष्णांनीं अर्जुनाचें सारथ्य पत्करून अभूतपूर्व असा संहार आणि कुलक्षय घडवून पृथ्वी निर्वीर व रत्नरहित केली आणि लगेच पुढच्या वर्षी म्हणजे चैत्र शुद्ध प्रतिपदा शकपूर्व ३१७९ या दिवशीं कलियुगाला सुरुवात झाली हा केवळ योगायोग मानतां येत नाहीं. उलट पुढें कलियुग येणार म्हणून कुरु आणि यादवांचीं कुलें बुडवून आणि सर्व संहार करून श्रीकृष्णांनीं कलियुगाची पूर्वतयारी केली; नव्हे, तेंच त्यांचें अवतारकृत्य होतें असें इतिहासावरून मानावें लागतें. दुर्योधन आणि भीम यांच्या अंतिम गदायुद्धांत भीमानें कमरेखालीं वार करून दुर्योधनाला अन्यायानें ठार केलें म्हणून बलराम संतप्त होऊन नांगर घेऊन भीमावर धावतात तेव्हां श्रीकृष्ण त्यांची समजूत घालतांना म्हणतात, "आतां कलियुग प्राप्त झालें आहे हें मनांत आणा म्हणजे भीमाचें कृत्य वाईट व पापाचें असलें तरी तितकें संतापजनक नाहीं असें आपणांसहि वाटेल." यावरून कलियुग प्राप्त झाल्याची जाणीव भारतीयुद्धकालीं श्रीकृष्णांना असून त्या युगाला शोभणारीं किंवा त्याची पूर्वतयारी करणारीं वाईट व पापाचीं कृत्यें त्यांनीं पांडवांकडून सतत करवून घेतलीं. आणि ज्यांची बुद्धि अद्यापीहि स्थिर होती त्यांना कलियुगाचें आगमन सांगून संतापापासून परावृत्त केलें.

## पापाची लाज बाळगून कसें चालेल?

दुर्योधनाच्या स्वर्गगमनप्रसंगीं त्याच्या वीरतेनें सृष्टि हर्षित झाली, गंधर्व वाद्यें वाजवूं लागले, अप्सरा गाऊं लागल्या, विमानांतून त्याच्यावर पुष्पवृष्टि झाली आणि या सर्व देखाव्यानें पांडव लज्जित झाले तेव्हां त्यांची लज्जा घालविण्यासाठीं श्रीकृष्ण म्हणतात, "भीष्म प्रभृति महाधनुर्धर महारथी तुम्हांस केवळ अजिंक्य होते.- आणि दुर्योधन प्रभृति महावीरहि तुम्हांकडून सरळ युद्धानें मारले जाणें अशक्य होतें...जर रणात असा हा कुटिल मार्ग मीं अनुसरला नसता तर तुमचा विजय कोठून होता?" (-शल्यपर्व: अ. ६१) दुर्योधन शेवटच्या अवस्थेंत प्राणांतिक वेदनांनीं तळमळत असतांना एकदम उठून श्रीकृष्णास म्हणतो, "मी, कर्ण, भीष्म, द्रोण यांच्याशीं सरळ मार्गानें तूं लढतास तर तुझा विजय कदापि न होता! तूं मला अन्यायानें मारविलेंस त्याची तुला लाज नाहीं वाटत! सरळ-सरळ मार्गानें लढणाऱ्या हजारों राजांस अनेक कुटिल उपायांनीं मारूनसवरून तुला लाज वाटत नाहीं!" (शल्यपर्व: अ. ६१) पण या प्रकारची लाज बाळगून कृष्णाचें चालण्यासारखें नव्हतें. कारण 'कलियुग प्राप्त झालें होतें' आणि या युगाची पूर्वतयारी वाईट आणि पापाच्या कृत्यांनीं करणें हेंच त्याचें अवतारकृत्य होतें. गीतेचा उपदेश अर्थात् तदनुकूल असाच ठेवण्याखेरीज गत्यंतर नव्हतें!

## 'विध्वंसयोग' हेंच गीतेचें उद्दिष्ट

गीतेमध्यें भक्तियोग, ज्ञानयोग, हठयोग, कर्मयोग, संन्यासयोग यांपैकीं काय विहित आहे याचा वाद पूर्वापार चालत आलेला आहे. 'अर्जुन संन्यास तर आयताच घेत होता. त्याला पुन्हा संन्यासमार्ग सांगण्याचें प्रयोजन काय?' असा संन्यासमार्गीयांचा उपहास टिळकांनीं केलेला असून 'ज्याअर्थी श्रीकृष्णाच्या उपदेशानंतर अर्जुनानें युद्ध केलें त्याअर्थी कर्माला प्रवृत्त करणारा कर्मयोगच गीतेंत उपदिष्ट आहे,' असा युक्तिवाद त्यासाठीं लढविला आहे. पण गीता ही महाभारतग्रंथाचा एक भाग असल्यानें, उपक्रम-उपसंहारावरून तात्पर्य काढण्याचें हें शास्त्र गीतेपुरतेंच मर्यादित वापरतां येत नाहीं; तर तें सर्व महाभारताला लावून त्यावरून भारतीयुद्धाचें आणि त्याला प्रवृत्त करणाऱ्या गीताशास्त्राचें तात्पर्य काढलें पाहिजे. महाभारताच्या प्रारंभीं कुरुकुल भरभराटलेलें असून लोक धर्मानें चालत असत, तर त्या ग्रंथाच्या शेवटीं कुरु आणि यादवकुलांसहित क्षत्रियकुलें नष्ट झालेलीं असून पृथ्वीवर कलियुग म्हणजे पापाचें राज्य सुरू झालेलें आहे. हा सर्व अनर्थ भारतीयुद्धानें घडवून आणलेला असून या युद्धाला अर्जुनाला प्रवृत्त करण्यास श्रीकृष्णाचा उपदेश म्हणजे गीताच कारणीभूत झालेली आहे. त्यामुळें टीकाकार पूर्वापार मानीत आले त्याप्रमाणें कर्म, संन्यास, भक्ति, हठ यांपैकीं कोणताहि मार्ग परिणामतः गीतेंत निर्दिष्ट नसून कलिकारक 'नाशयोग', 'क्षययोग', 'संहारयोग' किंवा 'विध्वंसयोग' हेंच गीतेचें तात्पर्य मानण्याखेरीज गत्यंतर उरत नाहीं. आणि 'तस्माद् युद्धयस्व', 'मामनुस्मर युद्धय च।' इत्यादि पुनः पुनः येणाऱ्या वचनांचा अर्थ 'तस्मात्' म्हणजे 'कलियुग आणण्यासाठीं' 'माम्' म्हणजे 'लोकक्षयकृत् माम्' असा लावावा लागतो. आणि 'माझ्या अनेक रूपांपैकीं लोकांचा क्षय करणारें रूप तूं सांप्रत आठव आणि कलियुगाचा मार्ग सुलभ करण्यासाठीं सगळा विध्वंस करून टाक,' हाच श्रीकृष्णाच्या म्हणजेच गीतेच्या उपदेशाचा गाभा मानावा लागतो

## श्रीकृष्णांनीं डावललेल्या अर्जुनाच्या शंका

बिचारा अर्जुन याच कर्माची भीत होता. "ज्यांच्यासाठीं राज्य मिळवावयाचें ते सगळे सगेसोयरे एकदम प्राणत्याग करण्यासाठीं उभे

असहेत. 'त्यांना मारून राज्याचें काय करायचें? अत्यंत पूज्य असे भीष्मद्रोणादि गुरु पुढें ठाकले आहेत. त्यांना वध करण्यापेक्षां भिक्षा मागितलेली ठीक नव्हे काय? या सर्वांना मारून आपलें प्रेय किंवा श्रेय तरी काय होणार? राज्य मिळालें तरी रुधिरप्रदिग्ध भोग गोड लागणार नाहींत, म्हणजे प्रेय जाणार, आणि हत्येचें पातक लागल्यानें नरकवास मिळून श्रेयहि हरपणार. शिवाय कुलक्षयापासून काय अनर्थ आहेत हें धार्तराष्ट्रांना ठाऊक नसलें तरी आपणाला माहीत असून आपण त्या मार्गाला कसें जावें? कुलक्षयानें कुलधर्म नष्ट होतात, मग तें कुल अधर्माला लागतें, ह्यामुळें कुलस्त्रिया बिघडतात, त्या बिघडल्या म्हणजे संकर, संकरानें कुलाचा सर्वनाश—आणि मग उत्सन्नकुलधर्मांना कायमचा नरकवास...अरेरे! केवढें हें महापाप आपण करूं घातलें आहे!..." अशा तऱ्हेची हृदयस्पर्शी विपण्ण चित्तानें आणि डोळ्यांत पाणी आणून अर्जुनानें दुसऱ्या अध्यायांत पुनःपुन्हा प्रकट केली आहे. पैकीं कुलक्षया-संबंधींच्या अर्जुनाच्या शंका श्रीकृष्णांनीं सपशेल डावलल्या असून आत्मिक कल्याणाविषयींच्या चिंतेची 'प्रज्ञावाद' म्हणून छद्मानें हसत हेटाळणी केलेली आहे.

### श्रीकृष्णांच्या बायका पळविल्या

पण सबंध महाभारतांत 'प्रज्ञावाद' हें विशेषण जर कशाला यथार्थतेनें लागू पडत असेल तेंं एकट्या श्रीकृष्णाच्याच उपदेशाला आणि 'प्रज्ञावाद' म्हणून त्यांनीं हेटाळलेल्या अर्जुनाच्या सामाजिक व वैयक्तिक कल्याणाविषयींच्या सर्व शंका बरोबर ठरलेल्या आहेत. श्राद्धपर्वांत धर्मराज धृतराष्ट्राला सांगतात त्या हिशेबाप्रमाणें—'भारतीयुद्धात एकंदर ६६ कोटि, १ लक्ष, ३० हजार लोकें ठार झाले.' आणि पुढें यादवांच्या यादवींत ५ लक्ष यादव अर्जुनानें व्यासांना सांगितलेल्या हिशेबाप्रमाणें मेले. पांडवांकडचे ७ आणि कौरवांचे ३ असे १० च लोक या हत्याकांडांतून वांचले. या महाभयंकर संहारानें आर्यभू इतकी निर्वीर झाली कीं, यादवांच्या नाशानंतर श्रीकृष्णाच्या १६ हजार आणि बाकी यादवांच्या हजारों स्त्रिया द्वारकेहून हस्तिनापुरास स्वतः अर्जुन घेऊन येत असतां पंजाबांतल्या आभीरांनीं त्या निर्वासित तांड्यावर हल्ले केले आणि श्रीकृष्णाच्या बायकांसकट यादवांच्या बहुतेक सर्व बायका पळवून नेल्या. कांहीं तर खुषीनें त्यांच्याबरोबर पळून गेल्या! फाळणीनतर पाकिस्तानांतून हिंदुस्थानांत स्थलांतर करणाऱ्या हिंदूंच्या तांड्यांवर मुसलमानांनीं अलीकडे केलेल्या हल्ल्यांहूनहि हा आभीरांनीं अर्जुनरक्षित यादवस्त्रियांवर केलेला हल्ला महाभयंकर असून—

प्रेक्षतस्त्वेव पार्थस्य वृष्ण्यंधकस्त्रियः।
जग्मुरादाय ते म्लेंच्छाः समंताज्जनमेजय ॥

असें या पळवापळवीचें (मौसलपर्व अ. ८ श्लो. १६ मध्यें) वैशंपायनांनीं जनमेजयास वर्तमान सांगितलें आहे. खुद्द अर्जुनदेखील व्यासांपुढें 'माझ्यादेखत त्यांनीं यादवस्त्रिया पळविल्या' असें सांगून शोक करतो. यावरून कुलक्षय व संकरासंबंधींची अर्जुनाची भीति ही पुढें खरी ठरलेली असून अर्जुनाची ही शंका मिटवून गप्प बसणाऱ्या खुद्द श्रीकृष्णाच्या स्त्रिया आभीरांनीं हल्ले चढवून पळवून नेलेल्या आहेत.

### पांडवसैन्याची लांडगेतोड

येवढा महाभयंकर कुलक्षय आणि मानहानिकारक संकट पत्करून मिळविलेला पांडवांचा विजय तरी कांहीं [illegible] होता काय.










मूळ महाभारतांत पांडवांचा पराभव झालेला असून कौरवांचा विजय दाखविलेला होता असें कांहीं विद्वानांचें मत आहे. तें खरें असेल तर पांडवांच्या दृष्टीनें त्यासारखी श्रेयस्कर दुसरी गोष्ट नाहीं, असें म्हणण्याइतका खरोखरी पांडवांना आपला विजय दुःसह झालेला होता. कौरवांचा पराभव करून, दुर्योधनाला मारून, विजयी होत्साते पांडव जो शिबिरांत हुश्श करून लवंडतात तों अश्वत्थामा रात्रीचा तेथें येऊन, आपल्या पित्याच्या—म्हणजे द्रोणाचार्यांच्या अन्यायी वधाचा सूड घेण्यासाठीं, एकादें जंगल तोडावें त्याप्राणें सर्व पांडवसैन्याची कत्तल करून टाकतो. सारे पांडव विजयी मुद्रेनें झोपले असतां, खाटकानें बकरीं कापावींत त्याप्रमाणें, अश्वत्थामा त्या विजेत्यांना कापून काढतो. विजयी सैन्याच्या या कत्तलीला खरोखरी जगाच्या इतिहासांत तोड नाहीं. "अर्धी रात्र झाली असेल इतक्या अवधींत पांडवांचें हें अफाट सैन्य अश्वत्थाम्यानें परलोकीं पाठविलें. माणसें, हत्ती, घोडे यांच्या प्रेतांनीं अतिशय भयंकर झालेली ती काळरात्र राक्षसभूतादिकांना फार आनंददायक झाली. त्या ठिकाणीं हे नानाविध राक्षस व भुतें मांस खात असलेलीं व रक्त पीत असलेलीं जिकडे तिकडे दिसूं लागलीं. रक्त पिऊन आनंद पावून तीं टोळ्याटोळ्यांनीं हिंडूं लागलीं. 'हें मोठें उंची खाद्य आहे!' 'हें फार पवित्र आहे!' 'हें अतिशय गोड आहे!' असें म्हणत म्हणत तीं पांडवपुत्रांचें रक्त, मेद, स्नायू व अस्थि यथेच्छ खाऊं लागलीं...खुद्द पांडवांचें सैन्य येवढेंच नव्हे तर त्यांच्या कोवळ्या कोवळ्या मुलांची ही मेजवानी मिळाल्यानें तीं आनंदित व तृप्त दिसूं लागलीं." असें मोठें कथानक व अंगावर शहारे आणणारें वर्णन या विजयी पांचालादिकांच्या कत्तलीचें सौतिकपर्वाच्या ८ व्या अध्यायांत करण्यांत आलेलें आहे. अन्यायानें, कपटानें आणि फसवणुकीनें झालेल्या द्रोणवधाचा सूड म्हणून अश्वत्थाम्यानें पांडवांचे सर्व जिवंत पुत्र-पौत्र मारले, येवढेंच नव्हे तर पांडवस्त्रियांच्या उदरांतील गर्भहि ठार केले. व्यासांच्या मध्यस्थीनें पांच पांडव कसेतरी मोठ्या मिनतवारीनें जगले. या हत्यासत्रांतून उत्तरेच्या उदरांतील एकुलता एक गर्भ अर्धमृतावस्थेंत कां होईना, न सुटता तर पांडवांचा पुरता निर्वंश होऊन त्यांची निशाणीहि उरती ना. पापी समजण्यांत येणारे कौरव आणि त्यांच्या बाजूचे अकरा हजार राजे आणि अकरा अक्षौहिणी सैन्य रणांगणांत पतन पावून स्वर्गाला गेले, पण पुण्यवान पांडवांचें विजयी सैन्य आणि पुत्रपौत्र, झोपेंत न लढतां कत्तल पावून इह आणि पर दोन्हींना मुकले. या कत्तलखान्यांत नतर पांचाल स्त्रिया आल्या आणि कोणी आपल्या पतिपुत्रादिकांचा हात, तर कोणी पाय, तर कोणी मस्तक असा सांपडेल तो अवयव घेऊन ऊर बडवीत बसल्या. हा यापुढचा कथाभाग तर हृदयद्रावक आहे.

### "हा कसला जय? हा तर पराजयच!"

स्वपुत्रादिकांच्या या जागच्या जागीं झालेल्या महाभयानक कत्तलीचा धर्मराजावर अतिशय परिणाम झाला. ऐषिक पर्वाच्या दहाव्या अध्यायांत धर्मराज म्हणतात कीं, "हा कसला जय? हा तर पराजयच! शत्रूंचा पाडाव झाल्यानंतर त्यांची आतां सरशी झाली व आमचा जय झाल्यावरहि आतां आमचा हा मोड झाला. भाऊबंद, इष्टमित्र, बाप, आजे, मुलगे, नातू, बांधव, मंत्रिजन, या सर्वांना जिंकून शेवटीं आमचाच पाडाव झाला. यशालाच परिणामीं अपयशाचें रूप आलें. तेव्हां हा कसला जय? पराजय! जय मिळविल्यावर जर पश्चात्ताप करण्याचा प्रसंग येतो आणि शत्रूंकडून अधिकच पाडाव होतो तर तो विजय कसा मानावा?"

### या विद्युल्लतेचें तेज पार गेलें!

युद्ध लवकर करीत नाहीं म्हणून शांतिब्रह्म धर्मराजाला जी द्रौपदी पूर्वी टोचून बोलत होती तीच कत्तलखान्यांत आपल्या पुत्रांची लांडगेतोड झाल्यावर काय उद्गार काढते हें पाहण्यासारखें आहे. सौप्तिकपर्वाच्या ११ व्या अध्यायांत ती पांडवांना म्हणते: "फार चांगलें झालें कीं आपले मुलगे मृत्युमुखीं देऊन आतां हे हातीं आलेलें पृथ्वीचें संपूर्ण राज्य आपण भोगीत रहाल! फार सुदैवाची गोष्ट आहे कीं आपण सुखरूप राहून आपल्याला पृथ्वीचें राज्य व गजांत लक्ष्मी मिळाली! आणि आतां सुभद्रेचा तनय अभिमन्यु याची आठवणहि होणार नाहीं! क्षत्रियधर्माप्रमाणें ते आपले शूर पुत्र धारातीर्थी पडलेले ऐकून असल्या प्रसंगांतीहि, आपण माझ्यासहवर्तमान, त्या मुलांची आठवणहि न काढतां, सुखानें रहाल ही फार आनंदाची गोष्ट आहे!" हें सगळें भवितव्य जाणूनच मुळीं धर्मराज युद्धाला प्रवृत्त होत नव्हता. पण त्या वेळीं श्रीकृष्ण आपला पाठीराखा आहे

या शरंवर्षावर, त्याच्या कुशीनं, द्रौपदीनें धर्माला फाडफाडून खाल्लें. आतां, श्रीकृष्णाच्या देखत, युद्धांत नव्हे—तर शिबिरांत निजल्या जागीं, जेव्हां पुत्रांना कुऱ्हाडीच्या मोतीनें, कत्तल होऊन मरण आलें तेव्हां तिचा युद्धोन्माद पार उतरला आणि युद्धाचे हे भयानक परिणाम पाहून ती मूर्च्छित पडली!'

## "तुम्ही आतां रडत रहा!"

"मी हें इतकें कपट न आचरितां तर तुम्हांस जय कसचा मिळता? आणि मग राज्य व लक्ष्मी हीं तरी कोठून येतीं?" असें आपल्या कपटमार्गाचें समर्थन ज्या जय, राज्य, व लक्ष्मीसाठीं कृष्ण (शैल्यपर्व: अ. ६१) करतात, त्यांपैकीं जयाची गत धर्मराज म्हणतात त्याप्रमाणें: 'समुद्रपर्यटण करणाराची नांव शेवटीं नदींत बुडावी तशी' रणांगणावरच्या जयाची कत्तलखान्यांतील पराभवांत झाली. उरलीं राज्य आणि लक्ष्मी. तीं तरी पांडवांना सुखानें भोगतां आलीं का? दुर्योधन मरणकाळीं म्हणतो: "शत्रु चांगले जिवंत आणि धट्टेकट्टे असतांना मी त्यांच्या मस्तकावर नाचलों. देवांनाहि दुर्लभ वाटावे असे इहलोकचे सर्व भोग व उत्कृष्ट ऐश्वर्य मीं भोगलें आणि आतां क्षत्रियांना इष्ट असे हें युद्धांत मरण मला आलें आहे. माझ्याहून उत्तम प्रकारें मरणारा कोण आहे? मी तर आपले इष्टमित्र व नोकरचाकर यांसह स्वर्गास जाणार. विफल मनोरथ झालेले तुम्ही खुशाल येथें रडत रहा!" आणि या दुर्योधनाच्या बोलण्याप्रमाणें पांडवांना खरोखरीच उत्तरायुष्यांत रडत रहाण्याचाच प्रसंग आलेला आहे. अर्जुनाचा तथाकथित व्यामोह घालविण्यासाठीं श्रीकृष्णाला १८ अध्याय गीता सांगावी लागली. पण ती सांगितल्यानंतर, त्या उपदेशानुसार पांडवांनीं जो ज्ञातिवध केला त्यामुळें झालेला शोक एवढा भयंकर होता कीं, तो दूर करण्यासाठीं व्यासांना शेंकडों अध्याय सांगून जवळ जवळ सर्व उत्तर महाभारत खर्ची घालावें लागलें आणि तरीहि शोक कायम राहून हळहळत सर्व पांडवांना मरावें लागलें.

## "हा ज्ञातिवध मला जाळीत आहे!"

कुरुक्षेत्रावर प्रेतांचा खच पडला होता. त्यांपैकीं थोडींबहुत आप्तांनीं ओळखून त्यांचीं और्ध्वदेहिकें केलीं. आणि बाकीचीं धर्मानें ढीगच्या ढीग रचून पेटवून दिलीं. त्या सर्वांचीं श्राद्धें आटोपल्यावर व्यास, नारद प्रभृति शेंकडों-हजारों ब्राह्मण धर्मराजाच्या सांत्वनासाठीं येतात. त्या वेळीं नारद धर्माला विचारतात—

> जितेयं अवनी...कच्चिन्मोदसि पांडव।'

म्हणजे "पृथ्वी जिंकलीस, पांडवा, आतां संतोष आहे ना?" तेव्हां धर्मराज उत्तरतात:

> इदं मम महद्दुःखं वर्तते हृदि नित्यदा।
> कृत्वा ज्ञातिक्षयमिमं महान्तं लोभकारितम्॥
> ॥ १४ ॥ (शांतिपर्व)

म्हणजे "आम्हीं ही सर्व पृथ्वी जिंकून घेतली हें खरें आहे. पण हें भयंकर दुःख माझ्या अंतःकरणांत एकसारखें डांचत आहे. भगवन्, लोभाच्या प्रेरणेनें आपल्या ज्ञातीचा जो भयंकर संहार करून आणि सुभद्रा व द्रौपदी यांच्या ठिकाणीं उत्पन्न झालेल्या प्रिय पुत्रांना काळाच्या तोंडीं देऊन, आम्हीं जो हा जय मिळविला तो खरोखर पराजयच होय असें मला वाटतें."

नारदानंतर व्यासांना पुन्हा धर्मराज म्हणतात:

> मया तु अवध्या बहवो घातिता राजकारणात्।
> तानि कर्माणि मे ब्रह्मन् दहन्ति च पचंति च॥
> —शांतिपर्व अ. ३२

म्हणजे "ज्यांचा वध करूं नये अशा पुष्कळ जणांना मीं राजकारणासाठीं मारलें. तीं कर्में सांप्रत माझें अंतःकरण दग्ध व शरीर शुष्क करीत आहेत." हा ज्ञातिवधाचा घोर शोक पांडवांना अखेरपर्यंत सोडीत नाहीं. आश्रमवासिकपर्वाच्या २२ व्या अध्यायांत वैशंपायनांनीं जनमेजयाला पांडवांची ही स्थिति पुढील-प्रमाणें वर्णन करून सांगितली आहे—"राज्यकारभार, वेदाध्ययन किंवा स्त्रियांचा सहवास कांहींच त्यांस गोड लागेना. एकसारखे त्या घोर ज्ञातिवधासंबंधीचे विचार त्यांच्या मनांत येत. बाळ अभिमन्यूचा रणांत झालेला वध, महाबाहू कर्णाचा वध, त्याचप्रमाणें द्रौपदेयांचा व अन्य इष्टमित्रांचा झालेला विनाश एकसारखा आठवून ते वीर अत्यंत खिन्न होत असत. हे भारता, बहुतेक सर्व वीर ठार होऊन व एकूणएक चांगल्या वस्तू आणि रत्नें नष्ट होऊन निर्वीर व निःसत्त्व झालेली पृथ्वी रात्रंदिवस त्यांच्या डोळ्यांपुढें उभी राही, व त्यांस केव्हांहि समाधान नसे. कोठेंहि जा—कांहींहि करा, त्यांच्या मनाची उद्विग्नता बिलकुल कमी झाली नाहीं."

## "त्या क्षात्रधर्माला धिःकार असो!"

अर्जुन तर पहिल्यानेंच श्रीकृष्णाला सांगत होता कीं, "बाबा रे, ह्या सर्वांना मारून त्यांच्या रक्तांत भिजलेले भोग खावेत यापेक्षां भिक्षा



## अबोधाची वाट

तुझ्या नेत्रांतलें तेज—
करी माझें मन जागें
रूप माझें मला कळे
जुळवीत जुने धागे!

—फुलांतून फुले कळी
नवा घेऊनिया गन्ध
श्वासोच्छ्वासांत गुंफीत
रेशमाचे अनुबंध...

अचपळ संगतींत
पंख फुटती क्षणांना
चढे सोनियाचें पाणी
अंगीं गंजल्या कणांना!

लखलखीत होऊन
सिद्ध लावण्याचा बाण
माझा राहील का नाहीं
वाटे जाईल हा प्राण!

काय याच क्षणासाठीं—
केला होता अट्टाहास;
जुळविला होता छंद
जमविला होता प्रास...

वाटे माझ्या मनामागें
ओळ दिव्यांची लागली,
रम्य अबोधीची वाट
बोधानें कीं उजळली

—वि. म. कुलकर्णी

मागितलेली काय वाईट?" श्रीकृष्णानें त्या वेळीं त्याची टिंगल केली. पण युद्धानंतर घासाघासाला रुक्त लागलेलें दिसून पांडवांना अन्न गोड वाटेना.

न हि शांतिं प्रपश्यामि घातयित्वा पितामहम्।

धर्म म्हणतो : "ज्या महात्म्यानं आम्हांला अंगाखांद्यावर खेळवून ममतेनं वाढविलं त्याला अन्यायानं मारून मला शांति मिळत नाहीं. रक्तानं माखलेलं तें त्या वृद्ध महात्म्याचं शरीर मला सारखं डोळ्यांपुढे दिसतं आहे. बिचारा द्रोण पुत्रमोहानं व्याप्त होऊन, मी खरें सांगेन या विश्वासानं माझ्याकडे आला. तर म्यां कुलकलंकानें खोटें बोलून त्याची फसवणूक केली. आणि घातानें त्याला मारलें. त्याची व्याकुळ मुद्रा मला आठवते, बेचैन करते. मी कसें राज्य करूं! यापेक्षां द्वारकेंत जाऊन भिक्षा मागून राहिलों असतों तर सर्व जाति निर्मनुष्य करून अशा दुर्गतीला तरी पोहोंचलों नसतों."

धिगस्तु क्षात्रमाचारं धिगस्तु बलपौरुषम्।
धिगस्तु अपर्षं येनेमामापदं गमिता वयम् ॥

"आम्ही ज्यामुळें अशा आपत्तीला येऊन पोहोंचलों त्या क्षात्रधर्माचा आणि बलपौरुषाचा धिक्कार असो." (शांतिपर्व : अध्याय ७)

## पश्चात्तापाचे शेकडों उद्गार—

क्षत्रधर्माचा आणि बलपौरुषाचा धिःक्कार करणारे आणि अशांतीच्या वेदनीचे असे शेंकडों उद्गार धर्मराजानें साऱ्या उत्तरमहाभारतभर काढलेले आहेत. तो म्हणतो : "हें पार्थिव राज्य आणि नानात हेचे भोग मला सुखवीत नाहींत. हा शोक मला जाळतो आहे!"

न पार्थिवमिमं राज्यं न भोगाश्च पृथग्विधाः।
प्रीणयन्ति मनो मेऽद्द शोको मां रुंधत्ययम् ॥

'शांतिं नोपलभे मुने।', 'न च मुंचति मां शोकोऽयं', 'ज्वरो मां मुनिसत्तम।', 'तन्मे दहति गात्राणि।', 'दहंति च पचंति च।', 'दह्यामि अनिशम्।', 'परितप्ये पितामह।' 'नरके निपतिष्यामः।', 'न हि शांतिं प्रपश्यामि।', 'न मां प्रीणयते राज्यं।', धिङ्मामस्तु सुदुर्बुद्धिं।',–म्हणजे "शांति मिळत नाहीं, शोक सोडीत नाहीं, हा ज्वर लागला आहे, तो माझीं गात्रं जाळतो आहे, मला सुकवितो आहे, मी रात्रंदिवस जळतों आहें, तापतों आहें, मी नरकांत पडणार आहें, मला शांति दिसत नाहीं, मला दुर्बुद्धीला धिक्कार असो' आणि अशा प्रकारचे शेकडों! श्रीकृष्णाचा लाडका अर्जुनहि या शोकांतून सुटलेला नाहीं.

उवाच दुःखशोकार्तः क्षत्रधर्मं व्यगर्हयत्।
यत्कृते बांधवा सर्वे मया नीता यमक्षयम् ॥

(अश्वमेधिक पर्व : अ. ७८)

तो दुःख आणि शोक यांनीं व्याकुळ झालेला अर्जुन म्हणतो : "ज्याच्यामुळें मीं सर्व बांधव यमसदनीं पाठविले त्या ह्या क्षत्रधर्माला धिक्कार असो!'

## पांडवांच्या जयानें प्रजेला दुःख

शोकानें रात्रंदिन जाळणारा, अन्न गोड लागूं न देणारा हा सर्वभक्षक क्षात्रधर्म आचरण्यावांचून गतिच उरली नव्हती असें मानावें तर तसेंहि दिसत नाहीं. कुणीहि उठावें आणि एक काळा ब्रश दुर्योधनाच्या तोंडाला फांसावा अशी हल्लीं चाल पडलेली असली तरी दुर्योधनाचें राज्य प्रजेला पीडा देणारें मुळींच नव्हतें. आश्रमवासिक पर्वाच्या दहाव्या अध्यायांत सर्व प्रजा एकत्र जमून धृतराष्ट्राला सांगते:

न स्वल्पं अपि पुत्रस्ते व्यलीकं कृतवान्नृप।
पितरीव सुविश्वस्ताः तस्मिन्नपि नराधिपे ॥ २१ ॥

दुर्योधन राजानें प्रजेशीं बिलकुल अयोग्य वर्तन केलें नाहीं. प्रजा म्हणते, "तुझ्या पुत्रानें आम्हांस यत्किंचित् दुखविलें नाहीं. शंतनु, चित्रांगद, तूं, पंडु या सर्व कुरुराजांनीं विद्यानुपिद्या जसें प्रजेचें पालन केलें तसेंच दुर्योधनानेंहि आमचें चांगलें पालन केलें. दुर्योधन राजावर आम्ही पित्याप्रमाणें विसंबून पूर्ण बेफिकीर, सुखांत रहात होतों. तूं किंवा तुझा पुत्र यांपैकीं कोणाबद्दलहि यत्किंचित् कुरकुरण्यास आम्हांस जागा नाहीं." प्रजेच्या या कबुलीवरून कौरवांचें राज्य अन्यायाचें आहे म्हणून तें कोणत्याहि उपायानें हाणून पाडलें पाहिजे ही भूमिका उरत नाहीं. येवढेंच नव्हे तर कौरवांच्या पराजयानें आणि पांडवांच्या विजयानें कुरुराज्यांतील प्रजेला दुःख झाल्याचें वर्णन महाभारतांत आहे: "त्या वेळची (म्हणजे पांडवांचा जय झाल्यावेळची) ती स्थिति काय वर्णावी! पौरजनांवर व सर्व देशावर ओढवलेल्या अतर्क्य दुःखामुळें त्यांत सर्वत्र सारखा हाःहाःकाराचा ध्वनि चालला आहे. तेथील आनंद आणि कला पार मावळून गेलीं आहेत. असा तेथील तो हृदयद्रावक देखावा!" तत्त्वज्ञान जाणणाऱ्या विदुराचेंहि अंतःकरण तो देखावा पाहून विव्हल झालें व त्यानें दीर्घ निःश्वास सोडले!

## कौरवांचा पक्ष अन्यायाचा नव्हताच!

या वर्णनावरून पीडित प्रजेच्या रक्षणासाठीं भगवंतांनीं अवतार घेऊन हें सर्व केलें हा मुद्दा उरत नाहीं. राहतां राहिला भाऊबंदकींत कौरवांनीं पांडवांवर केलेला अन्याय. पण तोहि भासविला जातो तसा काळाकुट्ट मुळींच नाहीं. आधीं मुळांत राज्य करण्याचा अधिकार ज्येष्ठ पुत्राचा म्हणजे धृतराष्ट्राचा व त्यानंतर दुर्योधनाचा. धृतराष्ट्र आंधळा झाल्यानें पंडूच्या हातांत कारभार आला. पंडूच्या पश्चात् मूळ मालकाचे म्हणजे धृतराष्ट्राचे पुत्र गादीवर यावेत हेंच उचित. तेव्हां दुर्योधनानें अन्यायानें राज्य बळकावलें असें मुळींच म्हणतां येत नाहीं. द्यूताबाबत कौरवांवर घेण्यांत आलेला आक्षेपहि व्यर्थ आहे. कारण कृष्णाच्या मनाप्रमाणें रणांगणावर वध करणें हें ज्या क्षत्रियांचें कर्तव्य त्याच क्षत्रियांच्या क्षत्रधर्मांत द्यूतहि निंद्य नाहीं. द्यूतांत कपट आलेंच. कारण कृष्ण म्हणतात कीं, 'कपटानें जिंकण्याचा हा मार्ग देवांपासून परंपरेनें चालत आलेला आहे.' कृष्णांनीं पांडवांना युद्धांत कपट सांगितलें; शकुनीनें कौरवांना तें द्यूतांत (म्हणजे योग्य ठिकाणीं) सांगितलें, इतकाच शकुनींत आणि कृष्णांत फरक. द्रौपदीची जी विटंबना कौरवांनीं केली तशी विटंबना आर्य लोक त्या वेळीं अनार्य स्त्रियांची हरहमेश करीत. आपणाला आवडणाऱ्या बायकांचे नवरे मारून पांडवादि आर्य खुशाल त्या बायकांशीं संबंध करीत. कौरवांनीं फक्त वस्त्रहरणच काय तें केलें. आणि अज्ञातवासांतून परत आल्यावर कौरवांनीं पांडवांना राज्य न देणें हें तर अगदींच बरोबर होतें. कारण अज्ञातवासांत उघडकीस

आल्यास पुन्हा १२ वर्षे वनवास भोगावा अशी मुळीं अटच ठरलेली होती. आणि पांडव तर ४ महिने आधीं उघडकीस आले होते. तेव्हां त्यांना परत वनवासाला जा म्हणण्यांत कांहींच गैर नव्हतें. चांद्रमासाप्रमाणें १३ वर्षें पुरीं झालीं होतीं या बोलण्यांत कांहींच हशील नाहीं. कारण देशांत त्या वेळीं सौर कालमान चालू होतें. आणि खुद्द कौरवहि सौरवर्षच पाळीत असत. अशा स्थितींत त्याच प्रदेशांतील, त्याच कौरवांचे बंधु चांद्रवर्ष पाळीत असतील हें म्हणणें मुळुच्यावेगळें आहे. म्हणजे कौरवांचा पक्ष हा प्रजापालनाच्या दृष्टीनें तर योग्य होताच. पण भाऊबंदकींतहि मोठें जगावेगळें वर्तन त्यांच्या हातून झालेलें होतें असें दिसत नाहीं. म्हणूनच अकरा हजार राजे आणि अकरा अक्षौहिणी सैन्य त्यांच्या बाजूला उभे राहिले. येवढेंच नव्हे तर, पृथ्वी धारण करणाऱ्या प्रत्यक्ष शेषाचा अवतार असलेले बलरामदादा युद्धापूर्वीं कृष्णाला सांगतात, "बाबा रे, कौरव-पांडव दोघेंहि आपणांस सारखेच. आपण दोघांनाहि साह्य करूं." पण श्रीकृष्ण त्यांचें ऐकत नाहींत तेव्हा ते युद्धाकडे पाठ फिरवून यादवांसह तीर्थयात्रेला निघून जातात.

### भरंवशाच्या म्हशीला टोणगा

या भाऊबंदकींत कौरव मरावेत असें कोणीच चिंतिलें नव्हतें. यांतून कांहीं तोड निघावी अशीच सर्वांची इच्छा होती: अशी तशी तोड श्रीकृष्ण काढतील असा भरंवसा लोकांना वाटत होता. भारतीयुद्ध संपवून श्रीकृष्ण द्वारकेस परत निघाले तेव्हां मागील मारवाड देशांत अति-तेजस्वी मुनिश्रेष्ठ उत्तंक तपश्चर्या करीत बसलेले दिसतात. श्रीकृष्ण त्यांचें पूजन करून कुशल विचारतात. तेव्हां, ब्राह्मणश्रेष्ठ उत्तंक श्रीकृष्णाला प्रश्न करतात: "कृष्णा, तूं कौरवपांडवांच्या घरीं जाऊन त्यांची भाऊबंदकी कायमची मोडून टाकलीस ना? तूं त्यांचें कसें काय सख्य केलेंस तें मला सांग. केशवा, कौरव व पांडव हे तुझे आप्त असून त्यांच्यावर तूं नित्य प्रेम करीत आला आहेस. तेव्हां अशा प्रिय आप्तांचा संधि घडवून तूं परतलास होय! हे परंतपा, तुझ्यासारखा स्नेही (मध्यस्थ) असल्यामुळें पांच पांडव व सर्व कौरव हे जगांत आज आनंदानें नांदत आहेत ना? कृष्णा, तूं पालनकर्ता असल्यानें कौरवांचें भांडण शमून तेथें जमलेले ते सर्व राजे आपापल्या देशांत जाऊन सुखानें कालक्रमणा करीत आहेत ना! बाबा रे, तुझ्याविषयींचा माझा जो भरंवसा होता तो या भरतांच्या प्रकरणीं सफल केलास ना?

> या मे संभावना तात त्वयि नित्यमवर्तत।
> अपि सा सफला तात कृता ते
> भारतान्प्रति ॥१७॥ अश्वमेधिक पर्व अ. ५२

तेव्हां भगवान श्रीकृष्ण उत्तर देतात:

> पंचैव पांडवाः शिष्टा हतमित्रा हतात्मजाः।
> धार्तराष्ट्राश्च निहताः सर्वे सपुत्रबांधवाः ॥१८॥

म्हणजे "फक्त पांच पांडव जिवंत राहिले. बाकी त्यांचेहि मुलगे व मित्र सर्व नाहींतसे झाले. आणि कौरव तर गणगोतांसह पार धुळीला मिळाले!"

### "मी माणसाप्रमाणें वागलों"

कृष्णाचें हें उत्तर ऐकून मुनिश्रेष्ठ उत्तंकांना क्रोध चढला. आणि ते रागानें डोळे वटारून कृष्णास म्हणाले, "कृष्णा, तुझ्या अंगांत सामर्थ्य असतांहि प्रिय व आप्त अशा कुरु-पुंगवांचें तूं रक्षण केलें नाहींस, त्याअर्थीं मी तुला निःसंशय शाप देईन! ज्याअर्थीं तूं बळानें त्यांना आवरून युद्धापासून परावृत्त केलें नाहींस त्याअर्थीं, हे मधुसूदना, मी तुला शाप देणार! मला अतिशय संताप आला आहे. कृष्णा, तुझ्या अंगांत पूर्ण सामर्थ्य असतांहि, तूं लबाडीनें कौरवांची उपेक्षा केलीस आणि त्यामुळें ते नाश पावले."

> त्वया शक्तेन हि सता मिथ्याचारेण माधव।
> ते परीताः कुरुश्रेष्ठा नश्यंतः स्वनुपेक्षिताः
> ॥२२॥

हा ब्राह्मण आतां आपणांस शाप देणार हें पाहून श्रीकृष्ण गडबडले आणि पुन्हा यथार्थरूपी करूं लागले. त्यांनीं उत्तंकांना सांगितलें कीं, "मी जेव्हां ज्या योनींत जन्म घेतों तेव्हां त्या योनीला शोभेलसा वागतों. सांप्रत मी मनुष्य-

योनींत असल्यानें माणसासारखा वागलों! तस्मात् मला शापूं नकोस." येवढ्यानेंहि हा ब्राह्मण ऐकेल कीं नाहीं अशी शंका वाटून शेवटीं, अर्जुनाखेरीज जगांत कधीं कोणास न दाखविलेला विश्वरूपदर्शनाचा चमत्कार उत्तंकास दाखवून स्वतःची सुटका करून घेतात. मारवाड देश आधींच रखरखीत, त्यांत हा तपस्वी ब्राह्मण आणखी तापूं नये म्हणून तेथें दुर्लभ अशा जलाचेंहि दान जातां जातां शिंपडण्यास श्रीकृष्ण विसरत नाहींत.

### "कृष्णा, तूं कुत्र्याच्या मोतानें मरशील!"

कौरववधानंतर गांधारीला तोंड दाखविण्याचे वेळींहि श्रीकृष्णावर हाच प्रसंग आला होता. नमस्कार चमत्कारानें कां होईना, उत्तंकाच्या हातून श्रीकृष्ण निसटले. परंतु गांधारीनें मात्र श्रीकृष्णाला खरोखरीच कडकडीत शाप दिला. ती हतपुत्रा पतिव्रता श्रीकृष्णावर कडाडते: "ज्यापेक्षां सगेसोयरे, कौरवपांडव एकमेकांच्या हातून नाश पावत असतां, तूं गोविंदा, त्यांची उपेक्षा केलीस, त्यापेक्षां तूंहि आपल्या जातभाईंचा वध करशील. ज्याचे ज्ञातिबांधव, अमात्य, पुत्र निधन पावले आहेत असा तूं, अनाथासारखा, अगदीं अप्रसिद्ध व ज्याकडे कोणी ढुंकूनहि लक्ष देत नाहीं असा, वनांत संचार करीत असतां निंद्यमार्गानें निधन पावशील, आणि ज्यांचे पुत्र व ज्ञातिबांधव मरून गेले आहेत अशा तुझ्या स्त्रियाहि भरतस्त्रियांप्रमाणें धरणीवर अंग टाकतील!"

### श्रीकृष्णांनीं केलेली सर्रास कत्तल

पतीला दृष्टि नाहीं म्हणून स्वतःच्या धडक्या डोळ्यांवर पट्टी बांधून अंधत्व स्वीकारणाऱ्या या पतिव्रता गांधारीचा हा कडकडीत शाप पुढें खरोखरीच वाग्यार्थानें आणि अक्षरशः खरा ठरला. द्वारकापुरीचे यादव श्रीकृष्णाच्या आधिपत्याखालीं यात्रेला निघाले असतांना वाटेंत प्रभासतीर्थावर दारू पिऊन नाचरंग आणि दंगल करतात. या दंगलींत श्रीकृष्णाचे पुत्र ठार होतात. तेव्हां अर्जुनाला कार्याकार्य-विचार सांगणारे हे योगेश्वर प्रभु श्रीकृष्ण क्रोधानें बेभान होतात, आणि येथें धर्मयुद्ध नसतांहि सर्रास सर्वांना ठार मारून टाकतात. "तेथें कोणी कोणास कां ठार केलें हें कळलेंच नाहीं!" असें या प्रकाराचें वर्णन महाभारतकार (मौसलपर्वांत) करतात. पुत्रांच्या हातून जे पिते आणि बापांच्या हातून जे मुलगे मरावयाचे उरले त्या सर्वांची श्रीकृष्णानें सर्रास कत्तल केली, येवढें मात्र स्पष्ट आहे.

### कृष्ण म्हणतात: 'आतां संन्यास घेतों!'

कुरु आणि यदु अशा दोन्ही कुलांचा निःपात झाल्यावर मग श्रीकृष्णाचा अवतारमद उतरतो. धर्मराजाप्रमाणें ते स्वतः दुःखी होतात. आणि द्वारकेंत आपल्या बापाकडे म्हणजे वसुदेवाकडे जाऊन त्याला म्हणतात, "पूर्वी कुरुक्षेत्रांचा व आतां हा यादवांचा झालेला संहार मी आपल्या डोळ्यांनीं पाहिला! सांप्रत यादवहीन झालेल्या या द्वारकेकडे माझ्यानें पाहवत नाहीं. **आतां बलरामासहवर्तमान वनांत जाऊन तपाचरण करणार!**" आहे कीं नाहीं? अर्जुन बिचारा गीतेंत हेंच करूं म्हणत होता, तें त्याचें म्हणणें त्या वेळीं कृष्णानें ऐकलें असतें तर हा क्षत्रियकुलांचा नष्टांश न होता. परंतु तेव्हां कृष्णांनीं युद्धोन्मादानें गीता सांगून अर्जुनाला संहारास प्रवृत्त केलें, आणि आतां सर्वनाश झाल्यावर म्हणतात, 'माझ्याच्यानें हें पाहवत नाहीं. मी वनांत जातों!'

### श्रीकृष्णांचा भ्रमिष्ट स्थितींत मृत्यु

पण वनांत जाऊनहि श्रीकृष्णाची सुटका झाली नाहीं. दरम्यान बलरामानें समुद्रांत उडी टाकून देहत्याग केला. श्रीकृष्णाच्या मनांत वृष्णि व अंधक यांचा सांप्रत झालेला विनाश आणि मागील कुरुक्षेत्र हे एकसारखे घोळूं लागले. या चिंतेत ते एकटेच शून्य अरण्यांत भटकूं लागले, आणि अशा भ्रमिष्टावस्थेंत पारध्याचा बाण लागून मरण पावले. पुढें अर्जुनानें येऊन श्रीकृष्ण व बलराम यांचीं प्रेतें हुडकून काढून त्यांना अग्नि दिला. वसुदेव या धक्क्यानें मेला. द्वारका समुद्रांत बुडाली आणि अर्जुन यादवस्त्रियांना हस्तिनापुरास घेऊन येत असतां आभीरांनीं हल्ले करून श्रीकृष्णाच्या हजारों बायका पळविल्या! श्रीकृष्णाच्या गीतेंतील उपदेशाचा त्याच्या स्वतःवर आणि सर्व भारतवर्षावर झालेला हा घोर परिणाम पाहून अंगावर खरोखरी शहारे येतात!

### श्रीकृष्णांनीं अर्जुनाची केलेली घोर फसवणूक

हा सामाजिक परिणाम क्षणभर दृष्टीआड केला आणि पांडवांच्या वैयक्तिक आत्मकल्याणाच्या दृष्टीनें त्याकडे पाहिले तरी निराशाजनक पदरीं पडल्यावांचून रहात नाहीं. 'हें युद्ध म्हणजे स्वर्गाचें दार उघडलेलें आहे, आणि यांत झालेल्या हत्येनें तुला पाप लागणार नाहीं,' असें श्रीकृष्ण गीतेंत अर्जुनाला पुनःपुन्हा सांगतात. 'नैवं पापं अवाप्स्यसि।', 'कुर्वन्नाप्नोति किल्बिषम्।', 'हत्वापि स इमाँल्लोकान्न हंति न निबध्यते।' इत्यादि वचनें अशी ग्वाही देणारी आहेत आणि सर्वांवर कळस म्हणून

अहं त्वां सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुच।
६६। अ. १८।

म्हणजे 'तुला पाप लागणार नाहीं, किल्बिष अशा रीतीनें लागत नाहीं, लोक मारून सुद्धां तो कुणास मारीत नाहीं आणि बंधनांत पडत नाहीं.' आणि सरतेशेवटीं 'मी तुला सर्व पापांपासून सोडवीन, शोक करूं नको' अशा तऱ्हतऱ्हांनीं श्रीकृष्णांनीं अर्जुनाची पापाची भीति घालवून त्याला आश्वासन दिलें आहे. श्रीकृष्णांनीं खरोखरी अर्जुनाची महाभयंकर फसवणूक केलेली आहे. कारण श्रीकृष्णांनीं कितीहि नाहीं म्हणून सांगितलें तरी हत्येचें पातक अखेरीस अर्जुनासहित सर्व पांडवांना लागावयाचें तें लागलेंच. रोगग्रस्त मुलुखांतल्या माणसाला गांवांत घेण्यापूर्वी कारंटाईनमध्यें ठेवावें त्याप्रमाणें, "युद्धांत जें पाप लागलें तें निस्तरण्यासाठीं पांडव श्राद्धानंतर महिनाभर, राजधानींत न येतां, गांवाबाहेर नदीकांठीं राहिले." (शांतिपर्व: अध्याय १) पुढेंहि सर्व महाभारतभर धर्मराज हा व्यास, भीष्म, नारद किंबहुना, भेटेल त्याला विचारतो कीं, 'माझें ज्ञातिवधाचें पाप कशानें नाहीसें होईल?' व्यास त्याला पापनाशनीय अश्वमेध करावयास सांगतात. आणि "त्रिगुणित दक्षणा दे. म्हणजे तीन अश्वमेधांचें पुण्य लाभून तूं ज्ञातिवधामुळें घडलेल्या पातकापासून मुक्त होशील," असें बजावतात. म्हणजे हत्येचें पातक लागणार नाहीं; ही श्रीकृष्णांची ग्वाही फोल ठरते.

### "आतां तरी शहाण्यासारखे वागा!"

'अश्वमेधाला द्रव्य कोठून आणावें, आणि ज्यांचे पिते मीं कुरुक्षेत्रावर मारले त्यांच्या बालपुत्रांकडून, जखमा अजून ओल्या असतांना, करभार कसा मागावा?' अशी चिंता धर्मराजाला पडते. तेव्हां पूर्वींच्या एका यज्ञाचें द्रव्य हिमालयांत पडलेलें असतें तें आणून तें यांतून मार्ग काढतात. अर्जुन यज्ञाचा रथ घेऊन संचाराला निघतो तेव्हां धर्मराज त्याला बजावून सांगतात, "बाबा रे अश्व कोणीं अडविला तरी त्यांची हिंसा करूं नको. हें आतां झालें एवढें पुष्कळ झालें." पांडवांनीं ज्यांचे आप्त कुरुक्षेत्रावर मारले असे उर्वरित राजे ठिकठिकाणीं अर्जुनाला अडवून जाब विचारतात आणि सूड










घेऊं पहातात. पण अर्जुन आतां त्यांची डोकीं न उडवितां, फक्त किरीटच तेवढे आपल्या बाणानें पाडतो. आणि मार्गांतूनच श्रीकृष्णाला निरोप पाठवितो कीं, "बाबा रे, राजसूयप्रसंगात धरलास तसला अग्रपूजेचा हट्ट पुन्हा धरूं नकोस. कारण त्यामुळें आणखी हिंसा होईल.'

**राजद्वेषात्र नश्येयुरिमा राजन्पुनः प्रजाः ॥१७॥**

म्हणजे "राजाप्रजांच्या द्वेषानें प्रजा नष्ट होईल असें आतां करूं नका."

(अश्वमेधिक पर्व : अध्याय ८६)

## पापनाशानार्थ घोर इलाज—

याच अश्वसंचारांत अर्जुन बभ्रुवाहनांच्या राज्यांत आला असतां बभ्रुवाहन त्याला ठार करतो. तेव्हां अर्जुनाची पत्नी उलूपी त्याला संजीवक मण्यानें जिवंत करते, आणि सांगते, "तूं भीष्माला शिखंडीआडून मारलेंस हा अधर्म केलेला आहेस. त्याचें निरसन झाल्याशिवाय मेला असतास तर त्या पापकर्मानें अधम नरकांत पडला असतास. म्हणून मीं तुला तुझ्या पुत्राकडून ठार करवून त्या पापाची निष्कृति करविली आहे." या कथेवरूनहि पाप न लागण्यासंबंधीची श्रीकृष्णाची ग्वाही व्यर्थ ठरत असून अर्जुनाच्या नागवंशीय स्त्रीला त्या पापाच्या शमनार्थ इलाज करावे लागले आहेत.

## अखेर पांडव देशोधडीला लागले!

अशा तऱ्हेनें श्रीकृष्ण ग्वाही देत असतां पाप लागायचें तें लागलेंच. पण अश्वमेधादिक प्रायश्चित्तांनीहि त्या पापाची पुरी निष्कृति झाली नाहीं. पांडवांना राज्य प्राप्त झालें असतां त्यांची माता कुंती ही धृतराष्ट्र गांधारीबरोबर तपाचरणासाठीं वनांत गेली आणि रानाला आग लागून अनाथासारखी जळून मेली. इकडचे सगळे जातभाई आटोपलेच होते. तिकडे द्वारका एक काय ती उरली होती. तीहि कृष्णासकट नष्ट झाली. तेव्हां पांडव अधिकच उद्विग्न झाले. शेवटीं कृष्णाचें श्राद्ध करून त्यांनीं राज्यत्याग केला. आणि धृतराष्ट्रपुत्र युयुत्सूच्या ताब्यांत राज्य देऊन, वल्कलें नेसून, ते महाप्रस्थानाला म्हणजे प्राणत्याग करण्यास निघाले. यापुढचा महाप्रस्थानाचा व स्वर्गारोहणाचा सर्व कथाभाग हा हत्येमुळें पांडवांची झालेली आध्यात्मिक अधोगति दाखविणारा आहे. पांडव खरोखरी देशोधडीला लागले आणि त्यांची अखेर दशादशा झाली.

## हाच धर्म भित्रा आणि क्लीब होता

पांडवांनीं हिमालय ओलांडला. आणि मेरुपर्वत जों दिसूं लागलो तों द्रौपदी धाडदिशीं वाटेंतच मरून पडली. तिला तिथेंच टाकून जों ते पुढें जतात तों सहदेव पडला. त्यालाहि जागेवर सोडून उरलेले जों पुढें चालतात तों अति बंधुप्रिय, शूर नकुल हाहि पडला. नंतर शोकसंतप्त अर्जुन आणि पुढें भीम मरून पडले. शेवटीं धर्माबरोबर उरला एक कुत्रा. त्या स्वधर्माला सांभाळून धर्म एकटेच सदेह स्वर्गाला पोहोंचतात. ज्यांच्या पराक्रमाचे पोवाडे गाण्याची पद्धत आहे, ते भीमादि पांडव आणि श्रीकृष्णाचा लाडका अर्जुन हे सर्व रस्त्यांत निर्वासितांसारखे मरून पडले आणि ज्याच्यावर शांतिब्रह्म म्हणून सतत टीकेचा भडिमार झाला तो एकटा धर्मच सदेह स्वर्गाला गेला, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. परंतु धर्मानेंहि अधांतरीं बोलून द्रोणाचार्यांची फसवणूक केली होती. या त्याच्या पापाचें प्रायश्चित्त म्हणून त्यालाहि नरक पहावा लागलो.

## पांडवांच्या दारुण नरकयातना—

या नरकांत त्याला काय दिसलें? प्रेतांनीं खचलेल्या आणि दुर्गंधानें नरक उठविणाऱ्या त्या अंधकारमय नरकप्रदेशापाशीं तो आला असतां चोहोंकडून ओळखीचे आवाज त्यास ऐकूं आले. तेव्हां धर्म विचारतो, "हे महात्म्यांनो, आपण कोण आहांत?" तेव्हां, 'मी कर्ण', 'मी भीमसेन', 'मी अर्जुन', 'मी नकुल', 'मी सहदेव', 'मी द्रौपदी' असे आक्रोश नरकांतून उठले आणि हे सगळे आवाज त्याची प्रार्थना करूं लागले कीं, "धर्मा, आणखी थोडा वेळ येथेंच थांब. कारण तुझ्या आगमनामुळें या भीषण प्रदेशांत पुष्पकारक आणि शीतल वारे वाहूं लागले असून त्या सुळकीनें व सुगंधानें या नरकांतील यातना आणि दुःखें आम्हांस थोडीं तरी सुसह्य वाटूं लागलीं आहेत."

**अनुग्रहार्थं अस्माकं तिष्ठ तावन्मुहूर्तकम् ॥३२॥**

तेव्हां :

**अहो कृच्छ्रमिति प्राह तस्थौ स च युधिष्ठिर॥३७॥**

असें म्हणून धर्म तेथें उभा रहातो. येवढेंच नव्हे तर 'आपले बांधव नरकांत पडले तेव्हां आपणांसहि स्वर्ग नको,' असा निरोप देवांना पाठवून तेथून परतण्याचेंहि तो महात्मा नाकारतो. तेव्हां यम आणि इंद्र त्या ठिकाणीं येतात आणि धर्मराजाला समजावून सांगतात कीं, "बाबा रे, तुझें दुःख किंवा शोकसंताप हे येथें व्यर्थ आहेत. प्रत्येक मनुष्याच्या चांगल्या कृत्यांचा एक व वाईट कृत्यांचा एक असे दोन भाग आम्ही करतों. चांगल्याबद्दल स्वर्ग तसा वाईटाबद्दल नरक हा भोगावाच लागतो. त्यांतून राजांच्या वांट्याला तर नरक हा अवश्य येतो—

**अवश्यं नरकस्तात द्रष्टव्यः सर्वराजभिः।**

तूं तुझ्या बांधवांप्रमाणें नरकांत जरी न पडलास तरी द्रोणाचार्यांची फसवणूक केल्याबद्दल या नरकाचें दर्शन घेणें तुझ्या नशिबीं आलें आहे.












तथापि येवढें समाधान मान कीं तुझ्या बंधूंनी चिरकाल नरकांत पडण्याइतकें पाप केलेलें नाहीं. त्यामुळें ते बहुत दिवसपर्यंत नरकांत खितपत पडणार नाहींत." (न नरकांश्चिरं नृप। अ. ३ श्लो. ४८)

### कर्ता ईश्वर, भोगणारा मात्र मानव !

यम आणि इंद्र यांची ही समजावणी श्रीकृष्णानें अर्जुनाच्या केलेल्या घोर फसवणुकीवर विदारक प्रकाश टाकणारी आहे. गीतेंत श्रीकृष्ण अर्जुनामुळें विश्वरूप प्रगट करतात आणि त्या रूपानें सर्व कौरवांना आपल्या कराल दाढांखालीं चिरडून आणि रगडून ठार करतात. हा आहार घेतांना त्यांना लाळ गाळतात. 'मीं ह्यांना पूर्वींच मारलें—तूं निमित्तमात्र हो,' म्हणून सांगतात. त्याप्रमाणें अर्जुन वागला असतां तो कोठें येऊन पडतो ? तर "जो मार्ग केवळ पाप्यांच्या वहिवाटीचा आहे; ज्या मार्गावर रक्तामांसाचा चिखल आणि हाडकेसांचें आंथरूण आहे, डांस, मढूक, चिलटें, माशा यांची गर्दी झालेली आहे; छिन्नभिन्न अवयवांचे विंध्याद्रीएवढे डोंगर जिथें लागलेले आहेत; तेलांच्या काहिली जिथें उकळत आहेत; यातनांमुळें पातकी जिथें आक्रोश करीत आहेत; दुर्गंधीनें डोकें उठत आहे अशा अंधकारानें व्यापलेल्या अमंगल नरकांत !

### परमेश्वराप्रेक्षां कर्मविपाकाचा कायदा श्रेष्ठ !

भक्तिमार्गाच्या तर मुळावरच कुऱ्हाड घालणारें हें सारें प्रकरण आहे. 'नामीं अनंत तारलेहि संत' ही या कसोटीवर शुद्ध बनवाबनवी ठरते. नामानेंच नव्हे तर प्रत्यक्ष परमेश्वराच्या सहवासानेंहि कोणी तरत नाहीं. कारण अर्जुनाला श्रीकृष्णाचा सहवास, येवढेंच नव्हे तर सारथ्यहि लाभून त्याचा रथ नरकांत गेला ! तपस्वी, योगी, ज्ञानी इत्यादिकांना दुर्लभ असें विश्वरूपदर्शन त्याला झालें होतें. कृष्णाचा तो लडिवाळ भक्त आणि प्रिय सखा होता. पण यांपैकीं कांहींच त्याला वांचवूं शकलें नाहीं. त्याला पाप लागायचें तें लागलें. आणि तें भगवत्कृपेनें नव्हे तर प्रायश्चित्तें घेऊन आणि भोगून संपलें. आणि तें तसेंच संपलें पाहिजे. कारण कोणीहि उठून, परमेश्वराला नामघोष करून म्हणजे एक प्रकारें त्याच्याकडे वशिला लावून, नरकांतून किंवा स्वकृत्यच्या परिणामांतून माफी मिळवूं म्हणेल तर परमेश्वराच्या राज्याची म्युनिसिपालिटी होण्यास उशीर लागणार नाहीं. संतहि जे तरतात ते नामानें तरत नसून संतत्वाच्या आचारानें तरतात. आश्रमवासिक पर्वाच्या ३४ व्या अध्यायांत वैशंपायन जनमेजयाला स्वच्छ बजावतात, "राजा, कर्मकर्ता देव, असुर किंवा मनुष्य कोणीहि असला, तथापि त्याच्या त्या कर्माचा क्षय भोगावांचून कोणत्याहि अन्यमार्गानें व्हावयाचा नाहीं. शरीरकृत पापाचें फळ शारीरिक तापाचे द्वारेंच भोगावें लागतें. शिवाय तें अवश्य भोगावें लागतें. कधीं चुकत नाहीं. किंवा चुकवितांहि येत नाहीं !" या विवेचनावरून आणि पांडवांचा जो सर्वनाश झाला त्यावरून कर्मविपाकाचा कायदा हा परमेश्वराहूनहि श्रेष्ठ आहे हें सिद्ध होतें. सत्कार्यें करणाराला परमेश्वराची दया भाकण्याचें कारण नाहीं. आणि दुष्कृत्यें करणारानें परमेश्वराची करुणा भाकून उपयोग नाहीं !

### परमेश्वर मनुष्याला पापांत घालतो

मनुष्य कुणाच्या प्रेरणेमुळें पाप करतो ? याहि एका सनातन प्रश्नाचें उत्तर पांडवांच्या कथेंत थोडेंसें चमत्कारिक असें मिळतें.

अथ केन प्रयुक्तोऽयं पापं चरति पुरुषः।
अनिच्छन्नपि वार्ष्णेय बलादिव नियोजितः॥

असा प्रश्न अर्जुन श्रीकृष्णाला विचारतो. तेव्हां 'काम एष, क्रोध एष' असें उत्तर श्रीकृष्ण त्याला देतात. आणि पुढें शांतिपर्वांत 'मोह' हा पापाचें कारण आहे, असें भीष्म धर्माला सांगतात. पण महाभारतांत पांडवांच्या हातून, त्यांचा सर्वनाश घडविणारें जें पातक घडलें त्याला मात्र प्रत्यक्ष श्रीकृष्णांनीं प्रवृत्त केलें आहे. नव्हे, त्या तशा प्रवृत्तीसाठींच गीता सांगितली आहे. अर्जुन आणि श्रीकृष्ण हे नर आणि नारायण किंवा जीव आणि शिव आहेत. महाभारतामधील कथेप्रमाणें नराला नारायण आणि जिवाला शिव हा पापप्रवृत्त करतो. नव्हे, बळानें त्याला त्यांत ढकलून त्याच्याकडून तें करवून घेतो, असा बोध मनांत ठसल्याखेरीज रहात नाहीं.

### गीता हें सर्वनाशाचें साधन

यांचें कारणहि योगी अरविंदांनीं सांगितल्याप्रमाणें कुरुक्षेत्रावर देव-सारथी हा सर्व लोकांचा 'क्षय करावयास प्रवृत्त झालेला काळ आहे.' हें होय. स्वतः श्रीकृष्णांच्या म्हणण्याप्रमाणें लोकांना ठार मारण्यास ते तेथें प्रवृत्त झालेले आहेत. पुढें येणाऱ्या कलियुगाची तयारी करणें हें त्यांचें अवतारकार्य आहे. आणि म्हणूनच तो नारायण नराला पापाची प्रेरणा करून सर्वनाश घडवून आणतो. गीता हें या सर्वनाशाचें साधन आहे. आणि त्या नाशाला उपयुक्त असा 'कलियुगकारक विध्वंसयोग' गीतेंत सांगितला आहे. सत्य, अहिंसा इत्यादि नित्यधर्मांची स्तुति आणि स्थितप्रज्ञादिकांचीं वर्णनें हीं तेथें अर्थवादात्मक आहेत. कारण गीतेचा उपदेश ऐकून पांडव स्थितप्रज्ञ झाले नाहींत, तर विध्वंसकर्ते झाले. आणि सगळा सत्यनाश करून अखेर नरकाला पोहोंचले. इकडे पृथ्वीहि उध्वस्त होऊन तिच्यावर कलियुग सुरू झालें.

### जेथें श्रीकृष्ण तेथें सर्वनाश !

अशा स्थितींत गीता हा जगाला उपयोगी पडणारा आत्मोद्धाराचा ग्रंथ आहे असें म्हणणारांनीं म्हणावें, आणि संजयानें—

यत्र योगेश्वरः कृष्ण यत्र पार्थो धनुर्धरः।
तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम॥

असा श्लोक गीतेच्या शेवटीं म्हणावा हें आश्चर्य आहे. कारण कृष्णार्जुनामुळें श्री, विजय आणि भूति म्हणजे भरभराट यापैकीं कांहींहि आलेलें नसून पृथ्वी निर्वीर आणि निष्कांचन बनून कलीच्या ताब्यांत गेलेली आहे. हा श्लोक उच्चारणारा संजय देखील कुंती, गांधारी आणि धृतराष्ट्र तप करतांना जळून मेल्यावर त्याच वणव्यांतून कसाबसा निसटून देशोधडीला लागलेला आहे. गीतेचें समासमभांतून विनाप्रतिकार टाळ्या मिळवीत हिंडणारें वैभव आणि माहात्म्य निखालस खोटें असल्याचा निर्णय महाभारतांतील इतिहासानेंच दिला आहे. संजय पळून गेल्यामुळें त्याला गीतेचा तो शेवटचा श्लोक बदलण्याची संधि मिळाली नाहीं. ती तशी मिळती तर तो पुढीलप्रमाणेंच गीतेचा शेवट केल्याखेरीज रहाता ना—

यत्र योगेश्वरः कृष्ण यत्र पार्थो धनुर्धरः।
तत्र कुलक्षयो नाशो नर्को भारतनिर्णयः॥

श्रीकृष्णार्पणमस्तु।















विनायकरावांच्या मूर्खपणा-विषयीं कुणाचें दुमत नव्हतें. ह्या मूर्खपणापायीं आतांपर्यंत त्यांच्या नोकऱ्यांमागून नोकऱ्या गेल्या होत्या. आधींच नॉनमॅट्रिक माणूस, तशांत दिसायला हाडकुळा, उंच, बावळट! बावळट दिसणारीं पुष्कळशीं माणसें करणींला मोटीं चलाख असतात. तसेंहि विनायकरावांचें नव्हतें. ते जितके वेडेबगडे दिसत, त्याहिपेक्षां अंतःकरणानें ते अधिक भोळेभाबडे होते. त्यांच्या अर्धा डझन माजी धन्यांचें तरी हेंच म्हणणें होतें. "मनुष्य तसा वाईट नाहीं हो!" ते सारे एका सुरानें म्हणत. "पण नुसत्या चांगुलपणाला काय चाटायचं आहे? एक वेळ धूर्त चाकर परवडेल पण मूर्ख चाकर परवडत नाहीं. आजकालच्या काळांत तर माणूस अगदीं कसा पाहिजे म्हणतां..."

त्या 'कसा पाहिजे म्हणतां' मध्यें विनायकराव बसत नव्हते. 'कसा पाहिजे म्हणतां' म्हणजे ढकलबाज पाहिजे, चलाख पाहिजे, लुच्चासुद्धां पाहिजे. पण 'भोळाभाबडा' नको. भोळेपणालाच आधुनिक युगानें दुसरा प्रतिशब्द उत्पन्न केला होता 'मूर्खपणा!' ह्या मूर्खपणाला आजकालच्या जगांत कुठें जागा नव्हती. हा मूर्खपणा सध्यां कुठेंच खपण्यासारखा









लोक त्यांचा जयजयकार करीत होते. लोक त्यांना धन्यवाद देत होते. "शूर माणूस—!" "मर्द माणूस !" "मोठा माणूस !" विनायकरावांना वाटलें—यायचेंच असेल तर मरण आतां ह्या क्षणींच यावें !' आयुष्यांतील अखेरचा क्षण आतां हाच ठरावा !

नव्हता म्हणून विनायकरावांनाहि कुणी खपवून घेतलें नव्हतें. त्यांच्यासाठीं आजकालच्या जगांत जागा नव्हती. त्यांच्या नोकऱ्या एकामागून एक गेल्या होत्या. एकसारखे ते ठेचाळत होते व धक्के खात होते. ही त्यांची अगदीं शेवटची चाकरी एका चित्रमंदिराच्या व्यवस्थापक विभागांतील दुय्यमाची होती. पण ती त्यांची चाकरी सुद्धां ही आतांच निकालांत निघाली. गेल्या चार महिन्यांचा पगार बुडविल्यावर व त्यापूर्वीच्या तीन महिन्यांचा पगार न दिल्यावर निरोपादाखल त्यांना सांगण्यांत आलें होतें—"इथें मनुष्य कसा हरहुन्नरी पाहिजे! तुमच्यासारख्याचा इथें काय उपयोग ?"

'तुमच्यासारख्यांचा' म्हणजे 'तुमच्यासारख्या मूर्खांचा!'—हें विशेषण तिथें अध्याहृत होतें. नोकरी गेल्याचें शुभवर्तमान घरीं सरूताईंना कळतांच जळफळून त्याहि ओरडल्या होत्या—"तुमच्यासारख्यांना कुठें चाकरी टिकवता आली आहे? आतां पोराबाळांच्या पोटांत काय भरूं?—कांटे?" आणि त्यांनीं हातपाय आपटत घरांतला रिकामा डब्यांचा ढीग विनायकरावांसमोर रचून ठेवला होता. आणि अद्वातद्वा बोलत त्या विनायकरावांसमोर रडत बसल्या होत्या. त्यांचा प्रत्येक शब्द धिःकाराचा होता. अवहेलनेचा होता. विनायकरावांच्या अंगांत काडीचेंहि कर्तृत्व नव्हतें. त्यांच्यासारख्या माणसाशीं गळा गुंतल्यामुळें सरूताईंचा सत्यानाश झाला होता. विनायकराव नुसते भुईला भार होते! लोकांनीं त्यांना नोकऱ्या द्यायच्या तरी किती? त्या टिकवण्याइतकी बुद्धी तर माणसाच्या ठिकाणी पाहिजे ना? परमेश्वरानें बुद्धी वांटली तेव्हां विनायकराव अनुपस्थित होते!

डब्यामागून डबे सरूताई विनायकरावांसमोर आणून रचत होत्या. त्यांच्या नांवानें लाखोली वहात होत्या शेजारीपाजारी ऐकत होते व फिदीफिदी हसत होते. कुणी म्हणत होते, "बाई काय तोंडाळ आहे!" आणि कुणी म्हणत होते "अशा कर्तृत्वशून्य मूर्खाशीं गांठ पडल्यावर त्या बाईनें तरी काय करावें?"

झोडपीचें थैमान मुकाट्यानें सहन करणाऱ्या सॉक्रेटीसच्या शांततेनें विनायकराव सरूताईंचीं बोलणीं खात होते. ते कांहीं बोलत नव्हते म्हणून त्यांना शांत म्हणायचें, इतकेंच. पण वास्तविक पहातां, स्वभावानें गाईसारख्या असलेल्या विनायकरावांची शांति आज संपली होती. बाहेर तर ते रक्त निघेपर्यंत ठोकरा खातच आले होते. पण घरांतलीं बायकोपोरेंसुद्धां त्यांना दया दाखवायला सिद्ध नव्हतीं. बरोबर आहे, जगाच्या बाजारांत अपेशी ठरलेल्या मूर्खावर कोण दया करील?—पण आपली प्रत्यक्ष बायको?—होय, त्यांची बायकोहि आज त्यांना फाडून खात होती. तिनें दया अशी कधीं त्यांच्यावर केलीच नव्हती. कुणीच केली नव्हती. खरें पुसाल तर ह्यावेळीं विनायकरावांना रडावेंसें वाटत होतें, ओरडावेंसें वाटत होतें, हंबरडा फोडून कुठें तरी तोंड लपवावेंसें वाटत होतें. आजवर विनायकरावांची शांति कधीं ढळली नव्हती. पण आज त्यांच्या धीराचे तणावे एकामागून एक तुटत होते, आणि कुठें तरी लांब पळून जावें असें त्यांना वाटत होतें. सरूताई रडतच होत्या आणि बडबडतच होत्या. त्यांच्या बोलण्याचा निष्कर्ष एकच होता—विनायकरावांच्या अंगांत कसलेंच पाणी नव्हतें. कसलेंच कर्तृत्व नव्हतें. विनायकराव मूर्ख होते—अगदीं निकामी होते.

विनायकरावांना बाहेर कुणी बरें म्हणत नव्हतें. घरांत कुणी बरें म्हणत नव्हतें. त्यांना बाहेर थारा नव्हता आणि घरांत थारा न उरला. गेलीं पंचेचाळीस वर्षे त्यांनीं सारें सारें शांतपणें, मुकाटपणें सहन केलें होतें, पण आज त्यांचा धीर सुटला. त्यांचा जीव तळमळून गेला. सरूताईशीं आजवर त्यांनीं कधीं वाद घातला नव्हता. सरूताई बोलत व विनायकराव सारें शांतपणें ऐकून घेत. आजहि ते स्तब्ध होते. पण सरूताईच्या शब्दांचे घाव सहन करीत राहण्याइतकेंहि त्राण आज त्यांच्या ठिकाणीं नव्हतें. मूर्खपणाचा व अपेशाचा शिक्का ते जन्मभर खात आले होते, व तापलेल्या जिभेनें तोच शिक्का विनायकरावांच्या तोंडावर आज त्यांची बायको पुन्हा पुन्हा मारीत होती. कर्तृत्वशून्य—निकामी—मूर्ख—निरुपयोगी.

एकाएकीं विनायकराव उठले.

"चाललांत कुठें ?" सरूताई फुंकारल्या.

"बाहेर—" विनायकराव घोगऱ्या स्वरांत म्हणाले.

"बाहेर काय ठेवलं आहे ?"

"कुणास ठाऊक !"

"मी सांगतें. ठेवलीं आहेत खेटरं बाहेर !"

"उगाच कां बरं असं बोलतां ?"

"तर मग काय पूजा करूं तुमची? वडील ते तसे दिवटे निघाले!—"

"माझ्या वडिलांचं कां नांव घेतां उगाच ?"

"उगाच कशानी? होतं नव्हतं तें सर्व घोळवलं! गळा कापला माझा!—"

"त्यांनीं कुठला तुमचा गळा कापला?"

"तुम्ही कापा आतां उरला सुरला!"

"चला, बाजूला व्हा."

"होत नाहीं!"

"बाहेर जाणार आहें मी!"

"आम्हांला इथं टांचा घांसत मरायला सोडून? घरांत धान्याचा कण नाहीं. तुमच्यासारख्यांशीं गांठी पडल्या ना?"

"धान्य आणून टाकतों मी! मग तर झालं?"

"दांत पाडून देणार आहांत का वाण्याला?"

"नाहीं!"

"मग? धान्य कशाचं आणणार?"

"बघा तुम्ही."







क्षणभर सरूताई थांबल्या आणि मग किंचाळल्या "कळली–कळली अक्कल! आजही हातांतली आंगठी विकणार आहांत ना? अहो, मरतांना कीं हो मामंजींनीं ती तुमच्या बोटांत घातली होती. तेवढंच सोनं उरलं आहे आतां घरांत कमीवर मारायला! तेवढं तरी असूं द्या!"

"जाऊं द्या मला."

"आधीं ती आंगठी आणा इकडे."

"मला जाऊं द्या!"

"ती आंगठी आणा इकडे, मग जा कुठें जातां ते उकीरडे फुंकायला! मिळवायची अक्कल नाहीं आणि राखायची पण अक्कल नाहीं!"

पुन्हा तोच आरोप! पुन्हा तोच शिक्का! विनायकरावांचें मन तळतळलें. त्यांचा एक ओठ वांकडा झाला. कोणतीहि भावना प्रबळ झाली आणि ती दाबून टाकावी लागली, कीं विनायकरावांचा ओठ वाकडा होत असे. उंटाच्या लालच्या ओठासारखा. मग ते अधिकच कुरूप दिसूं लागत. अधिकच बावळट दिसूं लागत. सरूताई त्यांच्या काळजावर कांटे मारतच होत्या.

"दळभद्री माणसं! सान्याचं वाटोळं करून वडील गेले! देवधर्म केला म्हणे! घरं भरलीं चोरांपोरांचीं! तेवढी ती एक आंगठी राहिली आहे. तिची एकदां वाट लावा, म्हणजे सुटलांत! दिवट्या बापाचे दिवटे चिरंजीव नां तुम्ही?..."

विनायकरावांचा ओठ आणखी वाकडा झाला. उद्वेग त्यांच्या मनांत मावेना. कधीं केलें नव्हतें तें त्यांनीं केलें. वाट अडवून फणफणत उभ्या असलेल्या सरूताईना त्यांनीं कडेस सारलें व तिरमिरीसरशीं ते घराबाहेर पडले.

विनायकराव वाटेनें ताडताड चालत होते. होय, आज ते हातांतली आंगठी विकणार होते. त्यांच्या वडिलांची आंगठी. विकण्यासारखी तेवढीच एक वस्तू आतां त्यांच्यापाशीं उरली होती. आंगठींत एक छोटासा चौकोनी हिरा होता. त्यांच्या वडिलांच्या वैभवाचा शेवटचा अवशेष. विनायकरावांचे वडीलहि लोकविलक्षण प्रकृतीचे गृहस्थ होते. घरांत मावणार नाहीं येवढ्या संपत्तीला ढकलून ढकलून त्यांनीं बाहेर काढलें. बाई-बाटलीचें व्यसन कांहीं कधीं त्यांनीं केलें नाहीं. बिडी-काडीचें देखील केलें नाहीं. पण पैसा वांटण्याचेंच त्यांना व्यसन होतें. नको त्याला ते तारण राहिले. पोरक्या पोरांना पोसत बसले. अनाथ मुलींचीं त्यांनीं लग्नें लावलीं. देवळांना देणग्या दिल्या. अतिथी-अभ्यागताला रिक्त हातानें कधीं त्यांनीं परत पाठविलें नाहीं. स्वतःचेच हात अखेर अगदीं रिकामे झाले, त्याचेंहि त्यांनीं कधीं दुःख मानलें नाहीं. ज्याचें ज्याचें म्हणून विनायकरावांच्या वडिलांनी केलें, ते पुन्हा त्यांची पूसतपास करायला कधीं परत आले नाहींत. तीं पोरकीं पोरें, तें साती वार जेवणारे विद्यार्थी—पंख फुटतांच सारे उडून गेले. माणसेंहि गेलीं, संपत्तीहि गेली. सधनतेसारखीच विनायकरावांच्या वडिलांनीं निर्धनताहि झेलली. त्यांच्या चित्ताची शांति कधीं ढळली नाहीं. परक्यांना दान म्हणून दिलें, तेवढेंहि पोटच्या पोरासाठीं त्यांना ठेवतां आलें नाहीं. विनायकरावांनीं पाहिली ती आपल्या वडिलांची विपत्ती, त्यांच्या मनाची न ढळणारी शांति, त्यांचा भाबडा भलेपणा. त्यांच्या संपत्तीच्या त्यांनीं नुसत्या कहाण्या ऐकल्या. त्या कहाण्याना आधार तेवढ्या त्या एका आंगठीचा होता. कांहीं उपायच उरला नव्हता. ती आंगठीच विनायकराव आतां विकणार होते

कधीं झाल्या नाहींत अशा यातना विनायकरावांच्या हृदयाला होत.

होत्या. आपल्या अकर्तृत्वाचें, आपल्या मूर्खपणाचें, एवढें वैषम्य आजवर त्यांना कधीं वाटलें नव्हतें. कोणी कांहीं म्हणो, पण विनायकरावांचें आपल्या वडिलांवर अतिशय प्रेम होतें. वडिलांनीं विनायकरावांसाठीं केवळ दारिद्र्याचा वारसा ठेवला होता, पण वडिलांच्या नुसत्या स्मृतीनें विनायकरावांचा कंठ दाटून येई. तेवढा तो एकच माणूस जगांत असा होऊन गेला, कीं ज्यानें विनायकरावांना निरपेक्ष प्रेमानें पोटाशीं धरलें दारिद्र्याच्या फाटक्या पदराचेंहि विनायकरावांना आच्छादन केलें.

विनायकरावांची आई तर लहानपणींच त्यांना सोडून गेली होती 'माझा शहाणा विनायक,'—'माझा गुणाचा विनायक' म्हणून कौतुक करणारा ह्या जगांत तो तेवढाच माणूस होऊन गेला. आणि त्या माणसाची आंगठी विकण्याचा प्रसंग आज विनायकरावांवर आला होता.

विनायकराव वाटेनें ताडताड चालत होते. कॉलर फाटलेल्या त्यांच्या कोटाचीं दोन्ही टोकें हेलकावे खात होतीं.—खरंच, आपण इतके बावळट आहोंत का? इतके निकामी आहोत का? कां म्हणून जागोजाग आपली अशी अवहेलना व्हावी? प्रत्येकानें तुच्छतेनें कां असें आपल्याला दूर ढकलावें? सगळ्याच कुरूप माणसांना कांहीं लोक असें वागवीत नाहींत. सगळींच मूर्ख माणसें कांहीं आपल्याइतकीं अपेशी होत नाहींत. जगांत पुष्कळ मूर्खांना यश मिळतें. पुष्कळ लबाडांची चलती होते. आपण कधीं लबाडी केली नाहीं, कधीं खोटें बोललों नाहीं, कधीं कोणाविषयीं वाईट इच्छा धरली नाहीं. तर मग कां म्हणून आपल्या तोंडावर जागोजाग 'मूर्ख–मूर्ख' म्हणून शिक्के बसले? कां म्हणून निकामी माणसांत आपली गणना झाली? जगांत आपल्या हातून कुणाचेंच का चांगलें होण्यासारखें नाहीं? जगांत आपला कुणालाच का कांहीं उपयोग नाहीं? इतके आपण मूर्ख आहोंत? इतके आपण निरुपयोगी आहोंत?

विनायकरावांनीं उसासा सोडला. त्यांनीं हातांतल्या आंगठीशीं चाळा केला. त्यांच्या डोळ्यांत पाणी उभें राहिलें. सराफाच्या दुकानाच्या पायऱ्या ते चढत होते. ते मूर्ख होते नाहीं तर काय? निकामी होते नाहीं तर काय? एरवीं हा प्रसंग आज त्यांच्यावर कशाला आला असता?

"पांचशें रुपये—" सराफ आंगठी पारखीत गंभीरपणें म्हणाला.

"पांचशें रुपये?" विनायकरावांनीं श्वास रोखून विचारलें.

"फारच तर साडेपांचशें रुपये!—" न्यायाधीशाच्या आविर्भावानें हातावर आंगठी तोलत सराफ म्हणाला. "कुणालाहि विचारून पहा वाटलं तर!"

विनायकराव कुणाला कांहीं विचारणार नव्हते. गेल्या कित्येक महिन्यांत दहाची नोट देखील त्यांनीं नीटशी पाहिली नव्हती. विचारपूस करण्याची विनायकरावांना आवश्यकताच वाटली नाहीं. हिऱ्याची आंगठी घेऊन का होईना, पण कोणी आपणांस साडेपांचशें रुपये देऊं शकतो, याचेंच त्यांना नवल वाटत होतें.

घाईघाईनें विनायकरावांनीं साडेपांचशेंच्या नोटा खिशांत कोंबल्या. त्यांना वाटलें, घेतां काय ह्या सराफाचें मन पालटलें तर? घाईघाईनें ते दुकानाच्या पायऱ्या उतरले. उतरतां उतरतां त्यांचा पाय निसटला. आणि आतून त्यांना हसणें ऐकूं आलें.

"अरे सेठ, तुम्ही तर नूर बनवला ते साला तात्याला! ए अंगठीची किंमत तो हजार बारासो रुपये होएल —तद्दन गधा दिसते हे तात्या!"

"मूरख छे—मूरख," सराफाचा स्वर म्हणाला, "दुनियामंदी ऐसा



## माझ्या अक्षरवेलीला

माझ्या अक्षरवेलीला
 आहे आधार नभाचा
तिच्या फांदीफांदीवर
 दोले झुबका गीतांचा
माझ्या अक्षरवेलीचें
 मन चांदण्यांवरती
तिला लाटा सागराच्या
 खुणावती...बोलावती
माझ्या अक्षरवेलीला
 पानें पोपटपंखांचीं
फळेंफुलें लगडलीं
 चंद्र, सूर्य, खगोलांचीं
क्षितिजाच्या रेषेचीहि
 तिला भूलभुलावण
तिच्या अंतरीं सांकळे
 माणकांची पखरण.
वेड तिला रंगाचें अन्
 नाद गंध रूपकांचें
हुरहूर लावितात
 थेंब तिला पागोळ्यांचे.
निळ्या जलपृष्ठावर
 लवे तरंगांचें गाणें
माझ्या अक्षरवेलीला
 पक्षी घालीती उखाणे
तिच्या सांवळ्या छायेंत
 घुमे स्वप्नांचा पिंगाणा
तिच्या किमयेनें काळ्या
 होई अनंग दिवाणा
तिच्या अग्निशीखांखालीं
 बसे बुद्ध पद्मासनीं
क्रुसावरून येऊन
 येशू घाली तिला पाणी
तिच्या तुळशीं तेवते
 नम्र वात अभंगाची
तिला जोपसते ओंवी
 योगीराज ज्ञानेशाची
क्षणाक्षणीं कणकण
 उंचावत माझी वेल
तिच्या कुशींत हिरव्या
 फुले आकाशाचें फूल
माझी हवलाशी वेल
 सारी आभाळें पिईल
स्वप्न गंगाईची धारा
 आणि भूलोकीं आणील.

—सदानंद रेगे

सूरख नाय असेल तो आमचा वपार कसा च्यालेल ?"

विनायकरावांच्या काळजांत जणूं कळ उठली. जड पायांनीं ते चालूं लागले. त्यांना पाच-सातशें रुपयांना फसवून हा ठक वर त्यांना मूर्ख म्हणत होता. होते खरेच ते मूर्ख ! ते मूर्ख होते, कुरूप होते, अपेशी होते. ओळखीचे सारे लोक वर त्यांना मूर्ख म्हणतच होते, पण हा अनोळखी सराफसुद्धां मूर्ख म्हणून त्यांची हेटाळणी करीत होता. त्यांचा मूर्खपणा इतका उघड होता.

विनायकराव हाटांतून हिंडत होते. त्यांना भाजीपाला विकत घ्यायचा होता धान्य विकत घ्यायचें होतें. पाटीवाल्यांची एक रांगच्या रांग त्यांच्या समोर उभी झाली. "ओझं?–ओझं?" आठ दहा स्वर एकाएकीं ओरडू लागले. त्या कल्लोळानें विनायकराव दचकले. मग पाटीवाल्यांच्या त्या रांगेकडे पाहूं लागले. "ओझं ?–ओझं ?" पुन्हा पांच सात स्वर एकदम भुंकले. विनायकरावांनीं त्या स्वरांच्या धन्यांवरून दृष्टि फिरवली. त्यांतला पहिला चांगला रुंद छातीचा उंचापुरा बाप्या होता. त्याचं वय तीस-पसतीसच असेल. दुसरा ठेंगणा होता. आंखूड मिशांचा होता. आणि गोटीदार शरीराचा होता. त्याचें वय अठ्ठावीस-तीस असेल. तिसरा–चौथा–पाचवा ! साऱ्यांच्या पोटऱ्यांतले गोळे हलत होते आणि दंडांत बेटकुळ्या उडत होत्या. आणि ते सारे पुन्हा पुन्हा जणूं अंगावर आल्यासारखे वसकन ओरडत होते—"ओझं–ओझं–ओझं !"

त्या रांगेंतल्या शेवटच्या माणसाचा मात्र स्वरच उमटत नव्हता. तो म्हातारा होता. कुरूप होता. पिचक्या डोळ्यांचा होता. सुरकुतलेल्या शरीराचा होता. सारे दांडगेश्वर त्रेबीच्या देठापासून ओरडत असतां तो आपला गप होता. तो बसल्या जागेवरून उठलासुद्धां नव्हता. जणूं त्याला वाटत होतें, कीं उठून तरी काय उपयोग? ओरडून काय उपयोग? हे सारे तरणेताठे आणि धट्टेकट्टे लोक आपल्या शेजारीं उभे असतां आपल्याला कोण विचारतो? आणि म्हणून तो तसाच गप बसला होता. आणि पिचक्या डोळ्यांनीं विनायकरावांकडे नुसता पहात होता. त्याच्या डोळ्यांत विनवणी नव्हती, लाचारी नव्हती. नुसता मख्खपणा होता. पुन्हा एकदां सारे पाटीवाले ओरडले, "ओझं–ओझं–" आणि तो म्हातारा पुन्हां गप राहिला. विनायकरावांनीं साऱ्यांना नाकारलें आणि त्या म्हाताऱ्याला खूण करीत ते म्हणाले, "चल."

क्षणभर म्हाताऱ्याचा स्वतःच्या कानांवर विश्वास बसेना. बसल्या-बसल्याच तिरसट स्वरांत तो म्हणाला,

"काय ?"

तो तिरसट स्वर ऐकतांच राग येण्याऐवजीं विनायकरावांना भडभडून आलें व ते म्हणाले, "चल, मला बाजार करायचा आहे."

म्हातारा आळसत आळसत उठला आणि विनायकरावांच्या बरोबर चालूं लागला.

"असा मूर्ख माणूस जन्मांत पाहिला नव्हता!" हा स्वर रुंद छातीच्या बाप्याचा होता.

"आम्हांला सोडून त्या थेरड्याला नेतो !" गोटीदार शरीराचा पाटीवाला म्हणत होता.

"अशींहि इरसाल गाढव माणसं जगांत असतात." चारपांच स्वर सरमिसळीनें निर्णय देत होते.

विनायकराव क्षणभर दचकले, थबकले, आणि चालूं लागले. त्यांनीं कांहीं भाजी घेतली, कांहीं धान्य घेतलें. सारें घरीं टाकलें व पुन्हा ते




बाहेर पडले. बाहेर पडतां पडतां त्यांच्या कानांवर सरताईचे शब्द येऊन आदळले, "आधीं दुसरं काम मिळवा मग्च्या मला थोबाड दाखवायला!"

विषण्णपणें विनायकराव हसले आणि चालूं लागले. त्यांचें थोबाड पाहण्याची त्यांच्या बायकोचीसुद्धां इच्छा नव्हती! त्यांचें थोबाड पाहण्यासारखें नव्हतें खरेंच. त्यांचा ह्या धरणीला नुसता भार होता. त्यांच्याविषयीं कुणाला आदर नव्हता, कुणाला प्रेम नव्हतें. त्यांना कुणीसुद्धां मान देत नव्हतें. त्यांचा कुणाला काहींच उपयोग नव्हता. बोलूनचालून ते मूर्खच होते.. कर्तृत्वशून्य होते. आज त्यांच्या नाकर्तेपणाचा, त्यांच्या करंटेपणाचा अगदीं कळस झाला होता. विकण्यासारखी घरांतली अखेरची वस्तू, कधींहि विकली जायला नको होती अशी घरतली अखेरची वस्तू, आज त्यांनीं विकून टाकली होती. आणि त्या लाजिरवाण्या व्यवहारांतसुद्धां पुन्हा ते मूर्खच ठरले होते.

झपाझप विनायकराव वाटेनें चालले होते. मधूनच ते हातवारे करीत होते, मधूनच स्वतःशी बोलत होते. त्यांच्या कपाळावर बावळटपणाचा शिक्का मारणारी ही त्यांची आणखी एक संवय होती. बिचाऱ्या विनायकरावांचें बोलणें दुसरा कोण ऐकून घेतो? म्हणून स्वतःचें बोलणें ते स्वतःलाच ऐकवीत असत. आणि त्यांचें तें बोलणें पुष्कळदां त्यांचें त्यांनाहि उमगत नसे, त्यांचें त्यांनाहि ऐकूं जात नसे. 'मूर्ख—महामूर्ख—शतमूर्ख!' विनायकराव हातवारे करीत स्वतःशीं पुटपुटत होते, 'मूर्ख—महामूर्ख...!'

एकाएकीं विनायकराव भानावर आले. त्यांच्यामागें पोरें धावत होतीं. "टाइम्स, केसरी, लोकसत्ता, भारत, नवशक्ति—" पोरें ओरडत होतीं व पळत होतीं. "केसरी–काळ–सकाळ..." केस उलटे फिरविलेला एक सतराअठरा वर्षांचा काळाकुट्ट पोरगा सर्वांच्या पुढें होता. आणि सर्वांच्या मागें एक आठनऊ वर्षांचें पोर रडकुंडीला येऊन धापा टाकत धावत होतें—"साहेब, पेपुअर—साहेब, पेपुअर—" विनायकरावांना वेढून पोरें जपत होतीं—"विविधवृत्त–धर्मयुग–वीकली–नवभारत टाइम्स..."

वृत्तपत्रें विकण्यासाठीं पोरें एकमेकाशीं स्पर्धा करीत होतीं. एकमेकांना ढकलीत होतीं. झुकझुकीत केसांचा तो काळाराम पोरगा साऱ्यांनाच मागें ढकलून विनायकरावांच्या तोंडापाशीं 'टाइम्स' हलवीत होता व म्हणत होता, "टाइम्स–वीकली–धर्मयुग–नवभारत टाइम्स..."

आठनऊ वर्षांचें तें अशक्त पोर पार मागें फेकलें गेलें होतें. त्याच्या हातांतील वृत्तपत्रांचा भारा सांडत होता, व रडत रडत तें पुटपुटत होतें—'विविधवृत्त—क—केसरी—काळ...'

त्या लहान मुलाकडे विनायकराव पहातच राहिले. त्याच्या गालांवरून ओघळणाऱ्या आंसवांकडे पाहतांच त्यांच्या हृदयांत करुणेचा सागर हेलावला, अशक्त होतें बिचारें तें पोर! वेडेंबागडें होतें! साऱ्यांनीं त्याला मागें रेटलें होतें...असेंच तर चालतें ना जगांत? असेंच तर चालतें ना?

त्या तेलकट केसांच्या काळ्या दांडग्याला विनायकरावांनीं दूर सारलें व आठ वर्षांच्या मुलापाशीं जाऊन ते म्हणाले,

"तुझं नांव काय बाळ?"

"संपत!"

"आईबाप काय करतात तुझे?"

"आईबाप नाहींत मला!" तें पोर रडत रडत म्हणालें.

विनायकरावांच्या छातींत जणूं तीर घुसला. हें पोरकें पोर जगाच्या बाजारांत उघडें पडलें होतें आणि त्याला कोणी नव्हतें—कोणी नव्हतें! विनायकरावांचीं आंतडीं पिळवटलीं. फाटक्या बाहीनें स्वतःचे डोळे पुसत ते म्हणाले,

"बाळ, आण. दे तुझ्या हातांतला तो गठ्ठा! तुझे सारे पेपर विकत घेतों मी!"

विनायकरावांच्या भोंवतीं पोरांचा गराडा पडला. सारे त्यांच्याकडे डोळे फाडफाडून पाहूं लागले. काय जगावेगळा माणूस होता हा! वेडा तर नव्हता ना हा माणूस? त्याचा तो ओढलेला चेहरा, ते दांतांमागचे ओठ, ते खप्पड गाल, ते फाटके कपडे—! होय, वेडाच असला पाहिजे हा माणूस! तेलकट केसांच्या त्या काळ्या पोरानें तर ह्याविषयीं पैज मारली. येवढा मोठा हा मिशीवाला बाप्या आसवें ढाळीत होता, आणि संपतच्या पेपराचा सारा गठ्ठा विकत घ्यायला मागत होता. वेड वेड म्हणजे तरी काय वेगळें असतें.

संपतचें रडणें थांबलें होतें. कुतूहलानें—संशयानें तें आठ वर्षांचें पोरहि विनायकरावांकडे पहात होतें, व निराळ्या बाहणारे त्यांचे अश्रु पाहून त्यालाहि हसावेंसें वाटत होतें.

"आण बाळ तुझे पेपर!" संपतच्या हातांतील वृत्तपत्रांचा गठ्ठा घेत विनायकराव म्हणत होते, "किती झाले तुझे पैसे? हां—हे घे! हे घे आणखी—"

दहाच्या पांचसहा नोटा विनायकरावांनीं संपतच्या खिशांत कोंबल्या.

उलटे केस फिरविलेला काळा पोरगा ओरडूं लागला, "अरे, पैसे वांटतो आहे वेडा! वेडा पैसे वांटतो आहे!"

सारीं पोरें नाचत ओरडूं लागलीं, "अरे, वेडा–वेडा! पैसे वांटतो आहे—वेडा! या—या!"

# आपणांस काळज्या असतीलच



प्रेम, प्रकृति, संपत्ती, जादूटोणा, कोर्ट, परीक्षा, नोकरी, शत्रूची करणी, भूतपिशाच, भांडगतंटे इ. काळज्या आपणांस असतीलच. तेव्हां आपण त्यां काळज्या माझ्या अध्यात्म व **आकर्षणशक्तीनें** ताबडतोब नाहींशा कां करीत नाहीं ! लाखो लोकांना शांति, सौख्य व भरभराट लाभली आहे. ताबडतोब ३७ वर्षांचा अनुभव असणाऱ्या खऱ्या हिंदु अध्यात्मज्ञानी योग्यास व तांत्रिकास भेटा.

राजे, महाराजे, सरदार, पुढारी, वकील, डॉक्टर्स, संत, योगी आणि अनेक निराळ्या थरांतील लोकांच्याकडून प्रशंसा मिळविलेले. जागतिक कीर्ति (इंग्लंड, अमेरिका, आफ्रिका, चीन, फ्रान्स, अरेबिया, एडन, फिजी, सीलोन, मलाया, ब्रह्मदेश इ. इ.) खुलाशाकरितां आणि प्रशंसापत्राकरितां तिकिटें पाठवून विचारणा करा.

**भविष्यः**– ३ रुपयांत आपणांस आपल्या तीन गुप्त प्रश्नांचीं (माझ्याकडे पाठवावयाच्या) ततोतंत उत्तरें मिळतील. आपल्या भाग्यवान् नं., भाग्यवान् रंग, भाग्याचा दिवस आणि आपल्या आयुष्यांत घडणाऱ्या अत्यंत महत्वाच्या घटना, ही सर्व माहिती रु. ३ च्या व्ही. पी. नें (परदेशी शि. १० आगाऊ, एअरमेल पोस्टेजसह) पाठवली जाते. आपले चांचणी प्रश्न माझ्या ऑफिसांत सल्ल्याच्या फीसुद्धां प्रत्येकीं रु. ५ फक्त (आपल्या समाधानानंतर) प्रमाणें सांगितले जातात.

## अशोक आणि त्याचें अदृश्य गूढ

अशोक आपणांस **मृत** माणसाशीं बोलण्यास मदत करतात. ते आपल्या **शत्रूची करणी** अगर काळी जादू गवताच्या काडीवर अगर नारळावर आपल्या डोळ्यांसमोर आणू शकतात आणि आपला जीव बचावतात. **भयंकर भूताखेतास** ते एका बाटलींत आणू शकतात आणि त्यामुळें आपण त्याच्या **भयंकर परिणामापासून** बचावाल. ते आपणांस एक **आध्यात्मिक बाण** देतील कीं जो आपल्या कुलूप लावलेल्या लोखंडी सेफमधून अदृश्य होईल आणि आपल्या प्रियकरास, प्रेयसीस अगर शत्रूस आपल्या पायाशीं आणील. ते आपणास कोणत्याही औषधाशिवाय **पूर्ण मनुष्यत्व** प्राप्त करून देतील. ते आपल्या आकर्षक किरणानें, **मानसिक रोग, अशक्तपणा, हिस्टेरिया, फिटस्, नपुंसकत्व, पंगुपणा** इ. रोग बरे करूं शकतात.

| दिवाळीनिमित्त खास सवलत | केवळ दिवाळी सवलत म्हणून १५ नोव्हेंबर १९५२ पर्यंत खालील अजब ताईत निम्या किंमतींत देण्याची खास योजना. गरजूंनीं काळजी निवारण होण्यासाठीं आजच लिहावें. |
|---|---|

१ **मोहिनी काम विलासः** – प्रेम आणि विवाहांत यश. तुमचा प्रियकर अगर प्रेयसी तुमच्या पायाशीं लोळण घेईल. घरगुती भांडणांचा नाश. किंमत : सर्वसाधारण शक्ति. रु. ५१, विशेष शक्ति—रु. १०१.

२ **धन्वंती गृहनाशकः**—चांगल्या लाभाकरितां, भयंकर जादुटोण्याचे कांहींही परिणाम नाहींत. शांति आणि सौख्य, शर्यतींत यश, लॉटरी, कोर्ट, परीक्षा, बढती, इ. अनपेक्षित रीत्या पैसा येतो. किं. सर्वसाधारण शक्ति एक वर्षाकरितां रु. ११, जादा शक्ति ३ वर्षाकरितां रु. २१, विशेष शक्ति सर्व आयुष्याकरितां रु. ५१.

३ **शक्तिबाणः**—भयंकर भुताखेतांना रोखतो, शत्रूच्या करणीपासून अगर जादूटोणा यांपासून बचाव. अचानक अपघात अगर भयंकर आजारापासून अलिप्त ठेवतो. किं. सर्वसाधारण शक्ति रु. ५१, विशेष शक्ति रु. १०१.

४ **संतान सुखः**—निश्चित गर्भधारणा. माझ्या गुरूची देणगी सशक्त मुलाचा लाभ, गर्भनाशास प्रतिबंध. किं. नं. १ रु. १०१ विशेष रु. ३०१.

५ **मॅग्नेमिस्मर आंगठीः**—रोगाची साथ आणि बरे न होणारे रोग व मनुष्यत्वाचा नाश, यांपासून संरक्षण. पुरुष आणि स्त्रियांना शक्ति देते. लग्न झालेल्यांना किं. सर्वसाधारण रु. ११, विशेष रु. २१.

६ **मनमोहिनी अत्तरः**—या अत्तराचा वास घेऊन, जी व्यक्ति तुमच्याकडे कटाक्ष फेकील, ती व्यक्ति तुमच्या ताब्यांत आलीच म्हणून समजा.—लहान आकार पॅकिंग–रु. २१ फक्त.

७ **सरस्वती ताईतः**—बुद्धीचा विकास, स्मरणशक्तीची वाढ व परीक्षेंत हमखास यश. किंमत १ वर्षासाठीं रु. २१, ३ वर्षासाठीं रु. ५१ व हयातभर रु. १०१ फक्त.

या शिवाय आणखी कितीतरी चमत्कार माझ्या कॅटलॉगमध्यें आहेत. रोज स. ११ ते सायं. ५. शनिवारीं–स. ११ ते दुपारीं २. पोस्टाच्या सुट्यांचे दिवशीं बंद.

**प्रो. अशोक** D. B.
"सुविख्यात हिंदू अध्यात्मज्ञानी"

पत्ता—वेस्टर्न इंडिया हाऊस,
पो. बॉ. नं. ५३५, पुणें २ (इंडिया)











## वाट पहातें तुझी अशी मी

वाट पाहतें तुझी अशी मी—
तृप्त सुखाच्या निवांत कुरणीं
सरींत पहिल्या
साज लेवुनी धूळफुलांचा
होऊन पाऊलवाट सुगंधा...

वाट पाहतें तुझी अशी मी—
अतृप्तीच्या खोल अभाळीं
अंधारामधिं
नक्षत्रांची उटी लावुनी
तेजोगंधा स्वर्गापरि...

वाट पहातें तुझी अशी मी—
वाटेपरि भावोत्कट होऊन
वाटच होऊन
भावगंधा होऊन आवघी
भावफुलांचा डाळीत मोहर...
वाट पहातें तुझी अशी मी

—इंदिरा

यावरखून विनायकराव पहातच राहिले. पोरें नाचत होतीं. लोक जमत होते. पोरें ओरडत होतीं, "वेडा—वेडा ! अरे, पैसे वांटतो आहे वेडा !" आणि विनायकरावांनीं पाहिलें कीं संपतहि त्या पोरांमध्येंवर नाचत होता व खिदळून म्हणत होता, "वेडा—वेडा—अरे, पैसे वांटतो आहे वेडा !"

ग्लानीनें विनायकरावांचें मन भरुन गेलें, खालच्या मानेनें. ते चालूं लागले. कुणी तरी त्यांच्या अंगावर खडे फेकले. कुणी तरी धूळ फेकली. आणि त्यांपैकीं कुणी तरी म्हणालें, "काय मूर्ख माणूस आहे !"

हातवारे करत आणि स्वतःशीं बडबडत विनायकराव चालत होते. किती वेळ चालत होते कुणास ठाऊक ? कुठें चाललेे होते कुणास ठाऊक ? हातवारे करत ते स्वतःला सांगत होते "काय मूर्ख माणूस आहे !" आणि त्यांचे ते शब्द त्यांच्या स्वतःच्या कानांपर्यंतहि नीटसे पोहोंचत नव्हते.

"विनायकराव !" त्यांना कुणी तरी हांक मारली.

"विनायकराव !"

विनायकराव थांबले. त्यांना थांबविणाऱ्या माणसाचें नांव जी. पुष्पराज. एक डोळा अर्धा मिटूनसुद्धां कुणालाहि त्या माणसाचा धंदा सांगतां आला असता. तो एक उदयोन्मुख सिनेनट होता. सिनेनट म्हणून कधीं-काळीं त्याचें भाग्य उदयाला येईल असें त्याच्या चेहऱ्यावरून वाटत नव्हतें. एक होतकरू लफंगा म्हणून मात्र त्याचा भविष्यकाळ बराच उज्वल होता.

"विनायकराव !" गहिंवरलेल्या स्वरांत जी. पुष्पराज बोलूं लागला, "काय सांगूं विनायकराव, वास्तविक पाहतां तुम्हांला तोंड दाखवायला-सुद्धां लाज वाटते. पण प्रसंग पडला म्हणजे माणूस निर्लज्ज होतो हेंच खरं."

निर्लज्ज बनण्यासाठीं वास्तविक पाहतां जी. पुष्पराजला कोणत्याच विशेष प्रसंगाची आवश्यकता नव्हती. विनायकराव ह्या वल्लीला ओळखत होते. पण अद्याप ते आपल्याच तंद्रींत होते. ते येवढेंच म्हणाले, "काय पुष्पराज ?"

"काय सांगूं विनायकराव—" कपाळावर हात मारून आणि विनायक-रावांची दृष्टि हाच कॅमेरा मानून आपल्या चेहऱ्याचा 'थ्री फोर्थ' देत पुष्पराज बोलूं लागला, "काय सांगूं विनायकराव ! प्रसंग माणसाला काय वाटेल तें करायला लावतो. आम्ही वास्तविक पाहतां तुम्हांला म्हणूं नये. तुमची स्थिति काय आम्हांला ठाऊक नाहीं ? पण वडील फार सिक आहेत, विनायकराव. औषधाला पैसा नाहीं. आम्हीं विसरलों नाहीं—कधीं विसरायचे नाहीं—मागें एकदां तुम्हीं आम्हांला असेच साडेसात रुपये हात-

उसने दिले होते. सध्या मी त्या 'विस्तवाचा समुद्र' मध्यें काम करतों आहें. झालच तर 'सोन्याचा डोंगर' मध्येंहि रोल आहे मिळाला. पण तुम्हांला तर सारं ठाऊकच आहे, विनायकराव. तशांत वडलांना मोठा सिकनेस आला—बिचारा वाटलं तर ह्यांना माझी सध्या काय स्थिति आहे ती—".

भुंवया कोरलेल्या आपल्या सोबत्याकडे बोट दाखवीत जी. पुष्पराज म्हणाला. विनायकरावांनीं खिशांत हात घातला आणि हाताला आल्या तेवढ्या नोटा पुष्पराजच्या हातांत कोंबल्या. डोळे फाडून पुष्पराज त्या नोटांकडे पहातच राहिला. त्या नोटा एकशें दहा रुपयांच्या होत्या. हें कांहीं तरी त्या उद्योन्मुख नटाच्या अगदीं अपेक्षेपलीकडे झालें होतें. डोळ्यांत टचकन् पाणी आणून पुष्पराज म्हणाला,

"तुम्ही देवमाणूस आहांत, विनायकराव. लोक काय वाटेल तें म्हणोत. पण मी मात्र तुम्हांला..."

भर वाटेंत विनायकरावांचे पाय धरण्यासाठीं पुष्पराज खालीं वाकला. एकशें दहा रुपयांना एक नमस्कार ह्या हिशेबानें वाटेल तितक्या लोकांचे त्यानें वाटेल तितक्या वेळीं प्रकटपणें पाय धरले असते. विनायकरावांना लाथा सारेच देत होते, त्यांचे पाय धरणारा हा पहिलाच माणूस होता! विनायकराव गहिंवरले व पुष्पराजाला उठवीत ते म्हणाले, "हें काय भलतंच पुष्पराज—जा, डॉक्टरला घेऊन घरीं जा."

चिमटा घेतल्याप्रमाणें पुष्पराज एकदम दचकला आणि तडकाफडकी चालूं लागला. पुष्पराज फर्लांग दोन फर्लांग सरळ गेला व मग उजवी-कडच्या बोळांत शिरला. विनायकराव उगीचच त्या दिशेनें पहात उभे होते. बिचारा पुष्पराज...त्यांना वाटत होतें...बिचारा पुष्पराज! आयुष्यांत त्यालाहि यश नव्हतें. अपेशानें त्याला व्यसनें शिकविलीं असतील. कुणी सांगावें? कदाचित् सुसेंहि असेल. कशामुळें काय झालें असेल हें खरोखरच कुणी सांगावें? नाहीं तर ते स्वतः काय खरोखरच इतके वाईट होते? इतके बुद्धिहीन होते? एका गोड शब्दाला महाग होण्याइतके ते टाकाऊ होते? बराच वेळ विनायकराव त्या दिशेकडे पहात राहिले आणि मग विचाराच्या एका हेलकाव्यासरशी ते आपो-आपच चालूं लागले. पुष्पराजनें घेतली होती तीच दिशा त्यांना नकळ-तच त्यांच्या पायांनीं घेतली. तसेच ते फर्लांग दोन फर्लांग नाकासमोर गेले व तसेच ते उजवीकडच्या बोळांत शिरले. वस्तीच्या पोटांत एखाद्या आंतड्यासारखा तो बोळ वळसे घेत गेला होता. बराच वेळ विनायकराव तो बोळ तुडवत राहिले व मग एका उपाहारगृहांत शिरले. एखाद्या अंधाऱ्या गुहेसारखें ते उपाहारगृह चिंचोळें होतें. विनायकरावांची दृष्टि कांहीं पहातच नव्हती हें बरें होतें. 'श्री पांडुरंग मटण ग्रेट प्लेस' हें त्या उपाहारगृहाचें अधिकृत वर्णन होतें. विनायकराव कांहीं तरी खात होते व कसला तरी विचार करीत होते. एकदाचें शेजारच्या केबिनचें दार उघडलें व दोन माणसें बोलूं लागलीं—

"एकशें दहा रुपये—" हा पुष्पराजचा स्वर होता.

"वडील खरंच आजारी आहेत तुझे?" हा भुंवया कोरलेल्या माण-साचा स्वर होता.

"आजाराच्या केव्हांच पलीकडे गेले आहेत आमचे वडील."

"म्हणजे?"

"अरे, स्वर्गांत जाऊन जुना झाला आहे माझा बाप आतां!"

"च्या मारी! म्हणजे सफै बनवलंस म्हणायचं तूं त्या खोकुडाला!"

"मूर्ख जन्माला येतात म्हणून शहाणे मजा करतात!"

'सोन्याचा डोंगर' मधील वाक्यानें पुष्पराज उपसंहार करता झाला.

विनायकराव ताडकन् उठून उभे राहिले. त्यांचा आपल्या कानांवर विश्वास बसेना. त्यांचा जीव गलबलून गेला. त्यांनीं दार ढकललें व धडपडत ते बाहेर पडले. पैसे देण्याचेंहि भान त्यांना उरलें नाहीं. कुणी तरी येऊन त्यांची बाही धरली व खेकसलें "अहो, पैसे—" विनायकरावांनीं खिशांतून नोट काढली व ती खेकसणाऱ्या माणसाच्या हातावर ठेवली. खेकसणाऱ्या माणसाचें मन क्षणभर द्विधा झालें. त्यानें पाहिलें, विनायकराव फारसे भानावर नव्हते. त्यांना मोड परत देण्याची आवश्यता नव्हती. "काय खुळा माणूस आहे!" एवढेंच तो म्हणाला आणि चालूं लागला.

विनायकराव हातवारे करीत चालत होते आणि पुटपुटत होते. मूर्ख—मूर्ख—मूर्ख! मूर्ख—महामूर्ख—शतमूर्ख! सारे त्यांना मूर्ख म्हणत होते. पुष्पराजनें त्यांना मूर्ख ठरवलें होतें. हॉटेलवाल्यानें त्यांना मूर्ख म्हटलें होतें. आणि अरेरे! छोट्या संपतनेंसुद्धां त्यांना मूर्खच म्हटलें होतें. ह्या जन्मांत खरोखर कोणी तरी कधीं त्यांच्याविषयीं चांगला शब्द बोलणार होतें काय? लोकांनीं बरें म्हणावें, असें त्यांच्यापाशीं कांहींच नव्हतें काय? ह्या उभ्या जगांत ते एकटेच का इतके निकामी होते? इतके टाकाऊ, कीं त्यांच्याविषयीं कोणाला यत्किंचित् सहानुभूति वाटूं नये, कोणी त्यांना थारा देऊं नये, कोणी एक फुकाचा चांगला शब्दहि त्यांच्याविषयीं बोलूं नये!

डोक्यावर उन्ह तळपत होतें व हातवारे करीत विनायकराव चालत होते. ते चालत होते व बोलत होते. त्यांची व्यथा समजून घ्यायला, त्यांचे शब्द ऐकायला, कुणीच रिकामें नव्हतें. ते भटक—भटक भटकत होते. सायं-

काळ झाली होती. उन्हें कललीं होती. कपडे पालटून माणसें संध्याकाळची फिरायला निघालीं होतीं. माणसांची, वाहनांची रहदारी वाढत होती.

विनायकरावांचें शरीर थकून गेलें होतें. त्यांचा चेहेरा घामानें डबडबला होता. अंग धुळीनें माखलें होतें. घसा कोरडा पडला होता. गात्रें गळून गेलीं होतीं व मन ठेंचाळून निघालें होतें. राहून राहून त्यांना आपल्या वडिलांची आठवण येत होती व त्यांच्या डोळयांत पाणी जमत होतें. मधूनच त्यांना भास होई, त्यांना वाटे—आपले वडील आपल्याला हांका मारून म्हणत आहेत. "विनायक—विनायक ..."

ते मोठ्या कौतुकानें आपल्या पाठीवर हात फिरवीत म्हणत आहेत—'माझा शहाणा विनायक—माझा गुणाचा विनायक...' व मग एकाएकी लहान झालेले विनायकराव मोठ्यानें म्हणत,

'बाबा—बाबा—'. वाटेवरचे वाटसरू थबकेत, हंसत आणि म्हणत "खुळा आहे—खुळा!"

आणि मग विनायकरावांच्या ध्यानांत येई कीं आपण खुळे आहोंत. एकटे आहोंत. आपल्याला समजणारें, आपलें कौतुक करणारे, आपल्याविषयीं बरा शब्द बोलणारे आतां ह्या उभ्या जगांत कोणी नाहीं. आपण अगदीं तुच्छ आहोंत मूर्ख आहोंत, हास्यास्पद आहोंत. आपणाकडे कोणाचें लक्ष गेलेंच तर तें केवळ आपल्या मूर्खपणामुळें जाणार आहे, हास्यास्पदतेमुळें जाणार आहे. आणि मूर्खांची करतात, तशीच लोक आपली संभावना करणार आहेत. मरेपर्यंत हेंच आपल्या दैवीं आहे, ह्यापेक्षां वेगळें आपल्या विषयांत कधीं कांहीं घडणें नाहीं.

विनायकरावांचा घसा भरल्यासारखा होई, त्यांच्या डोळयांत पाणी जमे, व बोटानें पाणी टिपत ते पुन्हा चालूं लागत. रहदारी वाढती होती वाहनें धांवत होतीं व विनायकराव अद्याप तसेच चालत होते. लोक तसेच त्यांच्याकडे उपहासानें पहात होते, तुच्छतेनें पहात होते अथवा त्यांची उपेक्षा करीत होते. माणसांच्या गर्दींत विनायकराव एकटे होते. उपेक्षित होते व मन श्रांतणीच्या चालीनें ते तसेच चालत होते.

विनायकराव थबकले. समुद्राच्या घोंगावत येणाऱ्या लाटेप्रमाणें स्वर घोंगावत आले. त्या फेसाळणाऱ्या कल्लोळाच्या समुद्रानें जणूं क्षणभर विनायकराव बुडून गेले व मग डोळे उघडून पाहूं लागले. अनावर झालेला एक घोडा टांग्यासकट चौखूर धावत येत होता. टांग्यांत सारथ्याचा पत्ता नव्हता. लगाम तुटून लोंबकळत होता, व तें वेडावलेलें जनावर पिसाट [illegible] येत होतें. लोक ओरडत होते, "धावा—धावा—" माणसें ओरडत होतीं, "संभाळा-संभाळा—"! स्त्रिया चीत्कार करीत होत्या. त्यांचे शृंगार विस्कटत होती. गर्दी वेडीवांकडी पांगत होती. कडेस होत होती. आश्रय शोधत होती.

विनायकराव पहात होते. मार्ग जवळ जवळ मोकळा झाला होता. केवळ चार-पांच वर्षांचें बालक मात्र आपली तिचाकी त्या मोकळ्या वाटेवर चालवीत होतें. तें बालक कुणाचें होतें, सुटलें होतें, कुणास ठाऊक? त्यांचे आईबाप, सगेसोयरे कुठें होते कुणास ठाऊक? ह्या क्षणीं तरी त्या बालकाला कुणीच नव्हतें. उघड्या वाटेवर तें बालक अगदीं एकटेंच होतें. उधळलेला टांगा क्षणाक्षणाला त्या बालकाच्या जवळ येत होता. अधिक जवळ—आणखी जवळ—आणि कडेस सरलेले लोक दुरूनच ओरडत होते. "अरे, कुणी पोराला वांचवा—पोराला वांचवा!"

तोंडाचा फेसाळत आणि खिंकाळत घोडा वादळासारखे दौडत येत होता. दोन क्षणांपूर्वीं तो त्या बालकापासून [illegible] वाड्यांवर होता. मग दहा फुटांवर—मग दहा वितींवर—चावरून कडेस [illegible] लोक ओरडत होते. "अरे पोर मेलें—मेलें" कित्येकांनीं डोळे मिटून घेतले. कित्येकांनीं हुंदके दिले आणि कित्येक विस्फारलेल्या डोळयांनीं तें भयानक दृश्य पहात राहिले. पिसाळलेलें तें जनावर त्या बालकापासून आतां केवळ दहा वितींवर आलें होतें. केवळ दहा वितींवर. क्षणार्धांत तें पोर तुडविलें जाणार होतें. त्याच्या चिंध्या उडणार होत्या. त्याचा गोजिरवाणा देह रक्ताच्या थारोळयांत हुमडून पडणार होता. वारा प्यालेलें तें जनावर त्या मुलापासून केवळ दहा वितींवर होतें—केवळ दहा वितींवर—एका भंगलेल्या विपळांत त्या मुलाचा चेंदा उडणार होता

पण त्या भंगलेल्या विपळांतच विनायकरावांच्या शरीरांतील प्रत्येक कण सावध झाला. उजळून उठला! काजळ तीट लावलेलें सान्यांनीं एकटें टाकलेलें तें बिचारें पोर काय आतां मृत्यु झडपून नेणार होता? ज्याच्या ओठावरील दूधहि अद्याप वाळलें नसेल, त्याचा देह आतां रक्तानें रंगून निघणार होता? त्या निरागस, निश्चित, अरक्षित बालकाला काय आज असें अपघाताचें भीषण मरण येणार होतें! आणि हें काय सारें विनायकरावांच्या डोळयांदेखत होणार होतें?

चैतन्यानें प्रस्फुरित झालेला विनायकरावांचा तो कुरूप देह डोळ्याचें पातें लवतें न लवतें तोंच तीरासारखा सुटला. मृत्यूचा दूत बनूं पाहणाऱ्या त्या पिसाट जनावरानें शेवटची वीत संपविण्यापूर्वीच रस्त्याची रुंदी कापून विनायकरावांनीं घोड्याच्या उसळत्या टापांसमोर आपला देह आडवा ठेवला होता, व त्यांना भुईसपाट करणारी अखेरची ठोकर खातां खातां त्यांनीं त्या बालकाची तिचाकी सुरक्षितपणें समोर ढकलून दिली होती.

एकाएकीं प्रस्फूर्त टाळ्यांचा कडकडाट झाला. टोप्या वर फेंकल्या गेल्या. बंद पडलेले श्वास सुरू झाले. मिटलेले डोळे उघडले आणि उघडे असलेले डोळे अश्रूंनीं भिजून गेले. "शाबास पठ्ठे शाबास!" लोक ओरडत होते. "मर्द माणूस!—शूर माणूस—मोठा माणूस!" विनायकरावांचा ठेंचलेला देह हात पसरून भुईवर पालथा पडला होता. शुद्धीच्या मर्यादित प्रांतांतून बेशुद्धीच्या अमर्याद प्रांतांत प्रवेश करतां करतां टाळ्यांचा तो कडकडाट त्यांनीं ऐकला होता. ते शब्द त्यांच्या कानांवर आले होते—"मर्द माणूस—शूर माणूस—मोठा माणूस!" आणि ते शब्द ऐकतां ऐकतां त्यांचें काळीज आभाळाएवढें मोठें झालें होतें.

लोक त्यांचा जयजयकार करीत होते. लोक त्यांना धन्यवाद देत होते. "शूर माणूस—!" "मर्द माणूस!" "मोठा माणूस!" सावधतेच्या प्रदेशांतून असावधतेच्या प्रदेशांत जातां जातां विनायकरावांवर शब्दांचीं फुलें पडत होतीं: त्यांच्या जाणिवेचा शेवटचा क्षण आनंदाचा होता. विजयाचा होता: जाणिवेंतून नेणिवेंत निसटतां निसटतां विनायकरावांना वाटलें—यायचेंच असेल तर मरण आतां ह्या क्षणींच यावें! आयुष्यांतील अखेरचा क्षण आतां हाच ठरावा!






**ही जीवनकला आपण विसरल्यामुळेंच आपल्या जीवनाला आजची अवकळा आली आहे. म्हणून रोज दिवेलागणीला घरीं परततांना मी आकाशांतलीं नक्षत्रें मनसोक्त पाहून घेतों आणि मगच घरांत पाऊल टाकतों.**






—वा. भ. बोरकर

दिवेलागणीनंतर मी घरीं आलों कीं, घरचीं आणि शेजारचीं सारीं पांखरें, एकदम मला घेरतात आणि 'नवी गोष्ट सांगा' असें म्हणत, किलबिलाट सुरू करतात. अशा वेळीं त्यांना वाटेला लावणें कसेंच शक्य नसतें. त्यांचा हट्ट मला पुरवावाच लागतो. पण रोज नवनवी गोष्ट कोठून आणायची? किती तरी गोष्टी आजवर मीं ऐकल्या, पाहिल्या अन् वाचल्या. पण पांखरांप्रमाणें त्या केव्हांच उडून गेल्या आहेत. राहिले आहेत ते केवळ त्यांच्या पायांचे ठसे. वाढत्या वयाबरोबर हें असेंच होतें. गोष्टी उडून जातात आणि तात्पर्यें तेवढीं राहतात. तरीहि आंगठ्यावरून रावण चितारावा त्याप्रमाणें मी त्या तात्पर्यांवरून नव्या गोष्टी घडवीत जातों, आणि कशीबशी वेळ मारून नेतों. माझ्या या गोष्टींमुळें मुलें काय शिकलीं कोण जाणे? पण मला मात्र पुष्कळच शिकायला मिळालें.

पहिली गोष्ट मला कळली ती ही कीं, मुलांना पटेल आणि रुचेल अशी रोज नवी एक गोष्ट सांगणें हें सामान्य प्रतिभेचें काम नाहीं. त्याला अरेबियन नाइट्समधल्या शहाजादीची समर्थ आणि शीघ्रप्रसू प्रतिभा हवी. दुसरी गोष्ट ही कीं मुलांच्या ठिकाणीं अत्यंत संपन्न आणि अभिजात अशी रसिकता असते. एक वेळ वाङ्मयांतल्या मुरब्बी टीकाकारांना बनवितां येईल, पण लेच्यापेच्या किंवा नकली कलेनें मुलांना फसवितां यावयाचें नाहीं. तीं तुम्हांला वाटेल तितक्या सवलती देतील. तंत्राचें कसलेंच बंधन तुमच्यावर लादणार नाहींत. तुम्ही गोष्ट कशीहि सुरू करा, कशीहि संपवा, त्याला त्यांची ना नाहीं. तुम्ही घोड्यांना पंख लावा, हुकमाबरोबर हवेंत उडणाऱ्या सतरंज्या आणा, विशिष्ट प्रकारचीं केळीं खाल्ल्यामुळें माणसांना शिंगें फुटलीं म्हणून सांगा, जनावरांना माणसांच्या भाषेंत बोलायला लावा, टोपी घातल्यामुळें मनुष्य दुसऱ्याला दिसूं शकत नाहीं म्हणून सांगा; सरोवरांत पडलेल्या राजकन्येच्या अश्रूंतून सोन्याचीं कमळें उमललीं म्हणून सांगा, थोडक्यांत भौतिक सृष्टीचे एकूण एक नियम

त्यांतल्या अगदीं बारीकसारीक नियमांचेंहि थोडेंसें उल्लंघन त्यांना चालावयाचें नाहीं. सत्याचा जय झाला पाहिजे, प्रीतीचें चीज झालें पाहिजे, सद्गुणांना साफल्य आलें पाहिजे, त्यागाला प्रतिष्ठा मिळाली पाहिजे, थोडक्यांत भल्याचें भलें झालें पाहिजे, वाइटाला शासन घडलें पाहिजे, निदान त्याला पश्चात्ताप झाला पाहिजे,—म्हणजेच देवासुरसंग्रामांत देवांना विजय मिळाला पाहिजे, असा त्यांचा आग्रह असतो. वास्तवांत असें हमखास घडतेंच असें नाहीं, असें पुराव्यानिशीं सिद्ध करण्याचा तुम्ही कितीहि प्रयत्न करा, त्यांना तें पटायचें नाहीं. ज्याला तुम्ही वास्तव जग असें म्हणतां तें तुम्हीं बिघडवून ठेवलेलें जग आहे, तें खरें जग नव्हे, असें कदाचित् शब्दांनीं त्यांना सांगतां येणार नाहीं. पण

खुशाल धाब्यावर बसवा, तीं मुळींच हरकत घेणार नाहींत. पण तुम्हीं निर्माण केलेल्या या नव्या भौतिक सृष्टीच्या मुळाशीं सनातन नैतिक सृष्टि असली पाहिजे हा आग्रह मात्र तीं सोडावयाचीं नाहींत.

आपल्या असंतोषांतून तीं तोच भाव प्रगट करीत असतात.

कवीनें खऱ्या सौंदर्याची निर्मिति केली तर खरा रसिक ज्याप्रमाणें त्याला व्याकरणाचे नियम धाब्यावर बसविण्याचें स्वातंत्र्य देतो, एवढेंच नव्हे तर, त्यानें घेतलेल्या स्वातंत्र्यामुळें भाषेचें सामर्थ्य आणि सौंदर्य वाढलें असें मानून त्याचें कौतुकहि करतो त्याप्रमाणें हे चिमणे रसिकहि तुम्ही नैतिक सौंदर्याची यशस्वी निर्मिति करूं शकल्यास तुमच्या सर्व प्रमादांचें कौतुक करतात. मात्र या निर्मितींत तुम्ही चुकलांत तर त्यांची मान्यता तुम्हांला

मिळावयाची नाहीं. खिस्ती लोक ज्याला 'किंग्डम् ऑफ हेवन' म्हणतात किंवा गांधीजी ज्याला रामराज्य म्हणून संबोधतात, त्याचें चित्र तीं आपल्या स्फटिकनिर्मल मानससरोवरांत पहात असतात. आणि तुमची कथासृष्टि त्याच्याशीं पडताळून घेत असतात. त्यामुळें भौतिकतेचा खरेपणा फसवा आहे आणि नैतिकतेंतला प्रमाद अक्षम्य आहे, याचें त्यांना उपजत ज्ञान आहे. एवढें दिव्य दर्शन आणि इतकें सूक्ष्म ज्ञान ज्यांना आहे ते प्रतिभावन्त नव्हत असें कसें म्हणावें!

प्रत्येक निर्मळ आणि निरहंकार आत्मा हा स्वभावतःच प्रतिभावन्त असतो. एके काळीं आपणहि मुलें होतों. अर्थात् या सत्याची उपजत जाणीव आपल्यालाहि होतीच. पण आत्म्याप्रमाणेंच प्रतिभाहि विभु आहे हें नास-

नांनीं मलीन झाल्यामुळें आणि अहंकारानें अंध बनल्यामुळें आम्हीं विसरून बसलों आहों, आणि त्यामुळेंच स्वेच्छास्वैरपणानें शहाणपणाचा मक्ता आम्हीं स्वतःकडे घेतला आहे आणि प्रतिभेचा मक्ता आपल्याकडे घेऊन कलावंतांनीं आपल्यावर मात केली आहे. आत्मप्रौढीच्या या गुर्मीत आम्ही दिवसरात्र मुलांना शिक्षणाचे डोस पाजतों आणि देवाचें जग बिघडविण्याच्या कामांत तीं आमच्याहूनहि सवाई बनलीं म्हणजे त्यांना सर्टिफिकिटें बहाल करतों. आम्हां चुकणाऱ्या प्रौढांना भानावर आणण्यासाठीं सृष्टीनें घरोघर मुलें पैदा केलीं आहेत हें आमच्या ध्यानींच येत नाहीं. आणि त्यामुळें तृणपुष्पांप्रमाणें उमलणारे त्यांच्या प्रतिभेचे उन्मेष त्यांच्यासारखेच दुर्लक्षित राहतात.

या बालनारायणांच्या प्रतिभेचे असंख्य चमत्कारे आजवर माझ्या भोंवतीं खेळून गेले असतील. पण जीवनाचें सारें शहाणपण वयांत किंवा पुस्तकांत सामावलेलें असतें, या खोट्या समजामुळें बहुतेक लोकांप्रमाणें माझेंहि त्यांच्याकडे भान गेलें नव्हतें. पण एक दिवस अकस्मात् मला ही जाणीव झाली. मी त्यांच्या बोलण्याचालण्याकडे ध्यान देऊं लागलों.

एक दिवस आम्ही दोघें आमच्या मुलाला घेऊन चांदण्यांत फिरायला निघालों. तो त्या वेळीं अवघा सहा वर्षांचा होता. सवयीनें आम्ही चालत होतों. आणि संसाराच्या गोष्टी बोलण्यांत चूर झालों होतों. तोंच मुलानें फूटपाथवर झोंपलेल्या माणसांकडे माझें लक्ष वेधलें, आणि मला विचारलें, "बाबा! हे लोक असे रस्त्यांत कां झोपले आहेत?"

"त्यांना घर नाहीं, बाळ!" त्याच्या आईनें उत्तर दिलें.

"भाड्याचें देतील नाहीं?" त्यानें पुढें विचारलें.

"त्यांच्याजवळ तेवढा पैसा कोठून असणार? मिळालेला रोजगार पोटालाच पुरत नाहीं." मीं उत्तर दिलें. आणि आम्ही तशींच पुढें चालूं लागलों. मुलगा कांहीं वेळ कांहींच बोलला नाहीं. पण अंमळशानें तो म्हणाला, "पण हीं सगळीं घरें हेच लोक बांधतात ना?"

"हो." मीं उत्तर दिलें.

तेव्हां त्वेषांत येऊन तो म्हणाला, "मग त्यांनीं सांगायला पाहिजे कीं, आम्हांला जोंपर्यंत घरें नाहींत तोंपर्यंत दुसऱ्यांचीं घरें आम्ही बांधणार नाहीं." त्याच्या या बोलण्यानें मी एकदम भानावर आलों. आम्हां प्रौढांचीं मनें स्वार्थापायीं सहानुभूतीला पारखीं झाल्यामुळें प्रतिभेलाहि कशीं मुकून बसतात याची मला जाणीव झाली. केवळ सहा वर्षांचा मुलगा, पण किती थोड्या वेळांत त्याला विषमतेच्या या प्रश्नाचें आणि त्याच्यावरच्या उत्तराचें नेमकें आकलन झालें होतें!

मी जेव्हां मोठ्या कौतुकानें ही गोष्ट माझ्या मित्राजवळ बोललों तेव्हां त्यानें आपला जो अनुभव सांगितला तो असाच उद्बोधक आहे. तो म्हणाला, "दुपारची वेळ होती. आणि आम्ही चार माणसें जेवायला बसलों होतों. पोळी तयार झाली कीं चौघांच्याहि पानात चार चतकोरी पडत होत्या. इतक्यांत मधुकऱ्याची हांक कानांवर आली. ताज्या पोळ्या तयार नसल्यामुळें अर्थातच माझ्या बायकोनें डब्यांतली शिळी पोळी मधुकऱ्याला वाढली. झालें तें अगदीं सहज झालें. त्यांत कांहीं विशेष गैर घडलें असें आम्हां कोणालाच वाटलें नाहीं. आम्ही आपले जेवणावर ताव मारण्यांत चूर होतों. तोंच माझा तीन वर्षांचा मुलगा आपल्या बोबड्या भाषेंत म्हणाला, 'तुम्हांला गलम पोली अनी मधुकऱ्याला मात्र शिली पोली होय?' त्याच्या या प्रश्नाबरोबर आम्हां सगळ्यांनाच थोबाडींत मारल्यासारखें झालें. माझ्या बायकोनें आणि मीं त्याच्या प्रश्नावर समर्थन करण्याची केविलवाणी धडपड केली खरी, पण त्यानें त्याचेंच काय आमचेंहि समाधान झालें नाहीं. आम्ही जेवलों पण माना खालीं घालूनच."

देवाचा न्याय आणि माणसांचा अन्याय जसा मुलांना चटकन जाणवतो, तसे प्रतिभेचे अन्य धर्महि त्यांना सहजासहजीं आकलन होतात. कधीं काव्य, कधीं विनोद, तर कधीं टीका तीं इतक्या लीलेनें आणि नैपुण्यानें करून जातात कीं आपण चकित होतों. एकदां माझ्या एका कविमित्रानें आपल्या मुलाचा परिचय करून देतांना मला म्हटलें "हा मोठा कवि आहे बरं. अगदीं लहान होता तेव्हां पावसाच्या आठळ्या सांपडल्या म्हणून आनंदानें उड्या मारीत माझ्याजवळ आला. पहतों तों गारा!" हीच कल्पना एखाद्या कवीनें छंदांत बसविली तर आपण त्याला नुसतें डोक्यावर घेतलें असतें. या काव्याप्रमाणें मुलांचा विनोदहि मोठा निरागस असतो.

एकदां मी पाताळेश्वरचीं लेणीं पहायला गेलों होतों. बरोबर माझा धाकटा मुलगा होता. समोरच्या नंदीकडे बोट करून तो मला म्हणाला, "हा नंदी अगदींच असभ्य आहे, नाहीं? चड्डी न घालतांच देवळांत आला आहे." त्याच्या या उद्गारानें आजूबाजूची सगळीच मंडळी हसत सुटली. एकदां तर त्यानें आईला बजावलें होतें कीं आपल्या मांजरीच्या पिलाला यापुढें मुळींच घरांत घ्यायचें नाहीं. तिनें "कां?" म्हणून विचारलें तेव्हां तो म्हणाला, "फार घाणेरडी आहे ती. शी करते आणि ढुंगण धूत नाहीं."

मुलांची कोल्पनिक कथांची आवड पाहून

आपणांला वाटतं कीं त्यांना वास्तवतेची दृष्टि नाहीं. पण येथेंहि कधीं कधीं तीं आपल्यावर मात करतात. एकदां माझ्या एका स्नेह्याबरोबर मी 'तुकाराम' चित्रपट पहायला गेलों होतों. त्यांचा आठ वर्षांचा मुलगाहि आमच्याबरोबर होता. चित्रपट संपल्यावर त्यानें आपल्या वडिलांना म्हटलें, "या चित्रपटांत कुठें काय चुकलें आहे सांगा पाहूं?" आम्हांला कुठेंच चूक आढळेना. आम्ही गोंधळून गेलों. "चित्रपटांतील चूक आमच्या कांहीं लक्षांत आली नाहीं बुवा! तूं सांग बघूं." आम्ही म्हणालों. यावर तो म्हणाला, "या चित्रपटांत इतक्यांदां तुकाराम अभंग म्हणतो, पण एकदांहि तंबोरा वाजवीत नाहीं." त्याचें म्हणणें शंभर टक्के खरें होतें. अग्रगण्य म्हणवणाऱ्या दिग्दर्शकाची चूक त्यानें किती सहज दाखवून दिली होती! कलेतल्यां मोठमोठ्या तज्ज्ञांनाहि तोंडांत बोट घालायला लावण्यासारखे चमत्कार हीं मुलें कशीं सहज करून जातात याची मला या प्रसंगानें जाणीव झाली. पॅरिसमध्यें चित्रांचें एक मोठें प्रदर्शन भरलें होतें, आणि त्यांतल्या दोन उत्कृष्ट चित्रांपैकीं कोणत्या चित्राला पहिलें बक्षीस द्यावें, यावर परीक्षकमंडळांत खल चालला होता. इतक्यांत दोन मुलें त्यांतल्या एका चित्राजवळ येऊन पोंचलीं. त्या चित्रांत एक पांखरू कणसावर बसून त्यांतला दाणा तोडत होतें. त्याकडे पाहून एक मुलगा दुसऱ्याला म्हणाला, "हा चित्रकार अगदींच बेअकली दिसतो. पांखराच्या भारानें कणस वांकायला पाहिजे एवढेंहि त्याच्या ध्यानांत आलें नाहीं." परीक्षक मंडळांतल्या एका तज्ज्ञाचें त्याच्या या अभिप्रायाकडे सहज लक्ष गेलें, आणि बक्षिसाच्या चित्राचा आणि परीक्षकांच्या शहाणपणाचा एकदमच निवाडा होऊन गेला.

मुलांच्या प्रतिभेचे असे हे नानाविध उन्मेष पाहिल्यावर मला अनेकदां वाटतें, कीं जगांतील कितीतरी नामवंत प्रतिभावंतांनीं त्यांच्याकडून सूचन घेतलें असेल, त्यांची उसनवारी केली असेल. एकदां एका मुलाला मी म्हणालों, "बाहेरच्या व्हरांड्यांत मी माझें पुस्तक विसरलों आहें तें घेऊन ये." "पण बाहेर काळोख आहे ना?" तो म्हणाला. "तूं एवढा धीट मुलगा आणि काळोखाला घाबरतोस?" यावर तो म्हणाला, "अहो! मी घाबरत नाहीं. माझें अंग घाबरतें." आपल्या अंगाहून आपण भिन्न आहोंत, भीतीचें ग्रहण शरीराला आहे, प्राणाला नाहीं, हें केवढें सत्य त्यानें सहज सांगून टाकलें होतें! अशा एक ना हजार गोष्टी, रोज घर त्या रोज घडत असतात. ज्ञानाच्या तेच्या खोट्या अहंकारांतून आम्ही प्रौढ माणसें थोडीं बाहेर आलों आणि बालप्रतिभेच्या या विलासाची दखल घेऊन त्याची तत्परतेनें नोंद करूं लागलों तर केवढ्या बहुमोल साहित्याचें खाण आपल्याला उपलब्ध होईल? पण आपण करंटे लोक हें तर करीत नाहींच, उलट आपल्या मलीन आणि अहंकारी वागणुकीनें त्यांना बिघडवून मात्र ठेवतों. त्याचें उदाहरण म्हणून परवांचीच एक गोष्ट सांगतों. इथल्या रिमांड होममध्यें कुणी तरी एका दहा बारा वर्षांच्या मुलाला आणून दाखल केलें. स्टेशनांत येऊन थांबलेल्या एका रिकाम्या गाडींत तो त्याला झोंपलेल्या स्थितींत आढळला होता. त्यानें त्याला खूप विचारून पाहिलें, पण तो आपलें नांव-गांव सांगेना. नाइलाजानें त्यानें त्याला रिमांड होममध्यें आणून सोडलें. अधिकाऱ्यांनीं विचारलें तेव्हां तो आपण मुसलमान असल्याचें सांगूं लागला. पण त्याचे कान टोंचलेले होते. तरीहि त्यानें त्या मुलाविषयीं अविश्वास दाखविला नाहीं. उलट आदरानें व आत्मीयतेनें तो त्याच्याशीं वागूं लागला. पुढें त्याला त्याच्याच तोंडून त्याची खरी हकीकत कळली. मूळचा हा मोठा छान मुलगा होता. शाळेंत नेहमीं त्याचा पहिला नंबर असे. खेळांत, नाटकांत, वक्तृत्वांत तो बक्षिसें मिळवी. अशा वेळीं शाळेंतले त्याचे शिक्षक आणि नात्यागोत्याचीं माणसें त्याच्या आईवडिलांकडे त्याचें अभिनंदन करायला येत. त्या वेळीं अभिमानानें तीं म्हणत, "आमचे

"शिस्तच मुळीं तशी आहे." आणि आपण मुलाला शिकवतों कसें, वागवतों कसें, याचें रसभरित वर्णन तें तिखटमीठ लावून करीत. आपलें स्वकष्टार्जित श्रेय आपले आईवडील लबाडीनें असें आपल्याकडे घेतात या गोष्टीनें त्या मुलाचा स्वाभिमान चांगलाच दुखावला. त्या दिवसापासून त्यानें ठरवून टाकलें कीं, अभ्यासांचें सारें सोंग बेमालूम वठवायाचें. पण मुळींच कांहीं शिकायचें नाहीं. जितक्या निर्धारानें तो वृक्षाच्या मागें लागला होता तितक्याच आवेशानें तो अपेक्षाची वाट चालूं लागला. आईवडिलांची मानखंडना घडावी म्हणून तो आपरथापरी शिकस्त करूं लागला. आणि या त्याच्या उद्योगानें घरांत राहणें जेव्हां त्याला दुःसह झालें तेव्हां घरून त्यानें असा पोबारा केला.

मुलें बिघडतात तीं हीं अशीं. असले प्रसंग ऐकले किंवा पाहिले म्हणजे मला माझें लहानपण आठवतें आणि अंतःकरणाच्या तळाशीं गाळ होऊन राहिलेली कटुता एकाएकीं उफाळून वर येते. त्या वयांत खोटेपणानें वागणें मला किती कठीण जात होतें नि आज खरेपणानें वागणें तितकेंच कसें कष्टाचें होऊन बसलें आहे, याची जाणीव होऊन मी एकदम विषण्ण होतों. त्या वेळीं असत्य नीट बोलतां न आल्यामुळें मीं शिक्षा भोगली होती. दुपारची वेळ होती. माझे वडील आपल्या मावशीबरोबर सोंगट्या खेळत बसले होते. डाव अगदीं रंगांत आला होता. आणि तो पहात मी जवळच उभा होतों. इतक्यांत घरांतून निरोप आला कीं गांवचा लक्ष्मण चांभार पैसे मागायला आला आहे. त्याच्या मुलीचें लग्न होतें. आणि त्यासाठीं वडिलांनीं त्याला पैसे द्यावयाचें कबूल केलें होतें. पण त्यांचा सारीपटाचा डाव आतां इतका हातघाईवर आला होता, कीं दुसऱ्या कशालाच त्यांच्या मनामध्यें थारा नव्हता. ते मला म्हणाले, "त्याला जाऊन सांग, मी घरीं नाहीं." हुकुमाप्रमाणें मी बाहेर गेलों आणि लक्ष्मणाला म्हणालों, "वडिलांनीं आपण घरीं नाहीं असें तुला सांगायला सांगितलें आहे." एवढे हे शब्द तोंडून निघतात न निघतात तों माझ्या पाठींत एक सणसणीत चपराक बसली. वळून पाहतों तों माझे वडील. "ब्राह्मणाचा मुलगा म्हणवतोस आणि असें बेअकल बोलतोस? तुझी अकल ढोपरांत आहे कीं कोपरांत?" ते चिडून म्हणाले. तो बेअकलीपणा होता खरा च. खरें बोलायला अकल लागत नाहीं. खोटें बोलायला लागते. आणि ती माझ्याकडे नव्हती.

वडील माणसें जाणूनबुजून अशी वाईट देख मुलांना लावतात असें नाहीं. त्यांच्यांतील सत्य, मांगल्य आणि सौंदर्य यांच्याकडे त्यांची जी डोळेझांक झालेली असते, त्यामुळें हें असें घडतें. माथ्यावर जाईल तिथें नक्षत्रें असूनहि त्यांच्याकडे दुर्लक्ष करून जसा माणूस अंधारांत चांचपडत असतो, तसाच घरांतल्या या नक्षत्रांची उपेक्षा करून, तो दुर्मिळ ज्ञानाला आणि निरागस आनंदसौख्याला पावलोपावलीं मुकत असतो. ज्या माणसानें पहिल्यावहिल्यानें मुलाला नक्षत्राची उपमा दिली तो थोर प्रकारचा जीवनरसिक होता. त्याला हें सत्य कळलें होतें जीवनाचें आणि संस्कृतीचें रहस्य उलगडलें होतें. नक्षत्रांच्या प्रभेला आंचवलेल्या माणसाचा उद्धार करण्यासाठीं ईश्वर हीं प्रतिभेचीं नक्षत्रें घरोघर पाठवून देतो, याची त्याला जागती जाणीव होती. नक्षत्रांना असें घरांत आणून आणि आपल्या प्रतिभावन्त महाभागांचीं नांवें नक्षत्रांना देऊन त्यानें स्वर्ग आणि पृथ्वी यांची कायमची स्नेहगांठ बांधून टाकली. पृथ्वीवरच्या सर्व प्रतिभावंतांत मूल हें केंद्रस्थानीं आहे. हें जाणल्यामुळेंच आपल्या दिव्यदृष्टि पूर्वजांनीं नक्षत्रमंडळांतील ध्रुवपदावर त्याचा राज्याभिषेक केला. त्यांची ही जीवनकला आपण विसरल्या मुळेंच आपल्या जीवनाला आजची अवकळा आली आहे. म्हणून रोज दिवेलागणीला घरीं परततांना मी आकाशांतलीं नक्षत्रें मनसोक्त पाहून घेतों आणि मगच घरांत पाऊल टाकतों.















मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



# सरदेसायांच्या घराण्यांत आजपर्यंत कधीं न घडलेली गोष्ट



— लक्ष्मणराव सरदेसाई



• गेल्या शतकांतली गोष्ट—

विष्णुराव आज ओटीवर चिंताग्रस्त बसले होते. तसें पाहूं गेलें तर त्यांना चिंता करायला कांहींच कारण नव्हतें. त्यांचें नांव गोव्यांतच नव्हे तर सबंध महाराष्ट्रभर गाजत होतें. पेशव्यांच्या दरबारांत फार मोठा हुद्दा मिळवून आले होते ते! गांवचे लोक त्यांची थुंकी झेलीत आणि त्यांच्याशीं बोलायला मिळावें म्हणून दूरदूरचे लोक कुंभारजुंव्याला येऊन, त्यांच्या ओटीवर तिष्ठत. मग ते असे चिंताग्रस्त कां?

मोठ्यांच्या विवंचनाहि मोठ्या! विष्णुरावांची मुलगी वाढलेली होती. फारच गुणी! जशी शहाणी तशीच कामसू! श्रीमंताची मुलगी म्हणून ती कांहीं अर्धवट नव्हती. तांब्या उचलायला येत नाही कीं, लुगड्याच्या निऱ्या करतां येत नाहींत म्हणून पावलागणिक मोगरू मोलकरणीला ती हांक मारीत नसे. पहांटे उठून आपलीं सर्व कामें ती स्वतः करी. पांखरा-सारखी घरभर ती उल्हासानें फडफडत फिरे. फारच मायाळू! आणि उदार तरी किती! दरवाज्यावर भिकारीण दिसली कीं तिला कळवळून येई. कुणालाहि तिनें उणेंदुणें बोलल्याचें माहीत नव्हतें.

यशोदाबाईंच्या अंगाची लाही लाही झाली! उभ्या जन्मांत असा त्यांचा अपमान कधीं कुणी केला नव्हता.
आतां काय होईल हें कुणालाच समजेना. रामराव म्हणजे आगीचा लोळ!
त्यांच्या कानांवर ही गोष्ट गेली तर? नको हें लग्न असें त्याला होऊन जाईल आणि मग...

अशा गुणी पुतीला तसाच अनुरूप नवरा नको का मिळवायला? श्रीमंतांचे मुलगे म्हणजे कर्तृत्वहीन आणि अक्षरशत्रु! जुगार आणि बाहेरचा नाद यांतच मोठेपणा मिरविणारे! काल्याजत्रांमधून धुडगूस घालणारे. असल्या मुलांना विष्णुबावांसारखा सुबुद्ध माणूस का जांवयी म्हणून निवडील? म्हणून ते आज इतके चिंतातुर दिसत होते.

आता एरंडीच्या दांतणानें ते दांत घांशीत होते, पण डोक्यांत विचार चालूच होते. इतक्यांत तेथें वैकुंठ आंगले आले. ते त्यांचे प्रिय मित्र. माणूस नेहमीं आनंदी. नाजुक व्यवहारांतहि विष्णुबाव त्यांची सल्ला घ्यायचे. आंगले बरेंबाईट चांगलें जाणत होते. गोव्यांतील गृहस्थांचीं सगळीं कुळंगडीं त्यांना माहीत होतीं. अवगुणांची दयामाया न बाळग-णारे, पण गुणांची योग्य पारख करणारे, नि कदर करणारे मोठे धोरणी होते ते. प्रति नारदच जणुं! पुष्कळसे उपद्व्याप ते करीत, पण अंतिम हेतु चांगला. म्हणूनच विष्णुबावांना ते फार आवडत असत! गोव्यांतील सार्‍या बर्‍यावाईट घडामोडी त्यांना आंगल्यांकडूनच समजत असत. कुठें काय चाललें आहे याची वितबातमी मोठ्या रुचीनें त्यांनीं विष्णुबावांना सांगावी. त्या काळीं वर्तमानपत्रें कुठलीं? आंगल्यांसारख्या जिवंत बातमी-पत्रावरच तेव्हां भागवून घ्यावें लागत असे. कोनाकोपर्‍यांत घडलेल्या गोष्टी ते चवाठ्यावर आणून सोडीत. प्रत्येक गांवांत दोन तीन दिवस तळ देत. बातम्या मिळवीत आणि तें पक्वान्न विष्णुबावांच्या ताटांत नेऊन वाढीत. हें त्यांचें फार आवडीचें काम असे.

आंगले ओटीवर बसले. गड्यानें गुडगुडी आणली, ती ओढीत विष्णुबावांनीं विचारलें, "मग पाहिलात का एखादा मुलगा तुम्हीं!"

"काल्च एक मुलगा बघितला."

"कुठला, कोण आहे तो?"

"तुम्हांला जांवई शोभेल असाच आहे."

"तें ठीक आहे, पण तो कोण आहे तें तरी सांगाल कीं नाहीं?"

"तो कसा आहे हें आधीं सांगतों नि मग तो कोण आहे हें तुम्हीच सांगाल."

"बरं, बरं. सांगा पाहूं आधीं."

"तो थोर घराण्याचा आहे—"

"पण छंदीफंदी नाहीं ना?"

"छे! छे! मुलगा सच्छील आहे. कोणतंहि व्यंग नाहीं. डोळे झांकून मुलगी द्यावी."

"असा मुलगा मोठ्या घराण्यांत मिळणं म्हणजे आश्चर्य म्हणायचं!"

"तुम्हांला का शंका वाटते?"

"काय करतोय तो?"

"भतेग्रामांचा इनामदार आहे. इनामदारी चालवणं म्हणजे थट्टा नाहीं."

"भतेग्रामांतले सरदेसाई तर नव्हेत ना?"

"अगदीं अचूक सांगितलंत!"

"त्यांच्याकडे एक चांगला मुलगा आहे असं ऐकलं होतं खरं."

"चांगलाच काय पण तो मोठा कर्तबगार नि निधड्या छातीचा आहे!"

"बंदूक-तरवार घेऊन तो लोकांना मारायला नाहीं ना जात? या सरदेसायांचा मला तरी भरंवसा नाहीं बुवा! बंडखोरांचंच रक्त तें!"

"तुम्ही म्हणतां तें अगदी खरं आहे. मुलगा चांगला आहे. जवळ नेहमीं बंदूक-तरवार बाळगणारा पण सत्त्वानं वागणारा आहे!"

"मग विचारतों त्याच्या वडिलाना. नांव काय बरं म्हटलंत? आबा-साहेब, नाहीं का? आतां आठवलं. लहानपणीं पाहिला आहे मी त्याला. मोठा तेजस्वी पुरुष! खरं सांगू तुम्हांला आंगले? माझी मुलगी असल्याच घराण्यांत पडावी अशी इच्छा आहे. नाहींतर श्रीमंतांचीं गबाळ मुलं काय थोडींथोडकीं आहेत? पण मला तीं डोळ्यांसमोर नको आहेत!"

"मग, आबासाहेबांकडे शब्द टाकायचं माझ्याकडे लागलं. पण एक भानगड आहे."

"काय भानगड आहे? सांगा पाहूं आधी."

"दिपा राण्याला त्यांची मदत आहे या संशयानं सरकारनं त्यांना पकडून आणायचा हुकूम काढला आहे, हें नाहीं का तुम्हांला माहीत?"

"तसं मागं ऐकलं होतं खरं. बंडांत सामील होता का तो?"

"होता नि नव्हताहि. सरदेसायांचं रक्त तें! 'फिरंग्यां'नीं सत्तरींत अगदीं उच्छाद मांडला होता! तो पाहून त्यांचं डोकं भडकलं अन् त्यानं राण्यांना कळवलं कीं, तुम्हांला लागेल तें साह्य द्यायला आम्ही तयार आहोंत!"

"मग खरंच का दिलं त्यानं साह्य? तसं असलं तर मग ही एक मोठी भानगडच झाली म्हणायची!"

"त्याच्या हाताखालचे शेकडों जवान बंडांत शिरले ते त्याच्या हुकुमाशिवाय गेले असतील असं का वाटतं तुम्हांला? शिवाय राण्यांना दारुगोळा, बंदुका, तरवारी पुरवतो आहे म्हणे तो!"

"सरकाराला त्याच्याविरुद्ध कांही पुरावा मिळालेला नाहीं ना?"

"मुळींच नाहीं. पण त्याला संशय आला आहे खास. नाहीं तर रामरावांना पकडायचा हुकूम निघाला नसता."

"मग तो आता उघड उघड फिरत नसेल ना?"

"कसा बरं फिरेल? आपल्या नोकरांत मात्र तो स्वैरपणें फिरतो! कुणाची छाती आहे त्याला हात लावायची? दहा बारा जवानांना भारी आहे तो! मध्यरात्रीं वाघाच्या ढोलींत जाऊन त्याला डिवचून गोळी घालणारा मोठा धाडसी जवान आहे तो!"

"म्हणूनच या बंडाच्या भानगडींत पडलो. त्याला मुलगी कशी बरं द्यायची?"







अनुक्रमणिका

"तसं नाहीं कांहीं. त्यावर एक उपाय सुचला आहे मला. सांगू का?"

"अवश्य सांगा."

"आज, देवदयेनं तुमच्या शब्दाला राजदरबारांत मान आहे. रामरावांबद्दल तुम्हीं गव्हर्नराकडे बोलणं करावं आणि त्यांचं पकडवॉरंट मागं घ्यायला लावावं. मग आबासाहेबांकडे शब्द टाकून त्यांना पटवणं माझ्याकडे लागलं. बरोबर भिकू पैंनाहि नेतों. ते एक चांगले वजनदार मध्यस्थ आहेत! आबासाहेब तुमचा शब्द मोडणार नाहींत याबद्दल मला पूर्ण भरंवसा वाटतो."

"ठीक आहे. मग मी उद्यांच पणजीला जाऊन वॉरंट मागं घ्यायला लावतों. तुम्ही पुढल्या सोमवारीं भिकू पैंसह 'माचिलां'तून जाऊन आबासाहेबांना भेटा."

"त्याबद्दल आपण निश्चिंत असा. बरंय्, येऊं मी आतां?"

—सरदेसायांचा वाडा म्हणजे एक किल्लाच जणुं! ऐसपैस पसरलेल्या चार चौपेठ्या, दहाबारा माड्या, सदरा, अंगणें, कांहीं विचारू नका! पहाटेपासून मध्यरात्रीपर्यंत तेथें चाललेली हालचाल पाहिली म्हणजे सरदेसायांच्या चलतीची सहज कल्पना येते. वाड्याभोंवतीं बंद्यांचीं पन्नास साठ घरें जवळजवळ पसरलेलीं होतीं. तीं खाशांच्या उत्पन्नावर जगत असत. त्यांतले गडी काय किंवा मोलकरणी काय, जिवाला जीव देणारीं!—धन्याचा दरारा पण केवढा! पुढल्या दाराच्या ओस्र्याच्या पायऱ्यांवरून वहाणा घालून वा छत्री उघडून जायची कुणाची छाती होती? ब्राह्मण-भट असो किंवा इतर कोणीहि असो, ओटीवर आला कीं खाशांसमोर बसायला कांकूं करायचा! काल्याच्या रात्रीं खाशांच्या स्वारीला वाजतगाजत दिवटी यायची नि तेव्हां स्वारी लव्याजम्यासह देवळांत जायची! मग खेळ सुरू व्हायचा. शिमग्याची मेळा आधीं खाशांच्या अंगणांत खेळे. कुठल्याहि ग्रामसंस्थेंत आणि देवळांत खाशांना पहिला मान! सगासुदीला भतग्रामांतल्या सगळ्या गांवच्या 'फर्मासी' आल्याशिवाय रहायच्या नाहींत. सरकारी वर्षासन दरसाल मिळायचें. एकेका शेताचें उत्पन्न चारपांचशें खंडी भात! आणि अशीं दहापंधरा शेतें व इतर जमिनी होत्या. सगळें कुटुंब अविभक्त पद्धतीवर चालायचें. आणि आबाहेब हे मुख्य पुरुष असल्यानें हल्लीं तेच घरचा कारभार चालवीत.

—वैकुंठ आंगले आणि भिकू पै दोघेहि माचिलांतून उतरून ओटीवर आले. आबासाहेबांनीं त्यांचें अगत्यपूर्वक स्वागत केलें, आणि त्यांचा योग्य तो आदरसत्कार केला. त्यांनी त्यांना जेवायला ठेवून घेतलें. आणि एक बोकड कापायला लावला.

आबासाहेबांनीं आंगलेना विचारलें. "काय आंगले! फार दिवसांनीं आमची आठवण झाली?"

"तसं नाहीं आबासाहेब! तुमच्याकडे आल्याला अजून तीन महिने देखील पुरे झाले नाहींत. आणि तेव्हां तर चांगला आठ दिवस होतों ना इथं—"

"पण आजच्या तुमच्या आगमनाचं प्रयोजन वेगळंच दिसतंय. नेहमीचं येणं दिसत नाहीं."

"एका गोड कामगिरीसाठीं आलों होतों."




अनुक्रमणिका

"कोणती गोड कामगिरी ?"

"आमच्या विष्णुबावांना ओळखतां ना तुम्ही ?"

"त्यांना ओळखत नाही असा कोण आहे ? त्यांचं नांव आज सगळीकडे गाजतं आहे !"

"त्यांनी पाठविलं आहे आम्हाला. तुमच्या घरीं सोयरीकसंबंध जुळविण्याची त्यांना फार इच्छा आहे."

"असं ? आश्चर्य आहे ! ते सरकारीदरबारीं वावरणारे आणि आम्ही राण्याबरोबर फिरणारे ! तुम्ही शहरांत रहाणारे लोक तर आम्हांला बंडवालेच म्हणत असतां ! मग तुमचं आमचं जुळणार कसं ?"

"आबासाहेब ! असं थट्टेवारी नेऊं नका. मी खरं तेंच सांगतों आहें. विष्णुबावांची मुलगी वाढली आहे ना ?"

"पहा बुवा ! माझं कांहीं म्हणणं नाहीं. विष्णुबावांच्या इच्छेबाहेर नाहीं मी."

"मुलगी मात्र अगदी नक्षत्रासारखी आहे. नशिबानंच मिळायची असली सून !"

"मग, माझं नशीबच उघडलं आहे म्हणायचं !"

"शंका आहे कीं काय ? विष्णुबावांची मुलगी आहेच तशी ! मी त्यांचा मित्र म्हणून नाहीं बरं सांगत हें —"

"मी या संबंधाच्या विरुद्ध नाहीं कांहीं. पण यांत एक मोठी अडचण आहे बुवा !"

"कसली अडचण ? सांगा ना —"

"ती बातमी सगळीकडे पसरली आहे. आणि तुम्हालाच माहीत नाहीं असं कसं होईल ? माझ्या रामावर सरकारनं पकडवॉरंट काढलं आहे हें आहे ना माहीत तुम्हाला ?"

"तसं ऐकलं आहे खरं —"

"तें खोटं नाही. सरकारचा त्याच्यावर डोळा आहे !"

"पण, त्यानं असं केलं आहे काय ?"

"सरकारचं असं म्हणणं कीं तो राण्यांना सामील आहे !"

"पण, आतां तो त्यांना सामील नाहीं ना ? मग कसलं आलं आहे भय ?"

"आहे नि नाहीं पण. सरकारनं सत्तरींत जो उच्छाद मांडला आहे तो आमच्या रामला मान्य नाही. खरं बोलायचं म्हणजे 'सत्तरेमहाल' राण्यांचा, तिथं त्यांना कोणतेच हक्क ठेवायचे नाहीत म्हणजे काय ? तें एक सोडा म्हणा. पण लोकांवर थानपट्टी, घरपट्टी, चूलपट्टी असे किती कर लादायचे ! सरकार झालं म्हणून काय झालं ! असल्या गोष्टींना कांहीं मर्यादा आहेत कीं नाहीं ? राणे हें निमूटपणें कसं सहन करतील ! त्यांनीं बंड उभारायचं नाहीं तर काय ?"

"तें खरं आहे. पण तुमच्या रामावर सरकारचा डोळा कां ?"

"भतग्रामांतील लोकांना आमचा राम सांगतो कीं, 'राणे आमचे ! लोकांनीं त्यांना आसरा द्यायला हवा.' तुम्ही आमच्या रामाला ओळखत नाहीं. त्याला अन्याय मुळींच खपत नाहीं. मग तो स्वतःचा असो की दुसऱ्याचा असो ! एकदां चिडला तर मग कुणाचंहि ऐकणार नाही आणि काय करील याचा नेम नाही. तसा मीं त्याला सांवरून धरला आहे म्हणा. तो राण्यांना जाऊन मिळाला तर आमचे हक्क, जहागिरी वगैरे खलास व्हायचा प्रसंग !"

"आता आलं लक्षांत. तसा बंदूक, तरवार घेऊन, उघडपणें बंडांत सामील नाहीं ना झाला तो ?"

"छे-छे ! असं कसं करूं देईन मी त्याला ? आंतून तो त्यांना मदत करतो एवढं खरं."

"एवढंच ना ! त्याच्यावरचं पकड वॉरन्ट उठवायचं काम आतां आमचं —"

"विष्णुबावांचं वजन सरकारदरबारांत बरंच आहे असं ऐकलीं. तेच हें किटाळ दूर करूं शकतील यांत शंका नाहीं."

"तुम्ही मात्र ही सोयरीक मान्य करायला हवी हं, आबासाहेब !"

"मी आजच निश्चित शब्द देतों. मग तर झालं ?"

"मग, आता आम्ही निश्चित मनानं जाऊं ना ?"

"होय. आता काळजीच नको. रामावरील लचांड दूर झालं, तर त्याचं लग्न करायला मला कोणतीच अडचण नाहीं."

"बरं, तर मग आता तुमचा मुलगा मोकळा झालाच म्हणून समजा !"

सागुतीचं, मासळीचं खुमासदार जेवण पोटभर जेवल्यावर आंगले आणि पै घरीं जायला निघाले.

—रामरावाच्या लग्नाची धडवड काय विचारतां ! सात होड्या भरून वऱ्हाडी लोक गेले होते. सामानाची, वाजंत्र्यांची, सैपाकी-पाणक्यांची एक, मोलकरणींची एक, नोकरचाकर-गडीमाणसांची एक, भटब्राह्मणांची एक आणि घरच्या बायकामुलांची एक, अशा सात आठ होड्यांतून सगळा गांवच लोटला होता, म्हटलं तरी चालेल. नवरामुलगा आपल्या मोठ्या लव्याजम्यासह गेला होता. आमोणे गांवांत लग्न व्हायचें ठरलें होतें. रवळनाथाच्या देवळानजीक चारपांच मांडव घातले होते. जेवणासाठीं एक, देवकृत्यासाठीं एक,—वऱ्हाड्याची रहाण्याची व्यवस्था आसपासच्या वीस पंचवीस घरांतून केली होती. विष्णुबावांचें बिऱ्हाड महादेवाच्या देवळाजवळ थाटलेलें होतें.

भतग्रामाचे मोकासदार खाशे ! मग त्यांच्या लग्नाला सगळ्या गांवचे लोक आले तर त्यांत नवल कसलं ? 'फर्मासी' आल्या होत्या, त्यांची गणती नव्हती. चोवीसहि तास चौघडा वाजत होता. कलावंतिणींचे

चार ताफे आले होते. गांवाला जत्रेचें रूप आलें होतें. आमोणेचे धाडी, गुरव, फडे, भगव मुंडाशीं नांधून, शाली-बुरणूस आणि करवती-कांठी रुंद किनारीचीं धोतरें नेसून रस्त्यांतून घरच्या कर्त्या माणसांप्रमाणें फिरत होते. खाशांचें लग्न म्हणजे त्यांच्या घरचेंच लग्न! खाशे त्यांना परके नव्हते! खाशांचा त्यांना केवढा अभिमान! खाशे आहेत तिथें ते आहेत! "'खाशे' म्हणून संबोधतांना त्यांचा जीव जसा प्रफुल्लित होतो, तसाच तो मायाळू व बहुमानाचा शब्द ऐकून खाशेहि आनंदित होतात! गांवच्या देवाचा पहिला कौल देसायांना! पहिला टिळा देसायांचा! त्या गांवांत खाशांचा एवढा मान! वेताळ रवळनाथानंतर खाशेच त्यांना मोठे वाटत!

खाशांनाहि पैशांचा मोह नाहीं, नि दागिन्यांचा लोभ नाहीं! त्यांना तरवारीचा मोह—लोभ! शूरपणांतच मोठेपणा! पैसा मिळवावा, दाग-दागिने करावे ही शिकवणच घरच्या पुरुषांना नव्हती. संकटग्रस्तांना मदत करावी, आपल्या संग्रहीं असलेलें सर्व त्यांना देऊन टाकावें, हीच शिकवण त्यांना लहानपणापासून मिळे! मग त्यांच्याकडे दागदागिने कसे असतील? सरदेसायांच्या पुरुषांना तसेंच स्त्रियांनाहि दागदागिन्यांची, तमा नव्हती. 'वेरे'चा काला असो वा 'आमोणे'चा दसरा असो नाहीं तर एखादें लग्नकार्य असो, दागदागिन्यांनीं नटून सजून जायची त्यांची पद्धतच नव्हती. मोलकरणीच्या अंगावर अलंकाराचा साज चमके, पण धनिणीच्या अंगावर केवळ पाटल्या, गळसरी, कुडीं आणि नथ एवढाच शृंगार! पण त्यांचें बोलणेंचालणें, त्यांच्या मुद्रेवरील भाव, त्यांचा डौल, त्यांचा स्वाभाविक थाट यांमुळें त्या धनिणी आहेत हें चटकन समजे.

उद्या रामरावाचें लग्न, आज 'तेला'चा सोहळा. ह्या सोहळ्यांत बायकांचीच गडबड जास्त. डामडौलहि तसाच. हरतऱ्हेचे, डोळे दिपविणारे भरजरी शालू नेसून, तलम रेशमी 'चामड्या' पांघरून, गोऱ्यागोमट्या, लोण्याप्रमाणें मृदु अंगाच्या माणिकमोत्यांनीं सजलेल्या पन्नास-पाऊणशे सुवासिनी तेलासाटीं निघाल्या, तेव्हां सनई-चौघड्यानें कमाल करून सोडली. सनईच्या मंजुळ सुरांच्या साथींत चंद्रज्योति हसूं लागल्या, आणि त्यांच्या लख्ख उजेडांत, नवऱ्यामुलाकडील तरुण आणि देखण्या स्त्रिया हळूहळू पावलें टाकीत चालूं लागल्या, तेव्हां हजारो लोक त्यांच्याकडे कुतूहलानें बघतच राहिले. अंतरा अंतरावर कलावंतांचें गाणें-बजावणें होई. अशा थाटांत मंडळी नवरीच्या घरीं पोंचली.

रामरावाची आई यशोदाबाई वरपक्षाचें पुढारीपण करीत होती. तिची पन्नास वर्षांची उमर असेल, पण चेहऱ्यावर तिशीचा कोवळेपणा आणि रसरशीतपणा दिसत होता. विष्णुबाबांची बायको सुभद्राबाई या तिच्या विहीणबाई. तिनें त्यांचें स्वागत केलें. पण त्यांत त्यांना जिवंतपणा दिसला नाहीं. त्या यशोदाबाईशीं बोलल्या, पण नाउमेदीनेंच. त्यांच्या वागण्यांत शिथिलता आली आणि त्यांचा चेहरा कोमेजला.

यशोदाबाईला तें जरा खटकलें. पण तिनें तसें बाहेर दिसूं दिलें नाहीं. ती बुचकळ्यांत पडली. आपलें काय चुकलें हेंच तिला समजेना.

समारंभ आटोपल्यावर, कांहीं वेळानें यशोदाबाई एका खोलींत फराळ करीत होत्या, तेव्हां विहिणीचे शब्द तिच्या कानांवर पडले: "नांव मोठं नि लक्षण खोटं! नांव सोनूबाई नि हातीं कथलाचा वाळा! हातांत दोन दोन गोट-पाटल्या तरी असाव्यात कीं नाहीं? मनाची नाहीं तरी जनाची असावी कीं नाहीं? यांच्यापेक्षां आमच्या मोलकरणी शतपटीनं बऱ्या! घर मोटं नि पोकळ वासा! नसती मिजास काय कामाची! असल्या घरीं देऊन, आमच्या मुलीला मात्र बुडवलं ग बाई. बुडवलं!"

यशोदाबाईच्या मनांत आता लख्ख प्रकाश पडला आणि विहिणीचे ते औपरोधिक अपमानास्पद शब्द ऐकून तिच्या साऱ्या अंगाची लाही लाही झाली अगदीं! ती तेथून विजेप्रमाणें बाहेर पडली. वस्त्रालंकारांला मान देणारी ही विहीण आपल्याला मुळीच शोभत नाहीं,—ती तेवढ्या लायकीची नाहींच असें तिला वाटलें. दागदागिन्यांना डोक्यावर घेऊन नाचणारांशी आपला संबंधच नको. उभ्या जन्मांत असा त्यांचा अपमान कधीं कोणी केला नव्हता. आपल्या मोलकरणीच्या अंगावरील दागिने तिला दिसूं नयेत? माझ्याबरोबरच्या इतर स्त्रियांच्या अंगावरचे बहुमोल वस्त्रालंकार का तिला दिसले नाहींत? माणसाचें मोल दागिन्यांवरून करणारीं माणसें आपल्या कुळाला साजेशीं नाहींत!

असा विचार करीत ती वाघिणीसारखी आपल्या बिऱ्हाडीं परतली तिच्या मागोमाग सगळ्या बायका घाबऱ्याघुबऱ्या होऊन परतल्या सगळीकडे गडबडगोंधळ माजला. अग्रशाळेंत, अंगणांत नि मंडपांत सगळीकडे कुजबूज सुरू झाली. एक दुसऱ्याला विचारीत होता: "काय झालं? काय झालं?" पण खरोखरी काय घडलं तें कोणालाच समजेना.

यशोदाबाई खोलींत जाऊन दार बंद करून घेऊन बसल्या. वाद्यें आपोआप बंद झालीं. मांडवांतील जेवणाचीं पानें सुकून गेलीं. सर्वांचे चेहरे पडलेले दिसले. सर्वजण घाबरें होऊन म्हणूं लागले, "लग्नांत एक मोठं विघ्न आलं!"

त्या वेळीं आबासाहेब माचिलांत बसून गांवच्या लोकांना निमंत्रण

करण्याकरितां बाहेर गेले होते. घरच्या लग्नाचें निमंत्रण लहानथोराला, कोणालाच दिल्याशिवाय राहू नये ही त्यांची इच्छा. म्हणून त्यांना ह्या कामीं बराच विलंब लागला.

आता काय होईल, हें कुणालाच समजेना. रामराव म्हणजे आगीचा डोंब ! त्याच्या कानांवर ही गोष्ट गेली तर लग्न मोडलेंच म्हणून समजा ! पण त्याहिपेक्षा मोठी आपत्ति नवरीच्या कुटुंबावर ओढवल्याशिवाय रहाणार नाही. नको रे बाबा असें त्यांना होऊन जाईल ! सरदेसायांचें डोकें एकदां भडकलें कीं ते कोणालाहि ऐकायचे नाहीत. अगदी रुद्रावतार ! जितके भोळे तितकेच प्रखर ! अन्याय नि अपमान मुळींच न सहन करणारे ! मोठा श्रीमंत किंवा हुद्देदार असो, सापाच्या शेपटीवर पाय पडला कीं केवळ फणा वर करून तो स्वस्थ बसणार नाही, तो कडकडून चावाच घेईल ! असेच हे वंडवाले सरदेसाई ! पण वेळप्रसंगी शत्रूचेहि अपराध पोटांत घालणारे !

थोड्याच अवधींत रामरावाच्या कानांवर ही कुजबुज गेली, आणि तो तसाचि आईकडे धावत गेला. त्याची आई खोलींत अश्रू ढाळीत बसली होती. मुलाला पाहिल्याबरोबर तिनें आपले रडून रडून तांबडे झालेले डोळे पुसले. पण तिचा उतरलेला, लालबुंद चेहरा पहातांच रामरावाच्या लक्षांत सगळें कांही येऊन चुकलें आणि त्याचें मस्तक भडकलें. त्यानें भावभावेशांत आईला विचारलें, "आई ! माझी शपथ आहे तुला ! खरं खरं सांग, काय झालं तें."

मुलाचे हे शब्द कानांवर पडतांच तिला रडूं आवरणें कठीण झालें. पण तिच्या तोंडांतून शब्द बाहेर फुटेनात.

रामरावानें तिला विचारलें, "आई ! धुम्याच्या बायकोनंच ना तुझा अपमान केला ? 'नांव सोनूबाई नि हातांत कथलाचा वाळा ! हातांत दोन दोन गोटपाटल्या देखील नाहींत, पण मिजास किती मिरवतात फुकटाचे !' असंच म्हणाली ना ती ?"

हा प्रश्न ऐकून यशोदाबाईला ओक्साबोक्शीं रडूं आलें. पण त्यांनीं विवेक करून म्हटलें, "जाऊं दे रे रामा तें. आम्हां बायकांच्या बोलण्याला का कांहीं ताळतंत्र असतो ? आधी लग्नकार्य निर्विघ्नपणें होऊन जाऊं दे."

"आता ही गोष्ट अशक्य आहे, आई ! पैशाची घमेंड आली आहे नाहीं का तुझ्या विहिणीला ? ठीक आहे. त्यांचा श्रीमंतीचा भ्रम उतरवीन तरच नांवाचा रामराव ! वंडवाल्या सरदेसायांचं पाणी त्यांना आता दाखवलंच पाहिजे !"

"रामा ! तूं असाच भडकून जाऊं नकोस हं ? उद्यां तुझं लग्न, मग आज असं एकदम भडकून कसं चालेल बरं ? लग्न मोडलं तर लोक हसतील आपल्याला वेड्या ! आपल्या घराण्यांत आजपर्यंत असं कधींच घडलं नाहीं !"

"आई ! ह्या वेळीं तूं मला मुळींच अडवूं नकोस. हं. मी आता कुणाचंच ऐकणार नाहीं. आमचा अपमान करून धुमे ह्या गोव्यांत कसा रहातो तेंच बघायचं आहे मला !"

आणि रामराव तेथें क्षणभरहि न थांबतां वेगानें निघाला. त्याला कसलेंच भान राहिलें नाहीं. त्यानें कारभाऱ्याला हांक मारली. तो त्रिवार कांपत रामरावासमोर येऊन उभा राहिला. त्यानें कारभाऱ्याला म्हटलें, "त्या विष्णु धुम्याला आताच्या आतां तांबडतोब घेऊन या. येत नसेल तर बांधून आणा माझ्यासमोर !" असा हुकूम सोडून तो

आपल्या खोलीत धावला, आणि आपली तरवार घेऊन बाहेर आला.

रामरावाच्या तो अवतार पाहून सगळे लोक घाबरून गेले. आतां हा काय करणार हेंच त्यांना समजेना. धुम्याला यानें ठार मारलें नाहीं म्हणजे मिळविली! जो तो वेताळाचा नि खंडनाथाचा धावा करूं लागला. घरचीं वडील माणसें रामरावाला शांतवूं लागलीं. पण तो कोणाचेंच ऐकायला तयार नव्हता. तो बेफाम झाला होता. थोड्याच वेळांत, दहाबारा गडीमाणसें विष्णुबावांना घेऊन मांडवांत दाखल झालीं. एवढा मोठा दरबारी हुद्देदार आणि कर्तबगार पुरुष! पण तो अगदी गर्भगळितप्रमाणें झाला. आणि असें झालें नसतें तरच नवल! त्या महालांत सरदेसाई करील ती पूर्वदिशा! डोकें उडविलें तरी कोणी जाब विचारणारा नाहीं. लग्न तर मोडलेंच, पण जीव जायचा प्रसंग! विष्णुबावांनी वेळप्रसंग जाणून वेताळाला एका बकऱ्याचा नवस केला. 'नको रे बाबा असल्या मर्यादाहू माणसाशीं संबंध! असंगाशीं संग नि प्राणाशीं गांठ! हें विष आपण पचवूं नाहीं!' असा मनांतल्या मनांत विचार करीत ते मांडवाच्या खांबाला टेकून उभे राहिले. मांडवांत बघ्यांची ही गर्दी उडून गेली. जो तो देवाला नवस करूं लागला. कांहींनी तर 'रुपे' भगतासहि एका पेच्या गुळाचा नवस केला! 'देवा! आमच्या धन्याला सद्बुद्धि दे. त्यांच्या हातून भलतंसलतं घडूं देऊं नकोस!"

रामरावानें तरवार उपसली आणि तें पाहून जमलेले लोक अगदी भिऊन गेले. आता विष्णुबावांची धडगत नाहीं असें त्यांना वाटलें.

"काय विष्णुबावा! पैशाची मस्ती चढली आहे नाहीं का तुम्हाला! आमच्या जवळ दागदागिने नाहींत म्हणून आम्ही गरीब नाहीं का?"

विष्णुबावांच्या तोंडातून शब्दच फुटेना. ते नुसते थरथरत होते. आता आपण एक अक्षर बोललों कीं झालाच घात, असेंच त्यांना वाटलें असावें.

रामराव पुढें म्हणाला, "आमच्याजवळ दागदागिने नाहींत हें खरं आहे. पण या पहा आमच्या मोलकरणी! अशा पुढें या ग! आणि दाखवा या धुम्यांना तुमचे दागिने!"

हें ऐकतांच, मांडवांत एका कोपऱ्यांत जमलेल्या मोलकरणी हळूहळू पुढें आल्या. विष्णुबावांनी त्यांच्याकडे पाहिलें.

"आमच्याकडे दागिने नाहींत. अन् आम्ही ते वापरीतहि नाहीं! आमचा खरा दागिना हा!" असें ओरडून, त्यानें हातांतली तरवार परजली. तेव्हां सर्वांच्या तोंडचें पाणी पळालें. हा संतापलेला रामराव विष्णुबावांचें मस्तक धडावेगळें करणार याबद्दल त्यांना आता मुळींच शंका राहिली नाहीं.

कांहीं अतिशय भीत भीत पुढें सरसावले आणि मोठ्या धीरानें त्यांनीं रामरावाला आवरायचा प्रयत्न केला. ते त्याला समजावूं लागले, "रामबावा, असा वेडेपणा करूं नका. हा लग्नमंडप आहे, समरांगण नव्हे हें विसरूं नका—"

"तुम्ही सगळे चूप रहा. कुठं फसं वागायच तें मला चांगलं माहीत आहे!" रामरावानें त्यांना दटावलें. "विष्णुबाव! तुमच्या मंडपांतला एकूण एक दागिना या घटकेला इथं येऊं द्या पाहूं! सरदेसायांना बंडवाले म्हणतां नाहीं का तुम्ही? तें आता खरं करून दाखविणार आहें!"

विष्णुबावांभोवतीं त्यांच्या कारभाऱ्यांनी, सग्यासोयऱ्यांनीं इष्टमित्रांनीं गराडा घातला. अग्रशाळेंत, मंडपांत बायकांनीं आकांत मांडला... कारभारी धावले आणि विष्णुबावांच्या बिऱ्हाडीं जाऊन त्यांनीं सगळ्या बायकांच्या अंगांवरील दागिने ओरबडून काढले, आणि करंड्यांत भरून ते रामरावाच्या पायाशीं आणून ठेवले. त्यांना वाटलें, ते सातहि करंडे घेऊन, आता रामराव राण्यांना जाऊन मिळणार! करंडे गेले तर हरकत नाहीं, पण विष्णुबावांचा जीव तरी गमावला नाहीं म्हणजे झालें!

दागिन्यांचा चकचकाट पाहून लोकांचे डोळे दिपले.

रामराव बोलूं लागला, "पाहिलत माझ्या तरवारीचं हें सामर्थ्य, विष्णुबावा? शंभर बायकांच्या अंगांवरील दागिने एका क्षणांत माझ्या पायाजवळ येऊन पडतात! पण मी त्याचा भुकेला नाहीं! आणि म्हणूनच आमच्या घरच्या बायकांच्या अंगावर विशेष दागिने नसतात! दागदागिन्यांच्या गर्वानें माणुसकी नष्ट होते. ह्या तुमच्या वैभवावर नि दागिन्यावर हा रामराव ही अशी लाथ मारतो!"

आणि त्या सातहि करंड्यांवर खरोखरीच लाथ मारून त्यानें त्यांतील दागिने मांडवभर उधळून लावले.

"गोळा करा ते दागिने अन् परत न्या. आम्हाला त्यांची गरज नाहीं."

विष्णुबावांच्या कारभाऱ्यांनीं झपाझप दागिने जमा करून ते करंड्यांत भरले. आता रामराव शांत झाला. त्याचें भडकलेलें डोकें ठिकाणावर आलें. गरम झालेलें रक्त निवळलें. मग त्यानें मंद स्वरांत म्हटलें, "विष्णुबावा! तुम्ही वडील आहांत! सरकारीदरबारांत वागणारे! मी अडाणी आहें! माझ्याकडून तुमचा अपमान झाला असल्यास क्षमा करा. मी सरदेसाई! मला दरबारी भाषा कळत नाहीं. तरवार हीच आमच्या कुळाची अमोल जोड, एवढंच मी जाणतों. ही तरवार दुष्टांना मारते नि सुष्टांना तारते! माझ्या मोकाशाच्या कोणत्याहि गांवांत जाऊन पहा, तिथं जी शांतता नि सुरक्षितता नांदते आहे ती हिच्याच जिवावर! जनतेचं कल्याण झालेलं पाहिलं कीं आम्हाला असले हजारो करंडे मिळाल्याचं सुख लाभतं! रयतेची दुःस्थिति पाहिल्यावर असले दागिन्यांचे करंडे आमच्याकडे राहातील कसे! तुमची फसगत होऊं नये म्हणून मी तुम्हाला शेवटचं सांगतों—माझ्यासारख्या भिकेनाला जांवई करून घेऊन, आपल्या सुखांत लोळणाऱ्या मुलीला दुःखांत लोटूं नका!"

रामरावाचें हें बोलणें आणि ही आतांची कृति पाहून विष्णुबावा सद्गदित झाले. ते मनांत म्हणाले, 'हा सरदेसाई तापट नि आतताई खरा, पण मनाचा किती मोठा! किती उदार! असला वेडाच जांवई








हवा आहे मला. हेनं माझं डोकं उडवलं असतं तरी मी सांगितलं असतं कीं यांच्याशींच माझ्या मुलीचं लग्न झालं पाहिजे!'

एवढें होईपर्यंत आबासाहेब गांवच्या लोकांना निमंत्रण देऊन आपल्या बिऱ्हाडीं परतले. त्यांना पहातांच विष्णुबावांनी त्यांना कडकडून मिठी मारली आणि ते स्फुंदूं लागले. आबासाहेबांना घडलेला सर्व प्रकार बाहेर आधीच कळून चुकला होता. तेहि सद्‌गदित झाले.

विष्णुबावांनी म्हटलें, "आमची चूक झाली. आम्हाला पदरांत घ्या. माझी मुलगी मला तुमच्याच घरीं द्यायची आहे. तुमचा मोठेपणा आज मला कळून आला!"

"विष्णुबावा! असे बसून घ्या. आमचा रामा जरा संतापी आहे. त्याला केव्हा केव्हा आवरावं लागतं."

"छे! छे! तेच खरे तेजस्वी पुरुष आहेत! असाच जांवई हवा आहे मला! त्यांच्याच हातांत तरवार खरी शोभते! अनीति, अन्याय, अधर्म ह्यांना वठणीवर आणायला ही तरवारच योग्य आहे!"

"दिलेला शब्द आम्ही मोडीत नसतों. झालं तें झालं. आकाशांत ढग आले नि गेले! आता चांगला उजेड पडला. रात्रीं घडलेल्या प्रकाराबद्दल मी रामाची समजूत घालतों. तो जेवढ्या लवकर तापतो तेवढा वेड पण होतो. तरुणपणीं मीहि असाच तापट होतों! जाऊं द्या. तुम्ही निर्धास्त रहा, विष्णुबावा! अन् करंडेहि बरोबर न्या."

"रावरावांनी लाथाडलेले हे दागिने मी कसे परत नेऊं, आबासाहेब? मला पण कांहीं तरी शिक्षा झाली पाहिजे ना!" विष्णुबावांनी आर्जवून म्हटलें.

"मग हे दागिने आम्ही तरी कुठे ठेवून घेऊं बरं? इतरांच्या धनदौलतीचा आम्हाला अभिलाष नाहीं!"

हें संभाषण चाललें असतांना सूर्या गांवसाऱ्या अंगांत वेताळाचा अवसर आला. सगळे धावून गेले. त्याला नारळ ठेवून नमस्कार करीत आबासाहेबांनीं म्हटलें, "देवा वेताळा! घडूं नये तें ह्या मंडपांत घडलं! संकट निवारणारा तूं आहेस! सगळ्यांचीं मनं धुऊन शुद्ध कर आणि ह्या दागिन्यांचं काय करायचं तेंहि सांग."

वेताळाच्या अवसरानें छाती पिटून घेतली, किंचाळ्या मारल्या, तोंड्यावर पाणी पिऊन टाकलें. 'हा! हा!' करून धुपाचा धूर गिळून टाकला, आणि मग म्हटलें—

"माझा सल्ला पाहिजे ना तुम्हाला? बरं. मी माझ्या लेकरांना कसा वाऱ्यावर सोडीन? ही सगळी मजा मीच केली बरं का रे? माझ्या तरवारीचं 'बळगं' जगाला दिसायला पाहिजे होतं. झालं तें बरंच झालं. हें लग्न आता निर्विघ्नपणें पार पडेल. विष्णूची मुलगी माझ्या कुळांत आली पाहिजे. अन् तुमच्यापैकीं कोणाला ते दागिने नकोत ना रे? तुम्हाला चांगली बुद्धि सुचली. मोडकळीला आलेलं हें माझं देऊळ त्या दागिन्यांच्या रकमेनं बांधून काढा लवकर!"—आणि एवढें ओरडून सांगितल्यावर वेताळाचा अवसर अंतर्धान पावला.

अशा प्रकारें लग्नांत आलेलें विघ्न नाहींसें झालें. आणि दुसऱ्या दिवशीं मोठ्या धूमधुमीनें रामरावाचें लग्न पार पडलें. अंगावर दागिने घातल्याशिवाय सगळ्या स्त्रिया मंडपांत मिरवल्या, आणि दागदागिन्यां पेक्षांहि महत्त्वाचें असें दुसरें कांहीं तरी आहे, हें वधूपक्षाकडील लोकांना त्या दिवशीं कळून चुकलें.

●



# अजून चालला वासुदेव

होती काळोखी रात. तिला कालवून उरांत
होती वहात, यमुना बेभान पुरांत......
अंधारच बनलें पाणी, पाणी होई झंझावात
तो उन्मन पिश्यापरी होता धांवत...
विजांनीं उग्र बनलेले वादळ पिऊन...
मतवाली होऊन, यमुना घोंघावत...
डोहाडोहांतले कालिया, जणूं काढून असंख्य फणा
चालले झुंडीनें फूत्कारत, फुंफाटत,...
निळ्या पर्वतांच्या रांगांप्रमाणें ढगांच्या मागें ढग
ओणवती आणि कोसळती एकसरी
धरती उचंबळे जसा भरतीचा सागर
आकाश धांवे खालीं भेटीला...
अगणित संतत जलधारांचा विचित्र पट
विणतो, विरतो क्षणोक्षणीं, सांधतो दोघांना
नदी खळाळत हंसत आणि भोंवऱ्याची
खळी पडे प्रवाहांत, त्यांतच फिरती बुडती
घरें, दारें, ढोरें...
उंचावून शाखांचे हात केविलवाणे वाहणारे
वाहती आडदांड वृक्षराज डोळविले ज्यांनीं तुरे
अस्मानीच्या वाऱ्यांत!

विळखे सोडून धारेंत घोटाळती अजस्र वेली
बुडत्या तरंगत्या स्त्रीच्या जणूं अस्ताव्यस्त बटा
हेलावती, वेटाळती, लवथवती,
काळरात्रीं त्या, तीरीं यमुनेच्या, आला थबकला
एकजण, वीज लवे तोंच क्षण...
उमटे प्रतिबिंब तिचें काळ्याशार कांचेपरी पाण्यांत
जणूं अचानक प्रगटे आणि शिरे वेगानें नागीण पाताळांत.

थबकलेला थरारे उरांत
पाही जीव सांठवून डोळ्यांत, कोठें दूर, पैलतीर?
ऐलाशीं जुळलें कायमचें हृदय ज्याचें, कोठें पैलतीर
शोधती डोळे दूरदूर अंधार
जसें मायघरीं गेलेल्या सीतेचें हृदय अंतरलें कायमचें
रामाला, जणूं तसें लेलें कोठेंतरी पैलतीर, विरलें
विसांवलें पाण्यांत, अंधारांत...





आपल्या शाळा-कॉलेजांतं अंग चारून वसावें लागेल. खरोखर ही केवढी प्रचंड क्रान्ति आहे! ती कित्येक वर्षांपूर्वं मसरून राहिलेली आहे; म्हणून ती आधुनिकांच्या ध्यानांत येत नाहीं. पण पूर्वींच्या अमदानींत वाढलेल्या सर्वच सुशिक्षितांना या फरकाची जरूर जाणीव नेहमींच ताप देत असते.

## निराळी तरतूद नको

गृहशिक्षणाचे पायेच आज साफ ढासळलेले आहेत; आणि हा फरक गेल्या तीस-पस्तीस वर्षांत पडलेला आहे. आपल्या मुलामुलींना घरीं कांहीं शिकवावें लागतें; आपल्या आवडी-नावडी, आपलीं मतें, आपले आग्रह त्यांच्या मनावर ठसवावे लागतात, याची जाणीवच वडील माणसांना राहिलेली नाहीं. हातीं आलेली संस्कृति मुलांच्यापर्यंत आपोआपच पोहोंचेल, त्यासाठीं आपल्याला कांहीं निराळी तरतूद करावयास नको, असा त्यांचा भोळा समज होता. या संस्कृतीवरचा त्यांचा विश्वास उडाला होता, असेंहि नाहीं. पण पीठिका आणि परंपरा गृहशिक्षणानें टिकतात, या गोष्टीचें त्यांना स्मरणच राहिलें नाहीं. शाळेंतले पंतोजी आणि तिठ्यावर ओरडणारे पुढारी यांच्या हवालीं त्यांनीं आपलीं पोरें केलीं; आणि मग त्यांच्या मनाचे पिंड निराळेच बनलेले पाहून हे लोक विस्मय पावूं लागले. हीहि एक प्रचंड क्रान्तीच होय. क्रान्ति शब्दाशीं जें जें सूचित होतें तें तें चांगलेंच असतें, हा समज सर्वथा चुकीचा आहे. क्रान्ति वाईटहि असते आणि चांगलीहि असते. कांहींशा गलथानपणानें पालकांनीं ही क्रान्ति होऊं दिली.





## शिक्षणाचें हें नवें शास्त्र

शाळेकडे पहावें तर गेल्या तीस-पस्तीस वर्षांत एक मोठी चमत्कारिक क्रांति घडून आलेली आहे असें दिसेल. शुद्ध लिहिणें म्हणजे काय, हें आतां मुलांच्या गांवींहि नाहीं; आणि ज्या चुका झाल्या असतां पूर्वींच्या पिढींतील माणसांना लाज वाटत असे त्या आपल्या हातून झाल्या असतां आतां मुलांना केवळ मौज वाटते. लाजेपासून मौजेपर्यंत पडलेला फरक म्हणजेहि एक क्रान्तीच आहे. व्याकरण आणि व्युत्पत्ति यांची आवश्यकता शिक्षणाच्या नव्या नव्या कल्पना परदेशांतून आणणारांनीं केवळ वाऱ्यावर सोडून दिली; आणि यालाच ते 'शिक्षणाचें नवें शास्त्र' म्हणूं लागले. शुद्ध लेखन, व्याकरण आणि व्युत्पत्ति यांची बैठक जर उत्तम बसलेली असली तर विद्यार्थ्यांच्या मानसिक वाढीवर सुद्धां तिचा इष्ट परिणाम होतो, हें शिक्षणांतलें साधें प्रमेय तथाकथित तज्ज्ञांच्या हयगयींत सापडलें; शिक्षणांतील टापटीप, व्यवस्था, रेखीवपणा, कांटेकोरपणाची आवड साफ उडाली आणि हा सारा गुन्हा हातून झाल्यानंतर आता शिक्षण खात्यांतील लोक आश्चर्य पावत आहेत कीं, 'असें कां झालें असावें!' या चमत्कारिक क्रान्तीचे दुष्परिणाम बिचाऱ्या मुलांना आतां भोगावे लागत आहेत. मात्र क्रान्ति घडून आली आहे हें निःसंशय खरें आहे.

आणखीहि एक मौजेची क्रान्ति शाळेच्या आवारांत घडून येत आहे. ती कोणाला पसंत पडते; आणि कोणाला ती नुकसानीची वाटते; पण ती घडली आहे किंवा घडत आहे ही गोष्ट नाकारतां येणार नाहीं. इंग्रजी वर्तमानपत्रांतला एखादा परिच्छेद वाचून दाखवा म्हणून बी. ए. च्या वर्गांतील मुलाला जरी सांगितलें तरी त्याचें तें वाचन ऐकून लवकरच

'बस्स करा' असें म्हणण्याची पाळी येते. ही होत असलेली क्रान्ति. बरी कीं वाईट याचा निकाल पुढं लागावयाचा आहे; पण एवढें मात्र खरें कीं, विद्वानांनीं आणि तज्ज्ञांनीं एका बाजूनें आणि अडाणी लोकांनीं दुसऱ्या बाजूनें जसा शुद्धलेखनाचा ढोंग साफ उकरून टाकला तशीच इंग्रजी भाषेची महति एका बाजूनें देशाभिमानी लोकांनीं आणि दुसऱ्या बाजूनें अभ्यासाची उपेक्षा करावयास शिकवलेल्या विद्यार्थ्यांनीं साफ गारद करून टाकली आहे. ही क्रान्ति तर पाहतां पाहतां झालेली आहे. अशा प्रकारच्या क्रान्त्या झपाझप होत असतांना, आणि पुढें येणाऱ्या प्रचंड क्रान्तीची वाट आगाऊच मळली जात असतांना समाज त्या क्रान्तीला अनुकूल नाहीं, असें म्हणण्याचें धाडस कोणाच्यानें तरी होईल काय ?

### पोशाखांतील तोटकेपणा

आणखी पहा. पोशाखाच्या बाबतींत फॅशन आणि दारिद्र्य यांची गांठ पडलेली पाहून फार चमत्कार वाटतो. कपडा अंगावर जितका कमी घालतां येईल तितका चांगला ही फॅशन आतां थोरामोठ्यांनीं सुद्धां रूढ केलेली आहे. ज्या गरिबांना पैरणीशिवाय अंगांत दुसरें कांहींच घालतां येत नाहीं, त्यांची आणि या नव्या फॅशनवाल्यांची भर रस्त्यांतच गांठ पडलेली आहे! आणि त्यामुळें कदाचित् गरीबाच्या मनाचें दुःख कमीहि होऊं लागलें असेल. शर्ट, खमिस, जाकीट, कोट असलीं कपड्याचीं ठाणेंच्या ठाणें अंगावर वागवण्याच्या अव्वल इंग्रजींत पडलेल्या फॅशनमधून आपण बाहेर पडलों याकडे पाहून मात्र खरोखर हायसें वाटतें.

पण हा पोशाखांतील तोटकेपणा स्त्रियांनीं जास्तच पुढें नेलेला दिसतो! या कामीं पुरुषांनीं स्त्रियांची फसवणूक चालवलेली आहे आणि स्त्रियांनीं ती भोळेपणानें पत्करलेली असली पाहिजे असें मला केव्हां केव्हां वाटतें. स्त्रियांच्या फॅशन्स पुरुष ठरवीत असावे, असा वहीम येतो. स्त्रियांच्या अंगांचें आणि अवयवांचें दर्शन आपल्या लोकांना आकर्षक कसें वाटेल याचीच चिंता पुरुषांना पडत असावी आणि म्हणून तोटका, अधिक तोटका, अतिशय तोटका पोशाख स्त्रियांनीं कसा करावा याची फॅशन पुरुषांनींच बनवलेली असावी. आपल्या अंगोपांगांचें पुरुषांनीं खेळणें केलेलें पाहून सभ्य आणि स्वाभिमानी स्त्रियांना खरोखर रागच यावयास हवा. परंतु, स्वातंत्र्य आणि स्पर्धा यांच्या जाणीवेनें आत्मनिष्ठ बनलेल्या स्त्रिया पुरुषांच्या या चाळ्यांकडे लक्षच देत नसल्या पाहिजेत. तो त्यांचा जोस थोडासा कमी झाला, म्हणजे पुरुषांचें हें कसब त्या खास ओळखतील; आणि आपली फसगत झाल्याची जाणीव बोचूं लागून आपल्याच शरीराचें प्रदर्शन करण्याची फॅशन त्या सोडून देतील. नटी हें ध्येय बनवण्यांत आलें आहे. मागल्या पिढींतील स्त्रियांना बालगंधर्वांनीं वेडें केलें होतें. सध्याच्या पिढींतील स्त्रियांना सिनेमा नटींनीं वेडें केलें आहे. आणि तीन पिढ्यांत चालू असलेली ही क्रान्ति आतां चांगलीच उज्ज्वल बनलेली आहे.

### त्यांनीं बरोबर ओळखलें

आपण तोंडानें युरोपियन लोकांच्या धिक्काराची भाषा बोलतों, पण हा धिक्कार केवळ तोंडदेखला असतो, हें शाळेंतील मुलींच्या पोशाखांत पडत चाललेल्या फरकामें चांगलें

ध्यानांत येतें. पोशाखाचा तोटकेपणा, 'स्मार्ट-नेस'च्या नांवाखालीं शाळेंतील विद्यार्थिनींत इतका शिरला आहे कीं, शिष्ट लोकांना तें प्रदर्शन नकोसें वाटावें; आणि टारगट लोकांना मनापासून आवडावें. बडा क्रान्तिकारक म्हणून केमालपाशाचें स्तवन सर्वत्र लोक करीत असतात; पण केमालपाशानें स्त्रियांच्या पोशाखाचा हा तोटकेपणा आणि नखरेलपणा आपल्या शिक्षणसंस्थांत सक्तीनें बंद केला होता, याकडे त्यांचें लक्षच जात नाहीं. मास्तरिणींची वागणूक समाजांतील शिष्ट स्त्रियांच्याप्रमाणें असली पाहिजे, असा दंडकच त्यानें घातलेला होता. बरोबर हीच गोष्ट मुलिसोनी यानें इटलींतहि केली होती. मुलींच्या आणि यौवनांत आलेल्या स्त्रियांच्या असल्या प्रदर्शनानें शिष्ट प्रजा कांहींशी भांबावण्याचा आणि मूळची थिल्लर प्रजा गुन्हेगार होण्याचा संभव असतो; हें त्यांनीं बरोबर ओळखलें होतें. आमच्या येथें कोणीही अडपता दडपता नाहीं; आणि सदाचाराचे नियन्ते कोणाला म्हणावें याचा भ्रमच पडलेला आहे. प्रत्यक्ष नुकसानें जेव्हां होऊं लागतील, आक्रमण आणि गुन्हेगारी हीं जेव्हां वाढूं लागतील, तेव्हांच माणसें शुद्धीवर येतील. दरम्यान क्रांतीची ही थयथय मुकाट्यानें बघणेंच प्राप्त आहे.

## कुलीन स्त्रियांची मागणी

स्त्रियांनीं नाटकांत कामें करावीं कीं नाहीं, हा प्रश्न निकालांत निघून, माझ्याच आठवणीप्रमाणें सुमारें साठ वर्षें तरी झालीं असावीं. सखुबाई नांवाची स्त्री रंगभूमीवर आलेली मीं पंचावन्न वर्षांपूर्वी पाहिलेली होती. स्त्री-मिश्रित संगीत-कंपनी ही तर सर्वांच्याच परिचयाची झालेली होती. तेव्हां स्त्रियांनीं नाटकांत कामें करावीं कीं नाहीं, या प्रश्नाला नवी गति मिळाली ती कुलीन स्त्रियांनीं नाटकांत कामें करावीं कीं नाहीं, या अर्थानें होय. या प्रश्नाचा वाद पुणें शहरांत चांगलाच गाजला. त्या वेळीं एका वक्त्यानें सांगितलें कीं, "कुलीन स्त्रिया नाटकांत हव्या, ही मागणी केव्हांहि संपण्यासारखी नाहीं. कारण कुलीन स्त्रिया धंद्यासाठीं नाटकांत गेल्या म्हणजे त्यांचें कुलीनत्व संपलेलें दिसेल; आणि नव्या कुलीन स्त्रियांची मागणी शिल्लकच राहील."

नाटकांत आणि सिनेमांत धंद्यासाठीं शिरलेल्या बहुतेक साऱ्या स्त्रिया कुलीन राहूं शकत नाहींत, ही गोष्ट पुन्हा पुन्हा सिद्ध झालेली आहे; पण आपापलीं घरें मात्र संभाळून धरून दुसऱ्या कुणाच्या तरी स्त्रिया या कामीं खर्ची पडलेल्या मौजेनें पाहण्याचा सामाजिक दुंगलबाजपणा इतका वाढला आहे कीं, अशा स्त्रियांची तोंड फाटेपर्यंत स्तुति करण्याचा पायंडा अनेक लेखकांनीं पाडलेला आहे. 'यांनीं इकडे पदार्पण केलें; आणि त्यांनीं तिकडे पदार्पण केलें,' अशा कौतुकाच्या घोषणा करणारे गाफील लेखक, पदार्पण केलेल्या या स्त्रियांपैकीं बहुतेकांचें पुढें काय झालें, हें समाजास सांगावयास मात्र नाकबूल असतात. आपल्या मुलींना सिनेमांतील कामाची चटक लावलेल्या सध्याच्या दक्षिण सातार्‍यांतील एका शहराच्या अतिशय प्रतिष्ठित पालकानें त्यांचे सामाजिक थेर पाहून सार्वजनिक हितासाठीं जो भयंकर आक्रोश केला, तो समाजाच्या कानीं घालावयास मात्र तें कौतुक करणारे लेखक कधींहि तयार झालेले नाहींत. कांहीं कांहीं प्रतिष्ठितांच्या मुली आणि बायका या व्यवसायाच्या फशांत सांपडून कसल्या तरी कर्दमांत राहूं लागल्या आहेत, हें लोकांना दिसत नाहीं असें नाहीं. कसलेंहि सामाजिक शासन आपल्या हातीं राहिलेलें नाहीं. त्यामुळें कसलाहि दुराचार उघडपणें करावा आणि संभावितांच्या सहवासांत खुशाल वावरावें, हा पायंडा रूढ झालेला दिसतो. खरोखर समाजांत क्रान्ति घडत नाहीं, असें आतां कोणाच्यानें म्हणवेल काय ?

## स्त्रियांचें स्पर्धायुग

आतां पडत चाललेला हा फंदाचा फरक खुद्द स्त्रियांना कळत नाहीं असें नाहीं; पण सध्यां स्त्रियांचें स्पर्धायुग सुरू आहे. 'जी जी गोष्ट पुरुषांना करतां येते, ती ती आम्हांलाहि करतां येते,' हें सिद्ध करण्याचा आवेश स्त्रियांच्या ठिकाणीं चहूंकडे दिसून येतो. हा आवेश माझ्या मतानें अत्यंत स्पृहणीय असाच आहे. वाङ्मय, शास्त्र, धनोत्पादन, सामाजिक आणि राजकीय चळवळी, शिक्षण या सर्व क्षेत्रांत स्त्रिया अहमहमिकेनें पुढें येत आहेत, हें पाहून खरोखर आनंद होतो. समाजांतील मनोबुद्धीच्या सामर्थ्याचा खजिना या स्पर्धेमुळें दुपटीनें समृद्ध होत आहे, व समाज अशा रीतीनें श्रीमंत होत आहे. परंतु, हें स्पर्धेचें क्षेत्र कोठें नासतें आणि समाजाच्या स्वास्थ्याला कोठें धक्का पोहोंचविते याकडे सुशिक्षित स्त्रियांचेंहि लक्ष जात नाहीं आणि पुरुषांचें तर नाहींच नाहीं. हीसुद्धां निःसंशय क्रान्तीच होय

## अंगासरसाच आविष्कार

घडत असलेल्या क्रान्तीचें आणखी एक लक्षण हें आहे कीं, माणसांना कलेचा ध्यास अतीव लागलेला आहे. पूर्वीं लेखनांत, वक्तृत्वांत, पोशाखांत आणि रंगभूमीवर कला नव्हती असें नाहीं. तात्यासाहेब केळकर, आपटे, कोल्हटकर आणि गडकरी हे नाट्यांत कला दाखवीत; शिवरामपंत परांजपे वक्तृत्वांत दाखवीत; छापखाने, करंदीकर आणि खापर्डे हे पोशाखांत दाखवीत; पण या सर्व लोकांच्या कलेचा आविष्कार अंगासरसाच असे. आपण या क्रान्तीच्या काळांत याच्या फार पुढें गेलेले आहों. लेखनांतील कला पुष्कळदां तात्पर्याला गुदमरवून टाकते. वक्तृत्वांत मधून मधून शेलक्या ठिकाणीं मुद्दामच गप्प बसून वक्ते हीन शृंगाराची सूचना करतात. पोशाखांत तरुण पुरुषांनीं बायकांचा कब्जा पत्करलेला आहे आणि चिटाचीं रंगीबेरंगी एकेरी झबलीं ते वापरूं लागले आहेत. रंगभूमीवर नाचाशिवाय कोणाला चैन पडेनासें झालें आहे. इतके सारे प्रकार झाले असतांना सुद्धां देशांत क्रान्ति झाली नाहीं, असें कोणाच्यानें म्हणवेल काय? समाजांत मिसळण्याची आणि त्याच्या मनाला सुख उत्पन्न व्हावें म्हणून, चौकाचौकांत उभें राहून आणि पूर्वींच्या कलावंतिणींच्या कलेचा आश्रय करून चांगल्या शिष्ट लोकांच्या मुली-बाळी आपल्या पायांतील घुंगुरांनीं नर्तनकलेचें प्रदर्शन करीत आहेत; आणि तमाशा चालू असतां 'हालीव' म्हणण्यांत ज्यांना रसिकतेची परमावधि वाटते त्यांनीं शिट्या ठोकल्या म्हणजे आपल्या कलेचें सार्थक झालें असें मानीत आहेत. क्रांतीच्या पायांतील नुपुरांचा हा झणत्कार लोकांना अजूनहि पुरेसा वाटत नाहीं काय?

या काळांत पूर्वीं कधीं कोणाच्या ध्यानांत आला नाहीं, असा एक अभिनव प्रचार प्रतिभाशाली लेखकांनीं चालू केला आहे. प्रत्येक कलेच्या दुर्गुणाला, चहाडीला, चोरीला, शिंदळकीला आणि मद्यपानाला, त्याचें त्याचें तत्त्वज्ञान आहे, असें आपले लेखक लोक शोधपूर्वक सांगत आहेत; आणि तत्त्वज्ञानाच्या अभावीं जे हे प्रकार पूर्वीं शिष्ट लोकांपासून लाजून दूर उभे रहात ते आतां, तत्त्वज्ञानाचा पुरवठा झाल्यामुळें माना उंच करून समाजाच्या संभावित थरांतसुद्धां बेशक वावरत आहेत; आणि कौतुकाचा आहेरहि पावत आहेत. कुणाला चांगलें म्हणावयाचें आणि कुणाला वाईट म्हणावयाचें, कुणाला दानावयाचें आणि कुणाला निंदावयाचें याचे न्यायच बदललेले आहेत. असें जर झालें आहे तर, समाजांत क्रान्ति झाली नाहीं; असें म्हणण्याचें धाडस कोणी करील काय?

### अंड्या-कोंबड्यांचा प्रचार

शाकाहारी समाजाला आपल्या आचाराची जणुं कांहीं भीड वाटूं लागली आहे? दुसराच एकादा मान्य आचार चालू असतांना आपण कुग्रामबुद्धि पत्करून एक पुराणा आचार चालू ठेवला आहे कीं काय, अशी आत्मावरोपाची भावना चांगले शहाणेसुरते लोक तरुण लोकांत उत्पन्न करीत आहेत; 'मासे खा, मासे' म्हणून कोणी मासिकांतून ओरडत आहेत आणि अंड्या-कोंबड्यांचा प्रचार चांगले संभावित डॉक्टर आपल्या लेखनांत करीत आहेत. पण रूढ असलेल्या मान्य सदाचाराचा प्रश्न आग्रहानें समाजापुढें मांडण्याचें आत्मसमर्थनपर साहस कोणाच्यानें होत नाहीं. विचार करकरून आणि भावनांचे सूक्ष्म पापुद्रे काढून पाश्चात्य देशांतील निदान दीडशें मोठमोठ्या लोकांनीं मांसाशनाचा त्याग केला व शाकाहार पत्करला या गोष्टीकडे शहाणेसुरते लोक मुद्दामच दुर्लक्ष करीत आहेत. स्वतः उच्छृंखल बनलेले आणि जिभेच्या लालचीला चटावलेले राजकीय पुढारी आणि लेखक आपण मोठे उदारबुद्धीचे आहोंत असें दाखविण्यासाठीं तरुण लोकांपुढें अभक्षभक्षणाचे प्रयोग करीत आहेत. इतकें झाल्यावर क्रान्ति घरांत येऊन ठेपली नाहीं, असें म्हणण्याची कोणाची छाती आहे? या क्रान्तीचें धाष्टर्य पहा! ही करणारे कांहीं कांहीं लोक महात्मा गांधींचें अनुयायित्व पत्करलेले असतात; आणि त्यांच्या जीवनक्रमाची स्तुति घसा फुटेपर्यंत करीत असतात. ज्या उदारमनस्क महापुरुषानें आचार पावित्र्याचा धडा प्राचीन मुनींना सुद्धां घालून द्यावा, आणि आचारांतच काय पण विचारांतहि हिंसेचा मागमूस राहूं नये, हा घोष ज्यानें जन्मभर केला, त्याचें प्रतिपादन देशांत चालू असतांना ही आहारविषयक क्रान्ति शाकाहारी समाजांत मान वर करून शिरत आहे. असो.

### आणि तरीहि...

सामाजिक क्रान्ति आणि आर्थिक क्रांती या ढोबळ नांवांनीं ओळखीच्या झालेल्या क्रान्ति यथासंभव आणि यथाकाल होतीलच होतील. पण त्यांच्या अवतारांतील वारें चोरपावलांनीं प्रवेश करणाऱ्या किती तरी बारीक बारीक क्रान्तींनीं काढून घेतलेलें आहे; अगदीं तरीहि आपण अजून सनातनीच आहोंत आणि समाजहितकारक बदलास बिलकुल तयार नाहीं, ही कर्कश तक्रार पुढारी व लेखक करीतच आहेत!

अनुक्रमणिका

तो अपूर्व अनुभव घेण्यासाठीं निघालेली

# निम्मी

—प्रभाकर तामणे



“ ...विभावरी शिरूरकर, कृष्णाबाई मोटे, इंदिरा संत, शांता शेळके, शशिकला आळंदकर आणि...आणि कु.. निमा सोहनी !”

—प्रा. नाटेकरांचा तास चालू होता, आण निमाच्या अन् मालीच्या वहीवरच्या गप्पा चालू होत्या. तास चालू असतांना ‘सर’च्या लक्षांत न येतां वाटेल त्या गप्पा मारण्याचा सोपा मार्ग म्हणजे ‘सर’कडे गंभीरपणें पहाणें आणि एकीकडे शेजारच्या मैत्रिणीला वाचण्यासाठीं वहीवर हवा तो मजकूर लिहिणें ! वर्ग चालू असतांना ह्या पद्धतीनं गप्पा मारण्याची निमाला संवय होती. माली तिची जिवलग मैत्रीण होती. त्यामुळें अर्थात् तिलाहि ती संवय होती. आतांहि त्या दोघींचा हाच कार्यक्रम चालू होता. .

—निमानं स्वतःच्या वहीवर लिहिलेली लेखिकांचीं नांवं मालीनं वाचलीं. तिला हसूं आलं.

निमाच्या लक्षांत तें येतांच तिनं वहीवर प्रश्न केला, “माले, हसतेस काय अशी गाढवासारखी ? एक दिवस मी खरोखरच इतकी प्रसिद्ध लेखिका होणार आहें !”

“कॉलेजच्या फत्तूस-मासिकांत गोष्ट

त्यांच्यासाठीं आपण कांहीं तरी करायला हवं असं तिला अत्यंत तीव्रतेनं वाटायला लागलं. पण काय करणार ह्याची अस्पष्टशीसुद्धां कल्पना तिच्या मनाला नव्हती. खुर्चीवरून उठून ती प्रा. नाटेकरांच्या जवळ आली. अन् त्यांच्या गळ्यांत हात टाकून ती म्हणाली, "Kiss me, and you will be happy!"

म्हणून फार चढून गेली आहेस तूं !" मालीनं थट्टेचा शेरा मारला.

"तूं ढिट आहेस !"—निमानं तिला वजावलं.

"तूं आचरट आहेस !"—मालीनं प्रत्युत्तर दिलं.

—इतक्यांत प्रा. नाटेकरांनीं कसला तरी विनोद केल्यानं वर्गांत हंसण्याची लाट उसळली. वर्गांत लक्ष नसल्यानें मुलं कां हंसलीं हें निमाला नि मालीला समजलं नाहीं. तरी पण प्राध्यापकांकडे पाहून त्या दोघीजणी हंसल्या: प्रा. नाटेकरांनीं केलेल्या विनोदाला आपण हंसलं म्हणजे त्यांना बरं वाटतं हें निमाला माहीत होतं. आणि शिवाय असं हंसल्यानें आपलं वर्गांत लक्ष आहे हेंहि सिद्ध होतं, ह्याची मालीला जाणीव होती.

"ए, त्या मोरू जोशीचा बुश्शर्ट पहा किती आंखूड आहे ! अगदीं पोलकं घातल्यासारखं दिसतं, नाहीं ?" पुन्हा 'लेखी गप्पा' सुरू झाल्या.

"माले, त्या बिचाऱ्या स्कॉलरची अशी चेष्टा करणं चांगलं नाहीं !"

"तुला राग कां आला ? 'कांहीं' आहे वाटतं !"—मालीनं सूचक प्रश्न केला.

"फाजील आहेस ! तुला सगळीकडे प्रेमच दिसतंय !"

"तो वाळ्या खारकर बघ आपल्याकडे बघतोय् !"

"बघूं दे मेल्याला ! त्याच्या डोळ्यांचं पारणं फिटूं दे !"

"त्याचे कान पाहिलेस कां ? कुड्या घालायला अगदीं योग्य आहेत, नाहीं ?"

—हें वाक्य वाचून निमाला खूप हसूं आलं. त्या वाक्यांतल्या विनोदी कल्पनेनं दोघींनाहि हसूं आवरेना. मालीनं तोंडाला रुमाल लावला, पण 'सर' चं तिच्याकडे लक्ष असल्याच्या जाणिवेनं तिला आपलं हसणं लपवणं अधिकच कठीण व्हायला लागलं. निमाहि खालीं मान घालून खदखदून हंसत होती.

निमे, हंसूं आवर ! सरचं आपल्याकडे लक्ष आहे !"—मालीनं सूचना दिली.

अखेर निर्वाणीचा उपाय म्हणून निमानं आपली जीभ दातांत दाबून धरली, तेव्हां कुठें तिला हसूं आवरतां आलं. इतक्यांत तास संपल्याची घंटा झाली. प्रा. नाटेकर वर्गाच्या बाहेर पडले.

"सुटल्यें बाई एकदांची !"—मनमोकळेपणानं हसत निमा उद्गारली.

..कॉलेज सुटल्यावर निमा घराच्या दिशेनं चालायला लागली. मालीचं घर जवळच असल्यानें ती केव्हांच घरीं गेली होती. निमाच्या मागून कॉलेजच्या विद्यार्थ्यांचा एक घोळका येत होता. त्यांतला एक विद्यार्थी तिला उद्देशून म्हणाला, "निम्मी ऽ चालली ऽ !"

"—प्रेमनाथकडे ऽ !"—दुसऱ्यानं त्याचं वाक्य पुरं केलं.

अन् मग सगळेजण 'कोरस' मध्यें हसले. सातमजली हसले ! के. एन्. सिंगप्रमाणें हसले ! हाः हाः हाः !

निमानं मागें वळून पाहिलं. ती कॉलेजांत आली त्या दिवसापासूनच 'निम्मी' हें टोपणनांव विद्यार्थ्यांनीं तिला बहाल केलं होतं. तिच्या नाकाची ठेवण 'निम्मी' नटीसारखी होती, अन् डोळेहि अगदीं 'निम्मी'-सारखेच होते. निमाला ह्याची जाणीव होती. पण तिला ह्या टोपणनांवाचा राग येत नव्हता. कारण आजकालच्या एका अत्यंत लोकप्रिय नटीचं नांव तिला मिळालं होतं.

तरी पण तिनं रागानं मागें पाहिलं. हलकट मेले !—पण तिच्या मनांत नसलेला राग तिच्या चेहऱ्यावर उमटला नाहीं. मग ती स्वतःवरच चिडली, अन् झपाझप पावलं टाकीत पुढें गेली.

थोड्या वेळानं प्रा. नाटेकर तिच्या जवळून सायकलवरून गेले. प्रा. नाटेकर सर्वांत तरुण प्रोफेसर होते. तिचं त्यांच्याकडे जाणं-येणं होतं. अन् खरं सांगायचं म्हणजे ते तिला आवडत होते.

निमाचं त्यांच्याकडे लक्ष जातांच तिनं अनाहूतपणें हांक मारली, "सऽर !"

—सायकलवरून न उतरतां प्रा. नाटेकरांनीं तसाच एक पाय टेकला. निमाला त्यांची ही पोझ फार आवडली.

"सर, मला तुम्हांला थोडंसं भेटायचं आहे !"—जवळ जाऊन ती म्हणाली.

"भेटा कीं ! आतां सबंध दिवस मी मोकळाच आहें !" ते म्हणाले.

"मग केव्हां येऊं तुमच्याकडे ? संध्याकाळीं चालेल ?"—तिनं विचारलं.

"चालेल, चालेल ! संध्याकाळीं मी घरींच आहें !"

प्रा. नाटेकर पुढें गेले. निमाच्या अत्यंत संवेदनाक्षम मनावर आपल्या व्यक्तित्वाचा ठसा उमटवून गेले. निमा घरीं आली, तेव्हां तिचं मन गुणगुणत होतं, 'आज संध्याकाळीं....संध्याकाळीं....!'

पण दुपारपासूनच पाऊस पडायला सुरुवात झाली होती. समोरच्या बिल्डिंगमधल्या आपटीणबाईंकडे आई बसायला गेली होती. घरांत कुणीच नव्हतं. संध्याकाळचे पांच वाजले होते. पाऊस थांबण्याची वाट पहात कपडे बदलून निमा गॅलरींत उभी होती.

गॅलरीच्या कठड्याला टेकून उभं रहाण्याचा आतां तिला कंटाळा आला होता. किती वेळ असं वेड्यासारखं उभं रहायचं ? कंटाळून निमा घरांत जायला निघाली. जातां जातां तिनं सहज जिन्याकडे पाहिलं. त्यांच्या शेजारच्या ब्लॉकमधला राजा कोल्हटकर ऑफिसमधून परत आला होता. त्याला पाहिल्याबरोबर तिचीं पावलं घोटाळलीं. घरांत जाण्याचा बेत तिनं स्थगित केला. ती तशीच तिथें उभी राहिली.

राजाचे कपडे पावसानं ओले झाले होते. रस्त्यावरच्या पाण्यानें पँट भिजूं नये म्हणून 'आवारा' मधल्या राज कपूरप्रमाणें त्यानें घडी घालून पँट आंखूड केली होती. रुमालानें चेहरा पुसत तो आपल्या ब्लॉककडे जायला लागला. निमाला पाहून तो हसला.

"कुठं बाहेर जायचा बेत आहे वाटतं ?"—त्यानं विचारलं.

"हूं. 'सर' कडे जायचं होतं !"

"मग? गेली नाहींस ?"

"पावसामुळें शूटिंग 'कॅन्सल्' केलाय् !"

बोलतां बोलतां निमा राजाच्या खोलींत आली होती. "बसणार आहेस का उभीच रहाणार आहेस ?" राजानं विचारलं.

"इतका वेळ घरांत बसूनच होतें ! आतां जरा वेळ उभीच रहाणार आहें मी !"

टॉवेलनं राजा ओले केस पुसूं लागला.

कांहीं वेळानंतर ती एकदम म्हणाली, "तुला पाहिल्यावर 'आवारा'-तल्या राजकपूरची आठवण झालीय् मला !"

राजा हंसला.

"राजकपूरचे आम्हां तरुणांवर अनंत उपकार आहेत !" तो हंसत म्हणाला, "आवारा सिनेमा निघण्यापूर्वी आम्हीं अशी आंखूड पँट घातली तर लोक आम्हांला 'टांगेवाला' म्हणायचे ! आतां 'राजकपूर' म्हणतात !"

निमाहि हंसली. हंसतां हंसतां तिनं खिडकींतून बाहेर पाहिलं. पाऊस थांबेचा होता. तिनं पायांत चपला सरकवल्या.

"निघालीस ?" त्यानं विचारलं.

"हं. आतां पाऊस थांबलाय! सरकडे जाऊन येतें !"

"निमा !—"

"काय ?"

"कांहीं नाहीं ! जा तूं !" तो गंभीरपणें म्हणाला.

—प्रा. नाटेकरांकडचं तिचं जाणं-येणं राजाला पसंत नव्हतं. आणि निमाला हें माहीत होतं. राजा निमाच्या लहानपणापासूनचा मित्र होता. पण याचा अर्थ असा नाहीं कीं निमावर त्याची सत्ता होती. निमा स्वतंत्र होती. कुणाकडे जायचं हा तिचा खाजगी प्रश्न होता. हें सगळं तत्त्वज्ञान खरं होतं ! तरीहि राजाचं मन दुखवणं तिच्या जिवावर आलं. राजा तिला आवडत होता. इतकेंच नव्हे तर त्याच्याशीं लग्न करण्याचा विचारसुद्धां कधींकधीं तिच्या मनांत येत असे.

अलीकडे बऱ्याच वेळां स्वतःच्या लग्नाबद्दलचे विचार तिच्या मनांत येत. कुणाला तरी आपलं म्हणावं, कुणावर तरी प्रेम करावं, उत्कट प्रीति करावी, प्रीतीच्या उन्मादांत धुंद होऊन जगाला विसरावं, स्वतःला विसरावं, असले कांहीं तरी विचित्र विचार आजकाल तिच्या मनांत येत. आणखीहि कांहीं वाटे. पण हे सारे विचार, ह्या भावना, ह्यांचं अस्तित्व पूर्वी क्षणभरच टिके. कारण अशा विचारांना ती आपल्या मनांत फारसा थारा देत नसे. पण हल्लीं काय झालं होतं कुणास ठाऊक ? असले विचार पुन्हा पुन्हा तिच्या मनांत येत. अन् मग कधींकधीं ती एखाद्या अमूर्त प्रियकराच्या चिंतनांत रमून जात असे. प्रेमावांचून आपल्या ह्या तारुण्याचा एकेक क्षण वायां जात आहे, असं तिला वाटायचं. कसली तरी अनामिक हुरहुर तिच्या हृदयाला व्याकुळ करायची अन् जीवनांतला रिकामेपणा तिला अधिकच तीव्रतेनं जाणवायचा.

आणि तिची अस्वस्थता वाढली कीं ती राजाकडे जाऊन बसायची. राजा घरीं नसला तर नाटेकरांकडे जायची. त्यांच्याशीं थोडा वेळ गप्पा मारल्यानंतर तिच्या मनाचा गेलेला तोल सावरला जात असे. ह्या सगळ्या प्रकाराचा अर्थ एकच होता. पुरुषाच्या सहवासाची विलक्षण तहान तिच्या मनाला लागली होती. सगळ्यांशीं चांगल्या रीतीनं वागावं, कुणाचं मन दुखवूं नये, सगळ्यावर प्रेम करावं, आपण सुखी व्हावं, दुसऱ्याला सुखी करावं, साऱ्या जगाला सुखी करावं, अशी कांहीं तरी अस्पष्ट ओढ तिच्या मनाला लागली होती. तिच्या मनाची स्थितीहि आजकाल फारच नाजुक बनली होती. भावनांना कोवळे पंख फुटले होते. आणि मन पाकोळीसारखं हलकं बनलं होतं.

—जड पावलांनीं निमा राजाच्या खोलीबाहेर आली. आई नुकतीच बाहेरून परत आली होती. आईला सांगून निमा घराबाहेर पडली. जिना उतरून खालीं आल्यानंतर तिनं सहज वरतीं पाहिलं. गॅलरींत राजा उभा होता. त्याच्या नजरेला नजर भिडवण्याचा धीर तिला झाला नाहीं. एखाद्या अपराध्याप्रमाणें खालीं मान घालून ती चालायला लागली. तिचं मन केव्हांच प्रा. नाटेकरांच्या घरीं जाऊन पोहोंचलं होतं. अशी किती वेळ ती चालली कुणास ठाऊक ! पण ती भानावर आली तेव्हां मन्या वैद्य रस्त्याच्या दुसऱ्या बाजूवर उभा राहून तिला हांक मारीत होता.

—मन्या तिचा आतेभाऊ होता. तो कमर्शिअल आर्टिस्ट होता. इंटर आर्ट्सला नापास झाल्यानें त्यानें तात्पुरतं कॉलेज सोडलं होतं. दिलीप-कुमारप्रमाणें त्यानं केसांचा झुबका ठेवला होता. त्याचा चेहरा हंसरा होता, आकर्षक होता. डोळे किंचित् बारीक होते, पण मिस्किल होते. आणि खेळकरपणा त्याच्या रक्तांतून वहात होता. ह्याच खेळकरपणानं त्यानं निमाचं हृदय जिंकलं होतं. मन्या स्वतःविषयीं फारच थोडं बोलायचा. त्याचं सारं बोलणं निमाविषयींच असे. अन् म्हणूनच निमाला तो आवडत होता. त्याचा सहवास आवडत होता.

आताहि त्याचा आवाज ऐकून निमाच्या मनांत आनंदाची एक सूक्ष्म लहर उमटली. मग जवळ जाऊन निमानं त्याला विचारलं, "कुठें चाललास रे ?"

मन्या हंसला. कित्येक वेळां उगीचच हंसण्याची त्याला संवय होती.










पण त्याला तें शोभून दिसत असे.

"चाललों असाच कुठं तरी! आपल्याला काय, घर ना दार! कुठेंहि भटकावं, कोठेंहि करावं, असेच आम्ही कलंदर!" तो म्हणाला.

"हे कलंदर लोकच महाबिलंदर असतात!" निमा हसून म्हणाली, 'मजा असते त्यांची! त्यांना जाब विचारायला कुणी नसतं! पण अशी 'आवारा' गिरी किती दिवस करणार आहेस तूं? लग्न करायचा विचार आहे कीं नाहीं?"

"वा! न करायला काय झालं? तूं म्हणशील तेव्हां लग्न करायची तयारी आहे माझी! म्हणजे तुझ्याशीं नाहीं हं! तूं सांगशील तिच्याशीं!" तो गडबडीनें म्हणाला.

त्याचं हें बोलणं ऐकून निमा किंचित् अस्वस्थ झाली. स्वतःचं तिच्यावरचं प्रेम बेमालूम लपवण्याची कला त्याला चांगली साध्य झाली होती. पुरुष सगळे असेच! स्त्रियांच्या हृदयाचा निश्चित पत्ता लागल्याशिवाय स्वतःचं प्रेम उघडपणें कबूल करायचे नाहींत! मन्या अखेरीस आपल्या जातीवरच गेला होता!

पुढें काय बोलावं हें तिला चटकन् सुचेना.

मग ती म्हणाली, "असं असेल तर कांहीं दिवस थांब! म्हणजे तुझ्यासाठीं एखादी काळीसावळी मुलगी शोधून काढतें!"

"ए, एखादी अगदीं 'काळ्यादेवी' शोधूं नकोस हं! जास्तींत जास्त तुझ्याइतकी काळी मुलगी चालेल मला!" तो थट्टेनं म्हणाला.

पुन्हा तेंच! ह्या मन्याला आज झालंय् तरी काय? संभाषणाचं वर्तुळ पुन्हा पुन्हा तिच्याभोंवतींच फिरत होतं. त्याच्यांतून बाहेर पडण्याचा ती प्रयत्न करीत होती. पण तें अधिकाधिकच तिला भिडत होतं. त्याच्यांतून बाहेर कसं पडावं हें तिला समजेना. म्हणे तुझ्याइतकी काळी मुलगी चालेल मला! फाजील कुठला! सरळ सरळ कां म्हणत नाहीं 'तूंच हवीस मला' म्हणून?

"काय ग? एकाएकीं अशी गप्प कां झालीस? बोल कीं कांहीं तरी!" त्यानं पुन्हा संभाषणाला गति दिली.

"काय बोलूं? तूं प्रश्न विचार, मी उत्तरं देतें!" ती म्हणाली.

"तुझं कॉलेज वगैरे ठीक चाललंय ना?" मन्यानं प्रश्न केला.

"अगदीं ठीक चाललंय, तुझ्या कृपेनं!" निमानं उत्तर दिलं.

"माझ्या कृपेनं?"

"हो! म्हणजे त्याचं असं आहे कीं तूं कॉलेज सोडल्यापासून कॉलेजांतील पोरीबाळी आनंदांत आहेत!" निमा थट्टेनं म्हणाली.

"फार दिवस हें सुख त्यांना उपभोगूं देणार नाहीं मी! पुढच्या वर्षी पुन्हा कॉलेजांत येणार आहें!" तो गमतीनं म्हणाला.

प्रश्न संपले! उत्तरं संपलीं!

"निम्मे, समोरच्या 'मेहेर रेस्टॉरंट' मध्यें येतेस? चल, जरा चहा घेऊं!" त्यानं सहजपणें सुचवलं.

'निम्मे' हें मन्याचं खास आवडतं संबोधन होतं.

"माझं नांव 'निमा' आहे! 'निम्मी' नाहीं!" ती म्हणाली.

"बरं! एनिमाऽ-!"

"माझ्या नांवाच्या आधीं 'ए' हें उपपद कधींहि लावत जाऊं नकोस. निमाचं 'एनिमा' होऊं देऊं नकोस!" ती हसत म्हणाली.

"एकदे सगळे नियम पाळून तुझं नांव घेणं मोठं कठीण आहे! मला खरोखर फार कींव येते!" तो उद्गारला.

"कुणाची?"

"तुझ्या भावी नवऱ्याची! हाल असतील बिचाऱ्याचे!" ती हंसत म्हणाली.

—संभाषणाचं जाळं तिच्याच भोंवतीं विणलं जात होतं!

"मग चलतेस ना चहा घ्यायला?" त्यानं पुन्हा विचारलं.

"नको रे, आज नको!" त्याला 'नाहीं' म्हणतांना तिला वाईट वाटलं.

"अच्छा! मग मी जातों तर!"

"कां रे? लागलीच निघालास? राग आला माझा?"

"छे, छे! राग यायचं काय कारण? आणि शिवाय तुझ्यावर रागवायचा मला काय अधिकार आहे?"

"बघ. रागावलाच आहेस तूं!"

"नाहीं ग! खरंच नाहीं रागावलों! गमतीनं म्हटलं तसं! तुला अशी शंका कां येते मला समजत नाहीं!"

"तुला नाहींच समजायचं तें! आणि हें बघ, तुलाहि माझ्यावर रागवायचा अधिकार आहे. जो प्रेम करतो त्याला रागवायचाहि हक्क असतो!"

"पण मी तुझ्यावर प्रेम करतों हें कुणी सांगितलं तुला?" त्यानं खट्याळपणें विचारलं.

"कांहीं कांहीं गोष्टी सांगाव्या लागत नाहींत!" चालतां चालतां निमा म्हणाली.

—तिच्या पाठमोऱ्या आकृतीकडे मन्या क्षणभर पहात राहिली.

'सर्कल' सिनेमापाशीं आल्यावर निमाची चाल मंदावली. येतांजातां सिनेमांचीं पोस्टर्स पहाण्याची तिला आवड होती. त्या स्वप्नाळू पोरीला चंदेरी सृष्टीबद्दल फार आकर्षण होतं. 'सझा' चित्रपटाच्या पोस्टरवर तिची नजर स्थिरावली. तिनं भूमिका वाचल्या—'निम्मी' आणि 'देव आनंद'. नंतर पुन्हा एकदां पोस्टरवरच्या चित्राकडे पहाण्याचा तिला मोह झाला. चित्रांतल्या निम्मीच्या पाठीमागें देव आनंद उभा होता, अन् तिच्या छातीभोंवतीं त्याच्या हातांची मिठी होती.

तें चित्र पाहिल्यावर निमाच्या शरीरांत वीज चमकली. मालीनं तिला कित्येक वेळां प्रेमानं अशी मिठी मारली होती. पण तो स्पर्श मालीचा आहे ह्याची जाणीव ती विसरूं शकत नव्हती. तें चित्र पाहून आपल्या यौवनाचे वायां चाललेले सारे क्षण आपल्यापुढें साकार होऊन उभे आहेत, असं तिला वाटलं. तिच्या हृदयांत खोल कुठें तरी कळ उठली. स्तनांना चोळीचं बंधन जाणवायला लागलं.

लग्नानंतर हें सुख तिला मिळणारच होतं. पण लग्नाआधीं तें मिळालं तर तिच्या शरीराला हवं होतं. लग्नपूर्व प्रणयाची उन्मादकता तिला अनुभवायची होती. त्या उन्मादक अनुभवासाठीं तिचं शरीर आसुसलं होतं. पण संकोचाच्या सांखळ्यांनीं तिचं मन बांधलेलं होतं. अन् त्या बंधनांतून सुटण्यासाठीं तें धडपड करीत होतं.

...त्या धुंद मनःस्थितींतच ती प्रा. नाटेकरांच्या घरीं आली. त्या वेळेस प्रा. नाटेकर नवकाव्याचं एक पुस्तक वाचत होते. तिला पहातांच त्यांनीं तें पुस्तक टेबलावर ठेवलं.

बसा !" जवळची एक खुर्ची ओढून ते तिला म्हणाले.

—निमा खुर्चीवर बसली.

"अभ्यास कोय म्हणतोय तुमचा ?" त्यांनीं बोलायला सुरुवात केली.

"अभ्यासाच्या विषयीं काहूं नका, सर ! मी आज तुमच्याशीं इतर विषयांवर गप्पा मारायला आलेंये !" निमा हंसत म्हणाली.

"बेव्हा ! कुठल्या 'इतर' विषयांवर बोलतां माइयांशीं ? नवकाव्यांवर बोलतां ? नाटेकरांनीं खेळकरपणें विचारलें.

"शीः ! नवकाव्यावर काय बोलायचं ? आचरटासारखं कांहीं तरी फाजील लिहितात हे नवकवि !" तिनं स्वतःचं मत व्यक्त केलं.

—प्रा. नाटेकरांना नवकाव्याचं वेड होतं. संधि सांपडेल तेव्हां नवकाव्याची बाजू मांडण्याचा ते प्रयत्न करीत. निमाचं हें बेजबाबदार विधान ऐकून त्यांचा नवकाव्याबद्दलचा अभिमान दुखावला.

"तुम्हीं नवकाव्य फारसं वाचलेलं दिसत नाहीं !" ते उद्गारले.

"फारसं काय, मुळींच वाचलं नाहीं ! वाचायची इच्छाच होत नाहीं." ती म्हणाली.

"आणि तरी नवकाव्याबद्दल अशीं मतं ठोकून देतां तुम्ही ?"

"मग टीकाकार तरी ह्यापेक्षां वेगळं काय करतात ?"

—तिचं हें बोलणं ऐकून प्रा. नाटेकरांना गंमत वाटली. ते हंसले.

'सर, सध्यां तुम्हांला करमतं का हो ?" तिनं एकदम प्रश्न केला.

"न करमायला काय झालं ?"

"नाहीं, म्हटलं सध्यां तुमची बायको माहेरीं गेली आहे, तेव्हां—"

"छे, छे ! तसं कांहीं नाहीं !" प्रा. नाटेकर मध्येंच म्हणाले, "मला भरपूर करमतं ! वाचायला पुस्तकं असलीं कीं बायकोची उणीव भासत नाहीं मला !"

"आश्चर्य आहे ! सर, तुम्हांला एक प्रश्न विचारूं का ?"

"विचार कीं."

"तुम्ही रागावणार नाहीं ना ?"

"छे, छे ! तुमच्यावर कसा रागवेन मी ?"

—वरकरणीं साध्या दिसणाऱ्या ह्या वाक्यांत बराच अर्थ होता.

"मग सर, खरं सांगा, मला वाटतं, तुमच्याइतकं सुखी जगांत दुसरं कुणी नसेल ! तुम्हांला कशाला कांहीं कमी नाहीं. हा प्राध्यापकाचा आवडता व्यवसाय आहे, सुंदर बायको आहे, आणखी काय हवं ? पण सर, तुम्ही खरोखरच सुखी आहांत का ?"

—प्रा. नाटेकर एकाएकीं गंभीर झाले.

"खरं सांगूं ?" ते म्हणाले, "मला तुमच्याबद्दल काय वाटतंय् तें नीटसं सांगतां येणार नाहीं ! पण आजपर्यंत इतक्या आपलेपणानं, जिव्हाळ्यानं, सहानुभूतीनं हा प्रश्न कुणीहि मला विचारला नाहीं ! तुम्हीं तरी तो कां विचारावा हाहि एक प्रश्नच आहे ! आजपर्यंत कुणाजवळहि बोललों नाहीं मी ! पण आज तुमच्यापुढें माझं अंतःकरण उघडं करतोंय मी. विद्यार्थिनी म्हणून नव्हे, तर माझी एक जिवाभावाची मैत्रीण म्हणून !"

"तुमची मैत्रीण म्हणवून घ्यायला फार आवडेल मला !" निमा म्हणाली, "पण त्यासाठीं तुम्हांला एक गोष्ट केली पाहिजे !"

—प्रा. नाटेकरांनीं तिच्याकडे प्रश्नार्थक चेहऱ्यानं पाहिलं.

"मला, 'अहो-जाहो' म्हणूं नका ! दोन तरुण माणसांची ओळख झाल्यानंतर त्यांनीं किती दिवस एकमेकांना अहो-जाहो म्हणायचं ह्याला कांहीं मर्यादा आहेत ! आणि मला वाटतं, आपल्या बाबतींत ह्या मर्यादा

ओलांडण्याची वेळ आज आली आहे!"

—प्रा. नाटेकर तिच्याकडे आश्चर्यानं पहातच राहिले. स्वप्नाळू डोळ्यांची ही पोरगी आज हें भलतंच काय बोलत होती !

—संकोचाच्या सांखळीचा एक दुवा निखळला होता.

"पण लोकांच्या दृष्टीला तें बरं दिसणार नाहीं!"—प्रा. नाटेकर म्हणाले.

"तरुण माणसानं लोकमताला भीक घालूं नये!—तरुणांनीं पृथ्वीचा गोळा फुटबॉलसारखा लाथेनं उडवला पाहिजे, तुडवला पाहिजे!"

—बोलतांना निमाच्या पापण्यांचे लांब केस थरथरत होते.

"निमा, आज असं काय बोलते आहेस तूं?" ते स्वतःला नकळत एकवचनांत उद्गारले.

"इतक्या दिवसांचं माझं बोलणं अर्थशून्य होतं! माझ्या शब्दांना आज अर्थ येत चालला आहे!"

—निमाच्या मनीचं तारूं वाटेल त्या दिशेला भरकटत होतं. तिच्या मनाचा तोल सुटला होता.

क्षणभर कुणीच कांहीं बोललं नाहीं.

—मग निमानं आपलं मन किंचित् सांवरलं.

"खरंच, पण मूळ प्रश्न बाजूलाच राहिला आहे कीं! हं, सांगा ना तुम्ही काय सांगत होतां तें!" ती म्हणाली.

—गाडी पुन्हा रुळावर आल्याचं पाहून प्रा. नाटेकरांना जरा बरं वाटलं. त्यांच्या मनावरचा ताण किंचित कमी झाला.

जवळच्या टेबलावर आपल्या बोटांनीं टक्‌टक् करीत प्रा. नाटेकर म्हणाले, "माझ्याबद्दलचा तुझा अंदाज साफ चुकला आहे! माझ्या बाह्य वर्तना-वरून मी सुखी आहें असा लोकांचा गैरसमज होण्याची शक्यता आहे. पण वस्तुस्थिति अगदीं उलट आहे!"

निमाच्या सुंदर चेहेऱ्यावरून आपल्या नजरेचा कुंचला हलुवारपणें फिरवीत प्रा. नाटेकर पुढें म्हणाले, "माझी बायको सुंदर आहे, थोडी-फार शिकलेली आहे, पण गेल्या पांच वर्षांत आमचे मनःप्रवाह एकमेकांत मिसळूं शकले नाहींत. आम्ही एकमेकांशीं समरस होऊं शकत नाहीं. ह्यांत दोष कुणाचाच नाहीं. तुला कदाचित् ऐकून माहीत असेल, लग्नापूर्वी माझं एका मुलीवर प्रेम होतं. तिनंहि, प्रेमाचे खेळ खेळण्यापुरतं एक खेळणं ह्या दृष्टीनं, माझ्याशीं निकट संबंध ठेवले होते. मी तिच्यावर खरोखरच मनापासून प्रेम करीत होतों. पण अखेरीस तिनं औरंगाबादच्या एका जहागिरदाराच्या मुलाशीं लग्न केलं, तेव्हां मला तिचं खरं स्वरूप समजलं. तिच्या ह्या कृत्या-बद्दल मी तिला जाब विचारूं शकलों असतों, पण असं कांहीं करण्याची मला इच्छाच झाली नाहीं. अजूनहि तिची आठवण मी विसरूं शकत नाहीं. तिनं फसवलं, पण माझ्या मनाला कसा फसवूं मी? प्रेमभंगाच्या आघातानं विकल झालेलं माझं मन संसारांत रमूं शकत नाहीं. माझ्या जीवनांत एक भयंकर निर्वात पोकळी निर्माण झाली आहे, आणि त्या पोकळींत माझं मन प्राण-वायूसाठीं तडफडतं आहे! मी एकटा आहें, अन् असाच एकटा रहाणार आहें...हें निष्प्रेम, रुक्ष जीवन संपेपर्यंत..."

—निमाच्या गालावर दोन अश्रू ओघळले. प्रा. नाटेकरांच्या प्रेम-कहाणीशीं ती समरस झाली होती! त्यांच्यासाठीं आपण कांहीं तरी करायला हवं असं तिला अत्यंत तीव्रतेनं वाटायला लागलं. पण काय करावं ह्याची अस्पष्टशीसुद्धां कल्पना तिच्या मनाला नव्हती. अफाट सहानुभूतीनं तिचं मन ओथंबलेलं होतं. त्या सहानुभूतीचा त्यांच्यावर वर्षाव करण्याची तिची तयारी होती. पण निश्चितपणें काय केलं म्हणजे प्रा. नाटेकर आपलं दुःख विसरतील, सुखी होतील, हें तिला समजत नव्हतं. तिच्या मनाचा गोंधळ उडाला होता. ऊर धडधडत होता; भावनांचे पंख फडफडत होते. तिचं मन हळू-हळू धुंद व्हायला लागलं. विचारांची जागा विकारांनीं घेतली. पाय थरथर कांपायला लागले. उरोजांची अस्थिरता, अधीरता वाढली.

—तिनं 'निम्मी'च्या मादक नजरेनं प्रा. नाटेकरांकडे पाहिलं. खुर्ची-वरून उठून ती प्रा. नाटेकरांच्या जवळ आली. अगदीं! अन् एकाएकीं त्यांच्या गळ्यांत हात टाकून ती म्हणाली, "Kiss me, and you will be happy!!"

—तिच्या स्पर्शानं प्रा. नाटेकरांचं रक्त गरम झालं. त्यांनीं तिचं चुंबन घेतलं पण तिचं समाधान झालं नाहीं.

'अंहं! असं नाहीं!' ती अस्पष्टपणें उद्गारली.

...आणि ती भानावर आली तेव्हां तिला समजलं कीं—

—तारुण्यांतील वायां जाणाऱ्या असंख्य क्षणांपैकीं एका सुवर्णक्षणाचं आज सार्थक झालं!

तो गोंधळाट अंर हाईश्यत—तसल्या त्या करुणाजनक प्रसंगींहि—विचारा चारुदत्त स्मित हास्य करीत रंगभूमीवर पांच मिनिटें स्तब्ध उभा होता. शेवटीं घडूं नये तें घडलें आणि त्या नाटकावर पडदा पडला



# गेले ते दिवस!

म. भा. भू. जगन्नाथ रघुनाथ आजगांवकर

### महाराष्ट्रीय नाट्यकला

पुष्कळ लोकांची अशी समजूत आहे कीं सांगलीचे कै. विष्णुदास भावे हेच हल्लींच्या महाराष्ट्रीय नाट्यकलेचे जनक होत. परंतु ही समजूत चुकीची आहे. कारण त्यापूर्वीं शेंकडों वर्षें आमच्या दक्षिण कोंकणांत दशावतारी नाटकांचे प्रयोग होत असत व अद्यापीहि होत असतात; आणि भावे यांनीं प्रचलित केलेल्या नाटकांत व कोंकणांतील या दशावतारी नाटकांत फारसा फरक नाहीं. दोघांचीहि उत्पत्ति कर्नाटकांतील नाट्यकलेच्या अनुकरणानें झालेली असल्यामुळें त्यांचा तोंडवळा सारखाच आहे. भावे यांच्या आणि दशावतारी पद्धतीच्या नाटकांतील सगळीं पद्यें सूत्रधारासच म्हणावीं लागत, परंतु पुढें मुंबईतील पाठारे प्रभु ज्ञातींतील एक नाटककार

### कै. सोकर बापुजी त्रिलोकेकर

यांनीं आपल्या नाटकांतील पात्रांच्या तोंडीं घातलेलीं पद्यें तीं त्या पात्रानें स्वतःच गाइलीं पाहिजेत, असा दंडक सुरू केला. आरंभीं त्यांनीं आपल्या नाटकांत श्लोक, दिंड्या, साक्या वगैरे वृत्तांतलीं साधीं पद्यें घातलीं होतीं व शाळेंतील विद्यार्थ्यांप्रमाणें हीं पद्यें त्यांच्या नाटकांतील पात्रें म्हणून दाखवीत असत. पुढें कै. अण्णासाहेब किर्लोस्करांच्या संगीत नाटकांचे प्रयोग सुरू झाल्यावर सोकर बापुजी यांनीं त्यांचें अनुकरण करून, आपल्या नाटकांत गायनानुकूल पद्यें घातलीं. सुमारें साठ वर्षांपूर्वीं मुंबईत सोकर बापुजी यांच्या, नलदमयंती, हरिश्चंद्र, व 'सावित्री' या नाटकांचे अनेक प्रयोग झाले. त्या नाटकांतील पद्यरचना जुन्या पद्धतीची परंतु फार सुश्लिष्ट आणि प्रासादिक आहे. आतां सोकर बापुजी यांचें नांवहि कोणास ठाऊक नाहीं आणि त्यांचीं नाटकेंहि कोणी वाचीत नाहीं.

### कै. अण्णा किर्लोस्कर

महाराष्ट्रीय नाट्यकलेच्या उत्कर्षास कारणीभूत झालेला हा थोर नाटककार म्हणजे या विद्यापुरता एक युगपुरुषच होय. इंग्रजींतील 'ऑपेरा' जातीच्या नाटकांचे प्रयोग पाहून संगीत नाटकाची कल्पना आपणास सुचली, असें अण्णांनींच स्वतः लिहिलें आहे. अण्णा किर्लोस्कर ज्या कालांत होऊन गेले तो काल, महाराष्ट्राच्या अभ्युदयाचा प्रारंभकाल होय. रानडे, चिपळूणकर, आगरकर, भांडारकर, टिळक व फुले या कर्तबगार महाराष्ट्रीयांचे अण्णा हे समकालीन होत. संगीत शाकुंतल नाटक लिहिण्यापूर्वीं 'शांकरदिग्जय' हें गद्य नाटक अण्णांनीं लिहिलें होतें व त्याचे प्रयोगहि झाले होते, परंतु महाराष्ट्रास संगीत नाटकांची चटक लावली ती त्यांच्या संगीत शाकुंतलानें. किर्लोस्कर संगीत मंडळी या नाटकाचे पहिले चार अंकच आरंभीं करून दाखवीत असे. संगीत शाकुंतलाचा पहिला प्रयोग पुणें येथील आनंदोद्भव नाटकगृहांत ता. ३१ ऑक्टोबर १८८० आश्विन वद्य १३, बुधवार शके १८०२, या दिवशीं झाला. अण्णांचे चरित्रकार कै. शं. बा. मुजुमदार या पहिल्या प्रयोगाविषयीं लिहितात: "सकल कलागुणवेत्ते पंडित या दिवशीं जमले होते. सूत्रधार दोन पारिपार्श्वकांसह पडद्यांत सज्ज होऊन उभे राहिले. पडदा वर होतांच अण्णासाहेबांनीं घेतलेली सूत्रधाराची भव्य मूर्ति प्रगट होऊन त्यांचा गंभीर आवाज व नाटेकर व शेवडे, या पारिपार्श्वकांचे गंधर्वतुल्य आलाप प्रेक्षकांच्या कर्णद्वारांत प्रवेश करूं लागले." अण्णा, मोरोबा, नाटेकर, शेवडे, जांभेकर, मुजुमदार हे प्रमुख नट होते. यांपैकीं गंगाधर भीमराव जांभेकर हे बी. ए. होते. ते पुढें मामलेदार झाले होते. आणखीहि दोन पदवीधर त्या वेळीं किर्लोस्कर मंडळींत होते.

### मोरोबा वाघोलीकर

नाटकांत नायकाची भूमिका करणाऱ्या गायक नटाच्या शोधांत अण्णा होते. त्या वेळीं नारायणबुवा फलटणकर हे एक मोठे नामांकित हरिदास असून उत्कृष्ट गायक होते. त्यांनीं आपल्या नाटक मंडळींत यावें म्हणून अण्णांनीं फार प्रयत्न केले, परंतु बुवांनीं स्पष्ट सांगितलें कीं हरिदासीचा पेशा सोडून नटाचा पेशा मी कधींहि स्वीकारणार नाहीं. हें ऐकून अण्णा फार निराश झाले, तेव्हां बुवा त्यांना म्हणाले, "अण्णा, असे निराश होऊं नका. कीर्तनांत माझ्या मागें उभा राहणारा हा मोरोबा आहे, याला घेऊन जा. तोहि चांगला गाणारा आहे आणि नटास योग्य अशी त्याची शरीरयष्टीहि आहे." त्याप्रमाणें अण्णा मोरोबांस आपल्या मंडळींत घेऊन गेले. या मोरोबांनीं पुढें दुष्यंत, अर्जुन वगैरे प्रमुख पात्रांच्या भूमिका करून मराठी रंगभूमि कशी गाजविली हें त्या रंगभूमीचा विश्वसनीय आणि साद्यंत इतिहास जेव्हां लिहिला जाईल तेव्हां लोकांस समजेल. शाकुंतलाच्या सातही अंकांत



## वस्त्र-अलंकारांनीं नटलेला देह म्हणजे सौंदर्य नव्हे!

प्रमाणबद्ध शरीर आणि आरोग्य यांतच स्त्रियांचें सौंदर्य आहे. वस्त्रालंकारांनीं नटलेल्या शरीरामध्यें सौंदर्याचा आभास होतो, परंतु तें खरें सौंदर्य नव्हे. हल्लीं पुष्कळ स्त्रियांमधून "प्रदर" हा विकार सर्वसामान्यपणें दिसून येतो. याला च पांढरी धुपणी, अंगावरून जाणें अथवा (Leukorrhea) म्हटलें जातें. या रोगावर "अशोक" ही उत्तम वनौषधि आहे. धूतपापेश्वर कारखान्यानें अशोकाच्या सालीपासून विशिष्ट शास्त्रीय पद्धतीनें बनविलेलें "अशोकारिष्ट" विशेष गुणकारी आहे.

त्याचप्रमाणें केशसंभार हें स्त्री-सौंदर्याचें मोठें प्रतीक आहे. बाळंतपण, रक्तदोष, चिंता इत्यादींमुळें केस गळतात व पिकतातहि. त्यांवर केवळ सुवासिक तेलांचा उपयोग होत नाहीं. त्वचेखालील केसांच्या मुळांना उत्तेजन मिळून शुद्ध रक्ताचा पुरवठा व्हावा लागतो. त्यासाठीं तसे गुणधर्म असलेल्या वनस्पतींचा उपयोग होतो. अशा प्रकारच्या वनस्पतींच्या रसापासून "कांचन तेल" तयार केलें आहे. शिवाय त्यांत सुगंध आहे. त्यामुळें केशसंवर्धन आणि सुगंध या दोन्ही दृष्टींनीं कांचन वापरतां येईल. दिवाळीमध्यें इतर तेलें वेण्यापेक्षां कांचन तेलानें दुहेरी लाभ साधतां येईल.



दुष्यंताचें काम आहे आणि त्याच्या तोंडीं अण्णांनीं ५०।६० पद्यें घातलेलीं आहेत, परंतु त्या सर्वांस मोरोबा पुरून उरत. मोरोबांस मीं पाहिलें होतें, परंतु त्यांची भूमिका पाहण्याचा योग मला आला नाहीं.

### बाळकोबा नाटेकर

नाटेकर म्हणजे किर्लोस्कर नाटक मंडळींतले एक मोठें प्रस्थ होतें. हे जसे उत्कृष्ट गवई होते तसेच पहिल्या प्रतीचे नटहि होते. कण्व, कृष्ण, वसिष्ट या त्यांच्या प्रमुख भूमिका. ते थोडेसे हेकेखोर असल्यामुळें अण्णांचे व त्यांचे नेहमीं खटके उडत व त्यामुळें मंडळीशीं ते कधींहि समरस झाले नाहींत. एकदां अशी गंमत झाल्याचें ऐकलें कीं, कोल्हापुरांत किर्लोस्कर मंडळीचे प्रयोग लक्ष्मीप्रसाद नाटकगृहांत सुरू होते. एके रात्रीं सौभद्राच्या प्रयोगासाठीं मंडळींतील बहुतेक नट बिऱ्हाडांतून नाटकगृहाकडे गेले. एकटे बाळकोबा मात्र मागेंच रेंगाळत राहिले. इकडे प्रयोगास सुरुवात होऊन "वीण्याचा मंजुळ आवाज ऐकूं येत आहे, वावरून नारदमुनींची स्वारी इकडे येत असावी असें वाटतें," हें वाक्य अर्जुनानें (मोरोबांनीं) उच्चारलें—परंतु नारदमुनींचा पत्ता नाहीं! नारदमुनि त्या वेळीं थिएटरच्या दारांत आले होते व इकडे अर्जुन तेंच वाक्य उच्चारून वेळ मारून नेत होता! बाळकोबांनीं रंगपटांत प्रवेश केला. नारदाचा वेष घेण्यास वेळ नव्हता. त्यांनीं डोक्याची टोपी फेकून दिली आणि कोपऱ्यांतला वीणा उचलून घाईघाईनें रंगभूमीवर प्रवेश केला. धोतर नेसून अंगांत नुसती पैरण घातलेला हा नारदमुनि पाहून प्रेक्षकांची हंसून हंसून मुरकुंडी वळली. परंतु 'राधाधरमधुमिलिंद' या गोड पदाचे मंजुळ स्वर बाळकोबांच्या तोंडून बाहेर पडतांच प्रेक्षकांचें त्यांच्या वेषाकडे दुर्लक्ष होऊन ते नागाप्रमाणें डोलूं लागले. बाळकोबांच्या या बेपर्वाईच्या वर्तनामुळें अण्णांच्या अंगाचा अगदीं तिळपापड झाला होता. बाळकोबा शांत होतांच अण्णा त्यांना म्हणाले, "बाळकोबा, तुम्ही कोणत्या घमेंडींत आहांत. तुमच्याशिवाय माझें अडेल अशी तुमची समजूत आहे काय? लक्षांत ठेवा, वेळ पडली तर तुमच्या सर्व भूमिका मी मंडळीच्या न्हाव्याकडून करून घेईन." अपराध बाळकोबांचा असल्यामुळें त्यांना चूप बसावें लागलें हें सांगावयास नकोच. पुढें हे बाळकोबा पुणें येथील ट्रेनिंग कॉलेजांत गायनशिक्षक होते. त्यांची भूमिका मीं पाहिली नाहीं. परंतु त्यांचें गाणें ऐकण्याचा योग एकदां आला होता. "कसा पिकला गहूं हरबरा । बाळपणींच्या ग नाना तऱ्हा—" ही लावणी त्यांनीं म्हटली होती. ती म्हणतांना त्यांचे जे हावभाव चालू होते ते पाहून, हे गृहस्थ अव्वल दर्जाचे नट असले पाहिजेत अशी माझी खात्री झाली. उत्तर हिंदुस्थान म्हणजे गायनाचें आगर. तिकडे किर्लोस्कर मंडळी एकदां गेली असतां मंडळींतील इतर गायक नटांचें तेज तिकडे पडलें नाहीं, एकट्या बाळकोबांनीं वेळ मारून नेली.








**भाऊराव कोल्हटकर**

हे एके फार प्रसिद्ध नट किर्लोस्कर मंडळीच्या पहिल्या पंचविशींत होऊन गेले. बालगंधर्व यांनीं जितकी लोकप्रियता पुढें संपादन केली तितकीच भाऊराव कोल्हटकर यांनीं त्या वेळीं संपादन केली होती. 'शाकुंतल' नाटकांत आरंभीं गाणारें स्त्रीपात्र नव्हतें. पुढें किर्लोस्कर मंडळीचे सेक्रेटरी म्हणून प्रसिद्धीस आलेले कै. शंकरराव मुजुमदार हे आरंभीं शकुंतलेची भूमिका करीत असत; परंतु गायनाभावीं, नुसत्या सौंदर्यावर ती भूमिका लोकप्रिय होणें शक्य नव्हतें व म्हणून नायिकेच्या भूमिकेसाठीं एखाद्या सुंदर गायक मुलाच्या शोधांत अण्णा होते. तेव्हां त्यांना कोणी अशी माहिती दिली कीं, बडोदें येथें कोल्हटकर आडनांवाचे एक हरिदास असून त्यांचे अप्पा व भाऊ असे दोन सुंदर मुलगे चांगले गायक आहेत. म्हणून अण्णा बडोद्यास गेले व त्या वेळीं तेथें असलेल्या कै. शं. मो. रानडे वगैरे दक्षिणी गृहस्थांच्या साहाय्यानें कोल्हटकरबुवांची भेट घेऊन, त्यांनीं त्यांचा मोठा मुलगा अप्पा याला नाटक मंडळींत पाठविण्याची त्यांना विनंति केली. परंतु स्वतः अप्पानेंच नाटकांत जाण्याचें नाकारलें, तेव्हां अण्णांनीं भाऊची मागणी केली. त्या वेळीं नाटक हा हलक्या दर्जाचा धंदा असून, स्त्रीवेषधारी नटास पुढील सात जन्मींत विधवा व्हावें लागतें, अशी लोकांची समजूत असल्यामुळें, कोल्हटकरबुवांनीं भाऊसहि नाटकांत घालण्याचें नाकारलें. तेव्हां अण्णास एकानें अशी सल्ला दिली कीं, "बुवा दरिद्री असल्यामुळें, तुम्ही जर त्यांच्यावर सुवर्णप्रयोग कराल तर ते कदाचित् मुलास पाठविण्यास तयार होतील." हें ऐकताच अण्णानीं बरीच मोठी रोख रक्कम एका ताटांत घालून ते पुनः बुवांकडे गेले व तें ताट त्यांच्यापुढें ठेवून त्यांना म्हणाले, "फूल ना फुलाची पाकळी तुमच्यासाठीं मीं आणली आहे, तिचा कृपा करून स्वीकार करा. तुमच्या मुलाविषयीं म्हणाल तर तुम्ही त्याच्याविषयीं बिलकुल चिंता करूं नका. मी माझ्या स्वतःच्या मुलाप्रमाणें त्याचें परिपालन करीन." इतकें बोलून अण्णांनीं बुवांचे पाय धरले. ताटांतून आणलेली ती बरीच मोठी रक्कम आणि अण्णाची विनयशीलता पाहून बुवांचा विचार बदलला आणि डोळ्यांत आंसवें आणून ते म्हणाले, "अण्णा, तुम्हीं माझ्या अगदीं मर्मस्थानींच घाव घातलात, मी दरिद्री आहें आणि मला पैशाची जरूरी आहे, म्हणून मी भाऊस तुमच्या स्वाधीन करतों, परंतु हा माझा जिवाचा कलिजाच मी तुमच्या हातीं देत आहें, हें विसरूं नका." अण्णांनीं त्यांना आश्वासन दिलें. आणि भाऊस घेऊन ते पुण्यास आले. आतां नायिकेची भूमिका भाऊकडे आली. पूर्वी शकुंतलेच्या तोंडीं पदें नव्हतीं; म्हणून भाऊसाठीं कोणत्या गोड चालींवर पदें रचण्यांत आलीं. 'मनीं तळमळशि०', 'सखये! अनसूये थांब कि बाई०', 'तव मानस केलें काय न कळे मुळिं मजला०' 'जाई सखेसीं०' इत्यादि सुंदर पदें शकुंतलेसाठीं कै. गो. ब. देवल यांनीं रचिलीं. अप्रतिम सौंदर्य आणि अत्यंत कर्णमधुर आवाज यांमुळें भाऊंची लवकरच इतकी प्रसिद्धी झाली कीं त्यांचें नांव सर्वतोमुखीं झालें व त्यांच्या भोंवतीं रहातेचें एक

वल्लयत्र निर्माण झालें. स्त्रियांच्या हळदीकुंकवाच्या समारंभांत स्त्रीवेषानें जाऊन भाऊ हळदकुंकू घेऊन आले, अशा प्रकारच्या आख्यायिकाहि निर्माण होऊं लागल्या! बाळकोबा नाटेकरांप्रमाणें भाऊराव मोठे गवई नव्हते, परंतु त्यांचा आवाज असा पहाडी होता कीं १८९३ सालीं कोल्हापुरांत लक्ष्मीप्रसाद नाटकगृहाच्या बाहेरील पटांगणांत बसून नाटकगृहांत चाललेलें त्यांचें गायन मीं स्पष्ट ऐकलें होतें. त्यांच्या आवाजाची बरोबरी करणारा आवाज दुसऱ्या कोणाचाहि आजपर्यंत आपण ऐकला नाहीं, असें श्री. गोविंदराव टेंब्यांसारख्या तज्ज्ञानेंदेखील लिहिलें आहे. पुणें येथें 'रामराज्यवियोग' या नाटकाचा प्रयोग सुरू होता. एक नामांकित उत्तर हिंदुस्थानी गवय्या पुढल्या रांगेंत बसला होता. भाऊंच्या आवाजाची तारीफ ऐकून तो मुद्दाम त्यांचें गाणें ऐकण्यासाठीं आला होता. नटीच्या भूमिकेंत भाऊ रंगभूमीवर आले आणि 'सुटला पितृदिशेचा वारा' ही लावणी म्हणूं लागले. लावणी ऐकून ते गवईबुवा इतके खूष झाले कीं, त्यांना त्याच दिवशीं कोणी दिलेला भरजरी रेशमी पटका त्यांनीं डोक्यावरून काढला आणि तो भाऊंच्या अंगावर फेंकून 'जीते रहो पठ्ठे!' 'जीते रहो पठ्ठे' अशी त्यांनीं मोठ्यानें गर्जना केली. थिएटरांत टाळ्यांचा कडकडाट झाला. भाऊंनीं सस्मित वदनानें तो शेला उचलून काखेला मारला आणि आपलें पुढील काम सुरू केलें.

भाऊ मोठे धूर्त होते, बालगंधर्वांसारखे व्यवहारज्ञानशून्य नव्हते. स्त्रीभूमिका करण्याचें आपलें आतां वय नाहीं हें लक्षांत येतांच कृष्णा गोरे आणि रामा डवरी हीं दोन स्त्रीपात्रें स्वतःच्या तालमींत त्यांनीं तयार केलीं व स्वतः नायकाची भूमिका ते करूं लागले. भाऊंची स्त्रीपात्राची भूमिका मीं पाहिली नाहीं, परंतु दुष्यंत, पुंडरीक, चारुदत्त, कोदंड आणि शूरसेन या पात्रांच्या त्यांच्या भूमिका मीं पाहिल्या होत्या. त्यांचा माझा थोडासा परिचयहि होता. एकदां मंडळी त्या वेळच्या गिरगांव बॅकरोडवरील दामुलजीच्या वाडींत येऊन उतरली असतां मीं सहज तेथें जाऊन माडीवरील एका बांकावर बसलों होतों. इतक्यांत घामाघूम होऊन उघड्या अंगानें भाऊ वर आले आणि मला पाहून म्हणाले, 'अहो, आजगांवकर, खालच्या बागेंतल्या नारळीचा जो नारळ आत्तांच खालीं पडला तो जर माझ्या डोक्यावर पडला असता तर हा भाऊराव तुम्हांला पुनः दिसला नसता! एक इंचानें नारळ चुकला.''

किर्लोस्कर मंडळी एकदां मुंबईंत येऊन, प्रार्थनासमाजाजवळच्या एका बंगल्यांत उतरली होती व 'शारदा' नाटकाचे पहिले चार अंक बसवीत होती. एका रविवारीं दुपारीं मी सहज मंडळीच्या बिऱ्हाडीं जाऊन ओट्यावरील एका बांकावर बसलों. आंतल्या दिवाणखान्यांत 'शारदा' नाटकाची तालीम चालू होती. मला पाहून भाऊराव माझ्या शेजारीं उघड्या अंगानें येऊन बसले व माझी त्यांनीं

विचारपूस केली. त्यांच्याकडे कोदंडाची भूमिका होती. ते माझ्याशीं बोलताहेत, इतक्यांत नाटकाच्या तालमींतलें 'दृष्टि भरे जलभारें', हें पद म्हणण्याची पाळी त्यांच्यावर आली आणि त्यांनीं बसल्या जागेवरचे खड्या आवाजांत पद म्हणण्यास सुरवात केली. रस्त्यावर एवढी गर्दी कां झाली आहे हें पद संपल्यावर त्यांच्या लक्षांत आलें.

किर्लोस्कर मंडळींतले कृष्णा गोरे, रामा डवरी, चिंतोबा गुरव, परचुरे, दडपे, बोडस, मिरजकर वगैरे त्या वेळचे इतर नटहि आपापल्या परी श्रेष्ठ दर्जाचे होते. परंतु विस्तारभयास्तव त्यांची माहिती मला येथें देतां येत नाहीं. वरील नटांपैकीं, माझे मित्र गणपतराव बोडस व चिंतोबा गुरव हे सुदैवानें अद्याप विद्यमान आहेत व त्यांच्या भूमिका मुंबईंतील चालू पिढीच्या बऱ्याच लोकांनीं पाहिल्या असतील. बालगंधर्व हे पन्नास वर्षांपूर्वी किर्लोस्कर मंडळींत नव्हते, म्हणून त्यांचा निर्देश मी येथें केला नाहीं.

## गणपतराव जोशी

प्रसिद्ध शाहूनगरवासी मंडळीचे मालक कै. गणपतराव जोशी यांच्या तोडीचे नट महाराष्ट्रांतच काय पण एकंदर जगांतहि फार थोडे झाले असतील. कै. बाबासाहेब इचलकरंजीकर यांचा एक इंग्रज मित्र त्यांच्याबरोबर, गणपतरावांची हॅम्लेटची भूमिका पाहण्यास गेला होता. त्यानें असे उद्गार काढले कीं, "मला मराठी येत नसल्यामुळें हॅम्लेटचें भाषण जरी मला समजलें नाहीं तर हॅम्लेटची भूमिका करणाऱ्या नटाचा अभिनय इतका उत्कृष्ट झाला कीं इंग्लंडांत ती भूमिका करणाऱ्या कोणत्याहि नटास इतका सुंदर अभिनय करतां येणार नाहीं." हॅम्लेट आणि प्रतापराव यांच्या भूमिका गणपतराव इतक्या तन्मयतेनें करीत असत कीं नाटकाच्या संविधानकाच्या कालांतच आपण वावरत आहोंत असें प्रेक्षकांस वाटावें. आरडाओरड नाहीं, 'ओव्हर ॲक्टिंग' नाहीं; सगळा अभिनय अंगचाच स्वाभाविक. बाळाभाऊ जोग वगैरे गणपतरावांचे साथीदारहि त्यांच्याच तालमींत तयार झालेले कसलेले नट होते. त्या संगीताच्या कालांत गद्य नाटकें पाहण्याची चटक लोकांना गणपतरावांनीं लावली. पुढें महाराष्ट्र नाटक मंडळीनें त्यांची परंपरा चालविली.

## भास्करबुवा बखले

हे अगदीं पहिल्यानें किर्लोस्कर मंडळींत होते. ते स्त्रीभूमिका करीत असत. गायनाचें ज्ञान नव्हतें, परंतु वीणा घेऊन मधून मधून गाण्याची 'प्रॅक्टिस' ते करीत. एके दिवशीं शंकरराव मुजुमदार त्यांना म्हणाले, "भास्कर, तुझी ही धडपड व्यर्थ आहे. तुला कधींहि गातां येणार नाहीं!" हें भाषण भास्करच्या मनास फार लागलें. त्यांनें त्याच दिवशीं मंडळीचा निरोप घेतला आणि उत्तर हिंदुस्थानांत जाऊन तिकडल्या एका नामांकित गवय्यापाशीं गायनाचा बारा वर्षे अभ्यास केला. आणि नंतर दक्षिणेंत आल्यावर, शंकरराव मुजुमदारांपाशीं जाऊन ते त्यांस म्हणाले, "शंकर, तुला कधींहि गातां येणार नाहीं, असें तूं म्हणाला होतास, पण मी आतां भास्करबुवा बखले या नांवाचा मोठा गवय्या होऊन आलों आहें आणि माझें गाणें मी तुला ऐकविणार आहें." बुवांची गाण्याची तयारी पाहून शंकररावें चाट पडले. पूर्वींचीं माणसें अशीं करारी होतीं.

## आर्यसुबोध नाटकमंडळी

दादाभाई हुने या नांवाचे एक गृहस्थ मुंबईत



होते. त्यांनीं साठ वर्षांपूर्वी ही नाटकमंडळी चालविली होती व 'बल्सिंह तारा' ह्या एकाच नाटकाचा प्रयोग ती करीत असे. या नाटकाचे त्या वेळीं शेंकडों प्रयोग झाले. बल्सिंह तारा हीं भाऊबहीण, आणि त्यांच्या भूमिका करणारेहि दोन भाऊच होते. 'खानदानी इमान' या उर्दू नाटकाचें 'बल्सिंहतारा' हें मराठी भाषांतर. पहिल्यानेंच उर्दू चालीचीं गाणीं या नाटकांत आलीं. यांत एक भुताचें पात्र असून त्याच्या तोंडीं पुढील पद होतें.—

"अरे मी भूत स्वयमुद्भूत दुर्धर
अद्भुताकृति धडड धडधड
अग्नि पेटे तसा लोकीं भूत ॥
सूर्यचंद्रां खालिं उतारुन
सिंधुपर्वत चढवितां वर
मज नसे जड सहज ती
कृति करिन मज जोड न दिसे
धाड न सुचे धाड झाला
घालुनीयां धरिन नर कीं भूत ॥"

या एकाच पदावरून तें भूत किती भयंकर असेल याची कल्पना वाचकांस होण्यासारखी असल्यामुळें, त्याचें विशेष वर्णन मी करीत नाहीं. अकटविकट चाली असूनहि या नाटकांतील पद्यरचना एकंदरींत बऱ्यापैकीं होती. पुढें हें नाटक वाशीमकर मंडळीनें बसविलें होतें व ती त्याचे प्रयोग करीत असे.




## गोवा संगीत मंडळी

गोव्यांतील कांहीं श्रीमंत हौशी गृहस्थांनीं ही मंडळी स्थापन केली होती; दत्तोबा हल्याळकर हे प्रसिद्ध नट आरंभीं ह्याच मंडळींत होते. मंडळी मुंबईंत आली आणि नाटकाच्या जाहिराती फडकल्या. त्या वेळीं मुंबईंत दुसरी नाटकमंडळी नसल्यामुळें ग्रँटरोडवरील न्यू एल्फिन्स्टन थिएटराच्या दारांत लोकांचा तोबा उडाला. परंतु त्याच वेळीं मंडळीच्या मालकांत, तिकिटें विकावयास कोणी बसावयाचें याबद्दल वाद सुरू झाला. एक म्हणूं लागला, "हांव दिले दोनशें रुपये!" तर दुसरा म्हणूं लागला, "हांव दिले पांचशें; हांवूच तिकिटां इकूंक बसतालों." हें भांडण शेवटीं इतक्या विकोपास गेलें कीं नाटकाचा प्रयोग झाला नाहीं आणि त्याच दिवशीं मंडळी मोडली! तिकिटें विकावयास बसणें हा मोठा मान आहे अशी प्रत्येच मालकांची समजूत व त्यामुळें, मीच तिकिटें विकणार, असा जो तो हट्ट धरून बसला! आणि त्याचा परिणाम नाटकमंडळीच्या वरखास्तींत झाला.

## दत्तोपंत हल्याळकर

या प्रसिद्ध नटानेंहि मराठी रंगभूमि एके काळीं गाजविली होती. भाऊराव कोल्हटकरांच्या खालोखाल यांची लोकप्रियता होती. हे पूर्वी गोमंतकांत शिक्षक होते. त्यांचें शिक्षणहि फारसें झालें नव्हतें. परंतु रुबाबदार शरीरयष्टि, सौंदर्य आणि मधुर आवाज यांच्या जोरावर रंगभूमीवर त्यांनीं आघाडी मारली. करकेरनिर्यासिनी, म्हाळसाकांत प्रासादिक इत्यादि अनेक मंडळ्या त्यांनीं काढल्या आणि मोडल्या. भाऊराव कोल्हटकरांच्या गायनशैलीचें ते हुबेहूब अनुकरण करीत असत व ती गोष्ट ऐकून भाऊंनीं त्यांना एकदां बोलवून त्यांचें गाणें ऐकलें होतें व त्यांना शाबासकी दिली होती असें सांगतात. ते किती लोकप्रिय होते याचें एकच उदाहरण येथें देतों. एकदां बेळगांव येथें त्यांची नाटकमंडळी असतां तेथील कांहीं उपद्व्यापी लोकांनीं, स्वतःची कंपनी काढण्यासाठीं, त्यांच्या नाटकमंडळींतील बहुतेक पात्रें फोडलीं व त्यामुळें त्याचे प्रयोग बंद पडले. स्वतः दत्तोपंत, धुमे या नांवाचे एक नट, आणखी एकदोन किरकोळ नट, कंपनीचा न्हावी आणि आचारी, इतकीच मंडळी ठिकाणावर राहिली. प्रयोग बंद पडल्यामुळें आवकहि बंद झाली व चालू खर्चासाठीं कर्ज काढण्याचा प्रसंग आला. अशा स्थितींत, एखादा कच्च्या दिलाचा मनुष्य असता तर तो साफ गळून गेला असता. परंतु दत्तोपंतांचा आत्मविश्वास दांडगा असल्यामुळें ते बिलकुल डगमगले नाहींत. ते धुमे यांस म्हणाले, "उद्यां रामराज्यवियोग नाटकाच्या जाहिराती लावा आणि त्यांत दत्तोपंत हल्याळकर हे मंथरेची भूमिका करणार आहेत, असें जाहीर करा"

धुमे म्हणाले, "आपल्याकडे चारपांचदेखील माणसें नाहींत, रामराज्यवियोगाचा प्रयोग कसा होणार?" दत्तोबा म्हणाले, "आलटून पालटून सोंगें घेऊं आणि कसा तरी वेळ मारून नेऊं. तूं जाहिराती तर लाव." त्याप्रमाणें धुमे यांनीं जाहिराती लावल्या. हल्याळकर मंथरेची भूमिका करणार आहेत असें समजतांच रात्रीं थिएटराजवळ लोकांची चिकार गर्दी जमली. दत्तोपंतांच्या प्रतिस्पर्ध्यांनीं 'पिकेटिंग' सुरू केलें, परंतु त्याचा कांहीं उपयोग न होतां, त्यांच्याशीं धक्काबुक्की करून लोक थिएटरांत घुसले. सुमारें १००० रु. उत्पन्न आलें आणि तेवढ्यावर मंडळीची डाग डुजी करून दत्तोपंतांनीं पुनः प्रयोग सुरू केले!

## माधवराव पाटणकर

अण्णा किर्लोस्करांबरोबर माधवराव पाटणकरांचा मी या लेखांत समावेश करीत आहें, म्हणून कांहीं वाचकांचा माझ्यावर रुसवा होईल हें मी जाणून आहें, परंतु मोरोपंत आणि रामजोशी यांचीं चरित्रें एकाच ग्रंथांत आलीं म्हणून त्या ग्रंथाचें महत्त्व जसें कमी होत नाहीं तसाच हा प्रकार आहे. कारण दोघेहि कवीच; दर्जा निराळा, इतकेंच. एके काळीं किर्लोस्कर मंडळी महाराष्ट्रांतील वरच्या दर्जाच्या लोकांत जेवढी प्रिय होती तेवढीच पाटणकर मंडळी खालच्या वर्गांतील लोकांत प्रिय होती. शाकुंतल, सौभद्र, मृच्छकटिक या नाटकांतील काव्य आणि नाट्य समजण्याची त्यांची पात्रता नव्हती असे लोक (आणि त्यांचाच भरणा मोठा आहे.) पाटणकरांचीं सत्यविजय,




विक्रमशशिकला, सीमंतिनी, युवतीविजय इत्यादि नाटकें मोठ्या जोराने प्रचारात असत, हल्लीं ज्याला आपण लोकनाट्य म्हणतों त्या प्रकारचीं हीं नाटकें होतीं. वाङ्मयदृष्ट्या आणि कदाचित् नाट्यदृष्ट्याहि हीं नाटकें हीन दर्जाचीं असतील, परंतु मनोरंजनाचा भाग त्यांत भरपूर होता. गंगाधरभाऊ डगितांच्या पोथीसारखी एखादी कहाणी देखील मनोरंजक असत नाहीं का? पाटणकरांच्या नाटकांचे प्रयोग पुनः सुरू झाले पाहिजेत, असें माझे मित्र मामा वरेरकर हे अट्टाहासानें सांगत आणि लिहीत असतात, याचें कारण हेंच होय. शाकुंतलासारखीं उच्च दर्जाचीं नाटकें आणि तमाशे यांच्या दरम्यान या पाटणकरी नाटकांचें स्थान आहे.

माधवराव पाटणकर हे धारवाडच्या बाजूस शाळामास्तर होते. त्यांनीं एकदां शाळेंतील कांहीं विद्यार्थी आणि इतर लोक यांच्या मदतीनें मृच्छकटिक नाटकाचा प्रयोग करून त्याचें उत्पन्न एका संस्थेस दिलें. नाटककर्ते कै. देवल यांस हें वर्तमान समजतांच, आपल्या परवानगीशिवाय आपल्या नाटकाचा प्रयोग केल्याबद्दल पाटणकरांवर त्यांनीं नुकसानभरपाईचा दावा केला, व त्याचा निकाल देवलांच्या बाजूनें होऊन पाटणकरांस नुकसानभरपाई करावी लागली. त्याच दिवशीं माधवरावांनीं प्रतिज्ञा केली कीं, "अतःपर शिक्षकाचा व्यवसाय न करतां नाटकमंडळी स्थापन करून, स्वतःच्या नाटकांचेच प्रयोग करावयाचे, दुसऱ्याचें नाटक घ्यावयाचें नाहीं." ही प्रतिज्ञा त्यांनीं पुरी केली. पाटणकर मंडळी स्थापन करून नाटकांची त्यांनीं टांकसाळच सुरू केली. त्यांनीं एकंदर २७ नाटकें लिहिलीं, त्यांपैकीं सत्यविजय, विक्रम-शशिकला, सीमंतिनी आणि युवतीविजय हीं चार नाटकें समग्र छापलीं होतीं व इतरांच्या नुसत्या गाण्यांच्या पोथ्या होत्या. या पुस्तकांच्या सहस्रावधि प्रती खपल्या. पाटणकरांनीं नाटकांवर पुष्कळ पैसा मिळविला व पुढें निवृत्त होऊन वऱ्हाडांतील एका गांवीं ते स्थायिक झाले होते. माधवराव हे मोठे रुबाबदार गृहस्थ असून चांगल्या प्रकारचे नट होते. राजा रविवर्मा यांनीं आपलीं कांहीं चित्रें काढतांना माधवरावांचा उपयोग करून घेतला होता. गंगावतरण चित्रांतला शंकर, वेणीसंहारांतला भीम म्हणजे माधवराव पाटणकर होत.

एकदां कांदेवाडींतील केशवजी नाइकाच्या चाळींतील गणेशोत्सवांत लो. टिळकांचें व्याख्यान झालें, तेव्हां माधवराव पाटणकर तेथें उपस्थित होते. व्याख्यान संपल्यावर पाटणकरांनीं छोटेंसें भाषण केलें. ते म्हणाले, "इतर थोर थोर पुढाऱ्यांचीं स्मारकें त्यांच्या मृत्यूनंतर केलीं जातात, परंतु माझें असें मत आहे कीं बळवंतरावांचें स्मारक त्यांच्या हयातींतच झालें पाहिजे, आणि त्या कामीं माझा पहिला आंकडा पांचशें रुपयांचा." त्या वेळचे ५०० रु. म्हणजे हल्लींचे ५००० रु. हें वाचकांनीं लक्षांत ठेवावें.

शेवटीं, माधवरावांच्या एका नाटकांतील स्टोकचानें किर्लोस्करांच्या मृच्छकटिकांतील चारुदत्ताचें (भाऊराव कोल्हटकर यांचें) शूलारोपण पांच मिनिटें कसें लांबणीवर टाकलें होतें, तेंहि सांगून हें लंब्यमान होत चाललेलें नाट्यस्मृतिपुराण संपवितों. एकदां, ग्रँटरोडवरील न्यू एल्फिन्स्टन थिएटरांत किर्लोस्करांच्या मृच्छकटिक नाटकाचा प्रयोग सुरू होता व त्याच वेळीं शेजारच्या रिपन थिएटरांत पाटणकरांच्या वैनतराजाचा प्रयोग सुरू होता. मृच्छकटिकांत भाऊराव कोल्हटकरांनीं चारुदत्ताची भूमिका घेतली होती. त्याचा सुळावर रोहसेन त्याला बिलगून उभा राहिला होता. "बाळा घालेनियां गळां हे कुसुमांनीं माळा" हें अत्यंत करुणरसपूर्ण पद चारुदत्त (भाऊराव) म्हणत होते आणि टांचणी पडली असती तर तिचाहि आवाज ऐकूं आला असता, इतकी स्मशानशांतता नाट्यगृहांत निर्माण झाली होती, तोंच शेजारच्या रिपन थिएटरांत कोणाचें तरी युद्ध सुरू होऊन मोठमोठे वीर उडाले, बँड वाजूं लागला व योद्ध्यांच्या कर्कश गर्जना होऊं लागल्या. त्या गोंगाटामुळें इकडे चारुदत्ताचें गायन बंद पडलें! तो गोंगाट बंद होईपर्यंत, —तसल्या त्या कारुणाजनक प्रसंगींहि स्मितास्य चारुदत्त स्मित हास्य करीत रंगभूमीवर पांच मिनिटें स्तब्ध उभा होता. शेवटीं, पाटणकरांच्या नाटकांतला कोणी तरी योद्धा मरण पावला किंवा त्यांचा तह झाला आणि तो गोंगाट बंद झाला, तेव्हां चारुदत्ताचें गायन पुनः सुरू झालें.



## खु ळे प णा

मेघ सावळा फुलारूंनिया गहिंवरला अम्बरीं
कलत्या रविचें ऊन विंचरित आल्या श्रावणसरी
तुषार चुम्बुन किरण कोवळे कलती पूर्वेकडे
वसुन्धरेला इन्द्रधनूचें स्वप्न गुलाबी पडे

खुळा होऊनी मेघ डंवरुनी नाचे मोरापरी
गिरक्या घेउन मन्द उतरती या सोनेरी सरी
सरीस फुटतें हास्य उन्हाचें उन्हास अश्रू झरी
निसर्गांतल्या खुळेपणाची गम्मत ही गोजिरी

नकोस ढाळूं अश्रु लाडके, दुःखानें स्फुन्दुन
ऊन नि पाउस खेळ खेळती व्यापुनिया जीवन
उघड लोचनें, निसर्ग सांगे तुजला कांहींतरी
खुळेपणाविण जीवनांतली कळेल का माधुरी ?

ये बाहेरी जरा बुद्धिच्या जाचक जाळ्यांतुनी
अन्तरांतली जागी जाणिव निजवी थोपटुनी
खुळेपणानें गाफिल होउन पहा जरा जीवन
कळे तुयांतिल गोडी वेड्या भावुक दृष्टींतुन

पहा अजुनहि मेघ उपणितो तुषार मोत्यापरी
अजुन लावितो रवि क्षितिजांना सोनेरी झालरी
निळ्या घनांतुन घननीळाचे भास किती पांगले
पूर्वेवरती म्हणुन सुदर्शन अजुनी खोळम्बलें

विस्मित होउन हांसुन बघते ही ओलेती धरी
भिजून सुकते, सुकून भिजते, सुकते, भिजते जरा
तवंग ओला बघे किलकिला चमकत पानांवरी
रडतां रडतां येइल हंसतां कसें धरित्रीपरी

नकोस पाहूं केवळ विज्ञानाच्या दृष्टींतुन
पहा जरा या इन्द्रधनूच्या रंगित भुवईंतुन
खुळेपणाची झांक मिळूं दे जरा लोचनान्तरीं
जीवन-मर्मं तुला सांगतिल तेव्हां श्रावण-सरी !

शंकर वि. वैद्य




हॉटेलमधून चहा पिऊन बाबूराव बाहेर आला आणि मस्तपैकी सिगरेट ओढीत फूटपाथवर उभा राहिला. तो उभा राहिला होता त्या ठिकाणाहून कितीतरी गोष्टी सहजगत्या दिसत होत्या. त्याच्या अंगावरून गेलेला भला मोठा रस्ता जरा बाजूला जाऊन वळण घेत होता. वळणावर भाजीमार्केट होते आणि जरा पलीकडे देऊळ होते. बाबूरावाची चंचल दृष्टी भराभरा फिरत होती. पाहण्यासारखे कांही आढळले कीं आधाशीपणें तें टिपले जात होते. कुणी देखणी वा बांधेसूद शरीराची बाई आढळांत आली कीं दृष्टी तिच्यावर स्थिर होत होती, तिच्या नितंबाच्या लयदार हालचालीत गुंतून पडत होती आणि गुंतुन पडलेली दृष्टी, बाई दिसेनाशी होईपर्यंत तिच्याबरोबर लोचटपणें खेचली जात होती. अशारीतीनें बाबूराव जाणाऱ्या-



---

**पहिल्या प्रहरच्या ज्या गुलाबी सावलीनं रावेला**

**एकेकाळीं गुदगुल्या केल्या होत्या तीच आतां तिची**

**कात्यावरून–रक्तबंबाळ होईपर्यंत–फरपट काढीत होती !**

---

येणाऱ्या बायकांकडे पहात होता आणि आजूबाजूचे लोक बाबूरावाकडे पहात होते. त्यानें कमरेभोंवती लुंगीसारखें कांहींतरी गुंडाळले होते. आणि वरती कफनी चढवेली होती. डोक्याचे केंस मानेपर्यंत लोंबत होते आणि दाढी वाढ

भर वाढली होती. चिपाडासारख्या फाटक्या शरीराच्या आणि गुंजेसारख्या तांबारलेल्या डोळ्यांच्या ह्या माणसानें असें अधाशीपणें बायकांकडे पहावें ह्याचें लोकांना थोडें आश्चर्य वाटत होतें

. पहात पहात बाबूरावाच्या दृष्टीनें कांहीं वेध घेतला. त्यांच्या दुसऱ्या टोंकाकडून येणाऱ्या बाईकडे त्यानें निरखून पाहिलें. पुन्हां पुन्हां पाहिलें. जळती सिगारेट त्यानें बाजूला फेंकून दिली, वाढलेल्या दाढीतून हात फिरवला आणि कांहींतरी विचार करीत जरा आडोशाला, पानपट्टीच्या दुकानापाशीं येऊन तो उभा राहिला..

रस्त्यावरून जाणारी बाई घाईघाईनें मार्केटकडे जात होती. नेहमींप्रमाणें नाकासमोर पाहून चालत होती. तिला आपल्याकडे कुणी पहात आहे ह्याची कल्पनाहि नव्हती. बाबूरावाच्या अंगावरून ती जेव्हां मार्केटच्या बाजूनें निघून गेली तेव्हां तो पुढें आला आणि दूर जाणाऱ्या तिच्या पाटमोऱ्या आकृतीकडे पाहूं लागला. पाहतां पाहतां ती गर्दींत मिसळली आणि दिसेनाशी झाली. ती जशी दिसेनाशी झाली तसा बाबूराव तुरु तुरु चालत मार्केटच्या बाजूनें गेला आणि नाक्यावर जाऊन उभा राहिला. हा नाका म्हणजे मोक्याची जागा होती. तिला कोठेंहि जावयाचें असलें तरी नाक्यावरून जाणें भाग होतें. बाबूराव असा थोडा वेळ उभा असेल नसेल तोंच ती भाजी घेऊन परत फिरली. आणि त्याच्यावरून, अगदीं जवळून ती पुन्हां एकदां निघून गेली.

ती देवळाच्या बाजूनें गेली तेव्हां त्याला वाटलें कीं ही देवळांत शिरली तर किती बरें होईल! तिथें विशेष कुणी नसेल. तिला भेटतां येईल. चार गोष्टी बोलतां येतील. बाबूरावाच्या अपेक्षेप्रमाणें ती देवळांत शिरली पण आंत शिरतांना तिनें कावऱ्याबावऱ्या नजरेनें मागें वळून पाहिलें. अशा तऱ्हेनें पाहिलें कीं जणुं कांहीं कुणी तिच्या पाळतीवर होते, तिचा पाठलाग करीत होते. बाबूरावाच्या हें लक्षांत आलें तेव्हां त्याला वाटलें कीं तिनें आपल्याला पाहिलें तर नसेल?

बाबूराव आजूबाजूला पहात देवळाकडे गेला आणि पटकन् आंत शिरला. सभामंडप रिकामा होता. आंतहि देवापाशीं कुणी नव्हतें. ती देवापुढें हात जोडून उभी होती. बाबूराव हलके हलके आंत गेला आणि तिच्या पाठीशीं जाऊन उभा राहिला. देवासमोर उभी राहून ती तोंडानें कांहींतरी पुटपुटत होती. मधूनच जोडलेले हात मोकळे करून आपल्या गालाला लावीत होती; पुन्हां जोडीत होती आणि देवाची क्षमा मागत होती. त्याला वाटलें कीं तिच्या खांद्याला स्पर्श करावा आणि तिला 'राधा' म्हणून हांक मारावी. पण त्यानें तिला स्पर्श केला नाहीं व हांकहि मारली नाहीं. घंटेचा आवाज झाला तेव्हां तिनें एकदम मागें वळून पाहिलें आणि 'बाबू' असा अस्पष्ट, भीतियुक्त उद्गार नकळत तिच्या तोंडून बाहेर पडला.

"राधा, ओळखलंस मला?"

"हो. पण तूं इकडे कुठें!"

"असाच. तुझ्यासारखा. जशी तूं देवळांत आलीस तसाच मीहि आलो. फरक एवढाच कीं तूं देवाला भेटायला आलीस आणि मी तुला भेटायला आलो." बाबूराव बोलत होता आणि ती नुसती त्याच्या चेहऱ्याकडे पहात होती. पाहतां पाहतां तिचा चेहरा पांढरा फटफटीत पडला. ती कांहीं बोलली नाहीं. त्याची दृष्टी टाळून ती बाजूला पहात होती आणि तो तिच्या-कडे पहात होता. शेवटी तिनें त्याच्याकडे पाहिलें आणि म्हटलें, "जाऊं दे मला. कुणी पाहील..." ह्यावर त्यानें आजूबाजूला पाहिलें, "पण इथं तर कुणी नाहीं." आणि मग कांहींतरी आठवून स्वतःशींच हंसून त्यानें विचा-रलें, "अशा गोष्टींना देवळासारखी दुसरी जागा नाहीं. आणि ते तुला तर फार चांगलें ठाऊक आहे; खरं कीं नाहीं?" त्याच्या बोलण्याचा आशय ध्यानीं आला तेव्हां ती जास्तच कावरीबावरी झाली. काकुळतीला येऊन म्हणाली, "त्यांची घरीं यायची वेळ झाली आहे...."

तिच्या काकुळतीची त्याला गंमत वाटली. पण तसें न दाखवतां त्यानें विचारलें, "नवऱ्याला फार घाबरतेस असं दिसतं?"

तिनें उत्तर द्यावयाचें टाळलें आणि म्हटलें, "जाऊं दे मला. मुलंहि घरीं आलीं असतील..."

"मुलं!"

त्याच्या उद्गारवाचक प्रश्नांतली सूचित भाषा उमजण्याइतपत ती हुशार होती. तिला वाटलें कीं आतां बोलणें वाढवण्यांत अर्थ नाही. कांहीं तरी करावें आणि त्याला वाटेला लावावें. तिनें त्या उद्देशानें त्याला म्हटलें, "देवासमोर आपण हीं अशी किती वेळ उभी आहों...." तिचें वाक्य पुरें व्हायच्या आंतच त्यानें म्हटलें, "पण नुसतींच उभीं आहों..." आणि तो हंसूं लागला. ह्या खेपेला मात्र त्याच्या बोलण्यांतली खोंच तिला पुरेपूर कळली. तिला वाटलें कीं आता ह्याच्यापुढें कांहीं शहाणपणा चालणार नाहीं. आतां त्याच्या कलानें वागून सुटका करून घेतली पाहिजे. तिनें बाजूला एका कोपऱ्याकडे बोट दाखवलें आणि म्हटलें, "आपण त्या बाजूला उभीं राहूं म्हणजे कुणी पाहणार नाहीं. आणि मग ती दोघं जरा बाजूला कोपऱ्यात जाऊन उभी राहिलीं. थोडावेळ दोघंहि स्तब्ध होतीं. योग्य अंतर राखून एकमेकापासून दूर उभी होती. शेवटी त्यानें थोडं पुढं आल्यासारखं केलं आणि विचारलं, "मी तुला कांहीं विचारलं तर तूं खरं उत्तर देशील?"

"हो..."

"मी दिसलो तेव्हां तू मला टाळायचा प्रयत्न केलास; खरं?"

"खरं..."

"कारण?"

"कारण—"

तिचा खंबीरता शब्द ऐकून त्यानं दांताखालीं ओंठ दाबला आणि म्हटलें, "माझी तुला भीति वाटली. आणि तूं माझा तिरस्कारहि करतेस!"

"खरं आहे—" ती एकदम बोलून गेली. तिला वाटलं कीं असं

बोलायच्यास चुकी होतं. "पण भावनेच्या आवेगांत शब्द सुटून गेले होते. त्याने तिच्या शरीरावरून दृष्टि फिरविली आणि म्हटलें, "पण आताहि कारण नाहीं सांगितलंस !"

आतां कारण सांगणें भाग होते. तिनें त्याची दृष्टी टाळून म्हटलें, "तें मींच सांगितलं पाहिजे असं नाहीं. तें जसं मला ठाऊक आहे तसं तुलाहि ठाऊक आहे. तुला ओळखणाऱ्या साऱ्या लोकांना ठाऊक आहे—"

तो एकदम चिडला आणि म्हणाला, "मला ओळखणारे झक् मारतात. तुझं कारण मला हवं आहे !"

ती एकदम दचकली. इतर बोलतात त्यापेक्षां निराळं असं ती काय सांगणार होती. तिनें त्याच्याविषयीं ऐकलं होतं आणि वर्तमानपत्रांत वाचलं होतं त्यावरूनच ती त्याचा तिरस्कार करूं लागली होती. पांचसहा वर्षांपूर्वी वर्तमानपत्रांत वाचलेली, त्याच्याविषयींची खळबळजनक बातमी तिला आठवली तेव्हां ती म्हणाली, "मागें तुझ्याविषयीं वर्तमानपत्रांत कांहीं भलतंसलतं छापून आलं होतं—"

"म्हणजे भर रस्त्यावर एका सुंदर मुलीचा मी मुका घेतला होता आणि माझ्यावर विनयभंगाची केस झाली होती, तेंच ना ?"

"हो—"

"ती तर फार जुनी गोष्ट झाली. त्यानंतर कितीतरी गोष्टी माझ्याविषयीं छापून आल्या होत्या. त्या नाहीं वाचल्यास ?"

"वाचल्या—"

"आणि त्या साऱ्या तुला खऱ्या वाटल्या ?"

"हो—"

"म्हणजे मी नायकांच्या पाठीवर असतो, त्यांचा गैरफायदा घेतो, दारू पितो, जुगार खेळतो, ह्या साऱ्या गोष्टी तुला ठाऊक आहेत." त्याच्या ह्या बोलण्यावर ती अगदीं गप्प राहिली. तोच थोडा वेळ थांबला आणि म्हणाला, पण मी हा असा कां झालो हें नाहीं विचारलंस ? शाळा कॉलेजांत शिकायचं सोडून मी हा असा भणंगासारखा कां भटकतो, आयुष्यांत मी हा असा कां उधळलों, नायकांची अशी पारध कां करतो ह्याचा कधीं विचार केलास ?"

"नाहीं. आणि तसा विचार करण्याचं आतां कारण तरी काय ?"

"छे छे ! तसं कारण कांहीं नाहीं. तूं विचार करूं नये हेंच चांगलं." तो चिडीनें बोलत होता. ती ऐकत होती. "मला वाटलें कीं फक्त त्याच वेळीं तूं स्वार्थी होतीस पण आजहि तूं तेवढीच स्वार्थी आहेस. तुला माझा तिरस्कार वाटतो; द्वेष वाटतो. पण ज्या एका गोष्टीनें मला असं सैराट केलं ती गोष्ट मात्र तुला आठवत नाहीं." त्यानें पटकन तिच्या खांद्यावर हात ठेवला, तिच्याकडे रोखून पाहिलं आणि विचारलं, "ती गोष्ट तुला आठवते ?"

ती गोष्ट तिला चांगली आठवत होती. सहजासहजी विसरून जावी अशी कांहीं ती साधीसुधी गोष्ट नव्हती. सातआठ वर्षांपूर्वी, देवळाच्या गाभाऱ्यांत काय घडलं होतं हें तिला चांगलं आठवत होतं. आणि जें घडलं त्याला जबाबदार कोण हेंहि तिला चांगलं ठाऊक होतं. पण आतां इतक्या वर्षांनंतर बोलून असें सेऊन त्या गोष्टीचा उल्लेख करावा हें तिला आवडत नव्हतं. त्या गोष्टीचा पुन्हा पुन्हा उल्लेख करून तो काय बोलत आहे हें तिला कळत नव्हतं. तिनें त्याला तसं विचारलं तेव्हां तो ताडकन म्हणाला, मी असा कां वागतो, मी असा कां झालो हें तुला ठाऊक आहे. ह्या माझ्या अधःपाताला तूं कारण आहेस समजलीस ?" त्याचें तें बोलणें ऐकून ती एकदम दचकली तेव्हां त्यानें म्हटलें, "पहा, दचकलीस.



# अजब आंगळी

किितक भेटल्या हिची परंतू
अजब आंगळी नन्हा नवीन
ओठांहुनिही नटेल डोळे
छटेल भाषेमध्यें प्रवीण

नसे भरंवसा कशा मिषानें
हंसून पाडिल फर्शी कुंपास
कधीं अकारण करून गहजब
रुसून लावील जिवास फांस

होकाराची हिच्या न खातर
हमेश कातर धरा जमेस
धीर धिटाई असेल तर मग
तशीच वाणहि नसे क्षमेस

नकारांतहि प्रकार अगणित
नित्य जागवी नवे विकार
चुकार शब्दांतुनी परंतू
सवेंच विझवी आग विखार

पाण्यापरि ही अवखळ चंचळ
क्षणाक्षणाला नवीन रंग
कधीं निथळती, कधीं विथरती
हिचे सांवळे निळे तरंग

असे तरी ती तशीच निर्मळ
कधिं न मावळे हिचा प्रसाद
कसेंहि जग बोललें तरी तिज
नसे तयाचा खेद–विषाद

जळपूजक मी वसुनि सांजचा
जळीं पूजितो तिचेंच रूप
काळोखाच्या तशा निवांतीं
मनांत माझ्या जळतो धूप

अशा घडीला येउन मागुन
गळ्यांत ही मम घालि हात
वळुनी दिसतां दिसे लोचनीं
पाण्यांतहि जळते फुलवात

बा. भ. बोरकर

म्हणजे तुझ्या अपराधाची तुला जाणीव आहे. नसत्या वयांत माझ्याशीं नसते खेळ खेळलीस. नको त्या गोष्टी मला शिकवल्यास. मला पेटवून दिलंस आणि बाजूला झालीस. कशाकरतां केलंस हें सारं? त्यावेळीं तशी वागलीस ती स्वार्थासाठीं आणि आजही अशी वागत आहेस, माझा तिरस्कार करीत आहेस तेंहि स्वार्थ साधण्यासाठींच!" त्याच्या ह्या बोलण्यावर ती रडवेली झाली आणि म्हणाली, "त्या जुन्या गोष्टी आतां बोलण्यांत काय अर्थ आहे?" तिच्या ह्या प्रश्नावर तो भडकून उठला, "मला ठाऊक आहे. मी आयुष्यांत उधळलों, बदनाम झालों. खरं आहे. स्त्रीच्या मागें लागलों, अवघ्या आयुष्याची आणि शरीराची नासाडी केली, खरं आहे. पण हें असं कां झालं? त्या वेळीं तूं माझ्या आयुष्यांत नग्न मनानं आली नसतीस तर कुणीं सांगावं, माझ्याहि आयुष्याला वेगळं वळण लागलं असतं. आज इतक्या वर्षांनंतर ह्या गांवीं आलों आणि तूं दिसलीस. वाटलं माझं हें उनाड आयुष्य, ह्या उनाड आयुष्याचं कारण तूं तरी समजूं शकशील. तुझ्याजवळ मी दुसरं कांहीं मागणार नव्हतों. फक्त तुझ्या सहानुभूतीची भीक मागणार होतों. पण तूंहि मला लाथाडलेंस. माझा तुला तिटकारा येतो; तिरस्कार वाटतो." तो बोलतां बोलतां थांबला आणि तिच्याकडे तुच्छतेनें पाहून म्हणाला, "मी तुझ्या घरीं येणार आहे! तुझ्या घरीं, समजलं?" त्याचे ते विलक्षण आवेगानं उच्चारलेले शब्द ऐकून ती दचकली. आणि तिनें आजूबाजूला पाहिलें. देवळांत आतां लोक येऊं लागले होते. त्या ठिकाणी, तशा स्थितींत उभे राहणं अयोग्य होते. तिच्या मनांत आलें कीं घरीं नवरा आणि मुलें केव्हांच परत आली असतील. आतां ताबडतोब घरीं जाणे भाग होते. पण मनांत आले तरी घरीं कसें जावयाचें! पुढ्यांत उभा असलेला सैतान, 'तुझ्या घरीं येणार!' म्हणून तिला निर्लज्जपणें संकेत करीत होता. त्याला टाळणें आतां शक्य नव्हतें ह्याची जाणीव तिला झाली होती. तिनें अगतिकपणें त्याच्याकडे पाहिलें आणि म्हटलें, "आतां नको. घरांत ते आहेत, मुलं आहेत..." ह्यावर तो जरा पुढें सरकला आणि हलक्या आवाजांत म्हणाला, "तूं सांगशील तेव्हां येईन. एकदांच येईन. मग पुन्हा येणार नाहीं. पण एकदां मात्र निश्चित येणार आहे. केव्हां येऊं? उद्यां दुपारी?" आणि तो मिस्किलपणें हंसला. तिनें कसेंबसें त्याला दुसऱ्या दिवशीं येण्याविषयीं सांगितलें आणि बाहेर जाण्यासाठीं ती एकदम बाजूला वळली. त्यानें पटकन् तिचा हात धरला; आणि सोडून दिला. ती लगबगीने बाजूला झाली. आपल्याकडे कुणी पहात नाहीं ह्याची तिने एकंदर खात्री करून घेतली आणि घाईघाईनें ती देवळाबाहेर पडली.

ती देवळाबाहेर पडली आणि जवळ जवळ धांवत पळतच ती घरीं आली. एकदाहि तिनें मागें वळून पाहिले नाहीं. ती घरांत शिरली आणि ताबडतोब तिने दरवाजा लावून घेतला. अशा घाईने कीं जणूं कांहीं तो तिच्या पाठोपाठ आला होता; ती घरांत शिरल्यावर तो घरांत शिरणार होता आणि नवऱ्याच्या देखत भलतेंच कांहींतरी निर्लज्जपणें तिच्याजवळ मागणार होता. बंद दरवाजाला टेंकून ती उभी राहिली. ती अशी उभी राहिलेली पाहून आंत खेळत असलेली तिची दोन्ही मुलें धावत धावत तिच्यापाशीं आलीं आणि विचारूं लागलीं, "आई, कुठें गेली होतीस? आम्ही किती वेळ तुझी..." मुलांचें वाक्य पुरं व्हायच्या आंतच मुलांचे वडील पुढें आले आणि तिला विचारूं लागले, "किती हा उशीर! होतीस तरी कुठें इतका वेळ?"

मैत्रिणीकडे बसायला गेले होते म्हणून तिनें नवऱ्याला थाप मारली आणि ती तडक सैपाकघरांत गेली. नवऱ्याने उगाच जास्त विचारपूस केली नाहीं. तो पुन्हा आरामखुर्चीवर बसून वर्तमानपत्र वाचूं लागला. मुलें पुन्हा खेळांत दंग झाली. आणि सैपाकांत रमल्याचें ती सोंग वठवूं लागली. पण हेंहि तिला जमेना. तिला वाटूं लागलें कीं जें घडलें, बाबू जें बोलला तें कुणापाशी तरी सांगावें, पण जें घडलें तें इतके विचित्र होतें आणि जें घडलें तें इतकें नाजुक होते कीं त्याचा कुणापाशीं उच्चार करणेंहि तिला जमलें नसतें. आणि जरी धीर केला तरी बोलावयाचें कोणापाशीं? दुसरी एखादी गोष्ट असती तर ती नवऱ्याजवळ बोलली असती, स्फुंदून स्फुंदून रडली असती आणि मनावरचा भार तिने हलका केला असता. ही गोष्ट तर अशी होती कीं नवऱ्याला जरासुद्धां संशय येणार नाहीं अशा खुबीनें वागणे जरूर होते. नवऱ्याला पुसट जरी शंका आली असती तरी भरल्या संसारांतून तिला उठावें लागणार होतें, संसाराचा डोलारा कोसळून पडणार होता आणि चार चौघांत तिची निर्भर्त्सना होणार होती. तिनें आपल्या भरल्या संसारावरून एकदां दृष्टी फिरवली. तिला वाटलें कीं आपल्याकडे पाहून नवरा हंसत आहे. त्याने आपल्याला टाकून दिलें आहे. आपली आई कुलटा आहे हें मुलाना कळलें आहे. हा संसार आता आपला नाही, हा नवरा आता आपला नाही, हीं मुलं आतां आपली नाहींत. मोठ्या हौसेने जमवलेल्या ह्या हजारों वस्तू आता आपल्या नाहींत. हें सारं लोकांचं आहे. दुसऱ्याचं आहे.

रात्रीं अंथरुणावर पडल्यावर, सातआठ वर्षांपूर्वीं देवळांत घडलेला प्रकार तिच्या दृष्टीसमोर उभा राहिला. त्यावेळचा बाबू आणि संध्याकाळीं तिच्यासमोर उभा राहून हक्काची भाषा बोलणारा बाबू ह्या दोघांत केवढें अंतर होतें! तिला वाटलें आपण त्यावेळीं तसें वागावयास नको होतें. भावना आवरावयास हव्या होत्या. त्यावेळीं तें तसें आपल्या हातून घडलें तरी कसें! लाज सोडून आपण बाबूला जवळ तरी कसा केला! कांहींच कसें वाटलें नाहीं! विचाराच्या भरांत तिनें स्वतःची खूप निर्भर्त्सना केली. त्यासाठीं, तिला घडल्या प्रकाराबद्दल पश्चात्ताप वाटूं लागला. पण आतां त्याला कांहीं इलाज नव्हता. चूक एकदाच झाली असली तरी आतां ती निस्तरणें भाग होते. भरल्या संसारांत ताठ मानेनें वावरावयाचें म्हणजे त्याला एकच मार्ग होता. बाबू सांगेल ते ऐकणें तिला भाग होते. तो मागेल तें देणें जरूर होते.

दुसऱ्या दिवशीं मुलें शाळेंत निघून गेली आणि नवरा ऑफीसांत गेला तेव्हां तिला जरा हायसें वाटलें. हळूं हळूं दुपार वर येत होती. बाबू कोणत्याहि क्षणी येण्याची शक्यता होती. ती उगाचच आंतबाहेर करीत होती. तिची छाती धडधडत होती. तसें पाहिलें तर बाबू तिला तसा कांहीं परका नव्हता. पण तो ज्या परिस्थितींत येणार होता ती स्थिति मोठी चमत्कारीक होती. तिला वाटलें कीं ह्या स्थितींतून आतां आपली लौकर सुटका व्हावी, त्यानें यावें, हवें ते घ्यावें आणि निघून जावें म्हणजे आपल्या मनावरचा हा ताण तरी कमी होईल, हा संसार आपला आहे ही भावना पुन्हा निर्माण होईल, कुणाची भीती राहणार नाहीं, आपल्या नवऱ्याबरोबर आणि आपल्या मुलांबाबत पुन्हा पूर्वीच्या समरसतेनें वावरतां येईल. तिचे असे विचार चालू असतांच दारावरची वेल वाजली. ती घाईघाईत उठली आणि दरवाजापाशीं गेली. क्षणभर ती कावरीबावरी झाली. हृदय धडधडूं लागले. तिला वाटलें कीं डोळ्यांपुढें अंधारी येत आहे. पायाखालची जमीन निसटत आहे. तिनें भिंतीचा आधार घेऊन. क्षणभर ती तशीच तेथें उभी राहिली. दारावरची वेल पुन्हा वाजली तेव्हां ती पुढें झाली आणि तिनें दरवाजा

उघडले. दरवाज्यांतू उभा असलेला बाबू एकदम आंत आला.

तिनें दरवाजा बंद करून घेतला आणि त्याच्याकडे पाहिलें. तो तिच्याजवळ आला आणि कळवळून म्हणाला, "राधा—"

ती असहाय्यतेनें थरथरत बाजूला उभी होती.

तिला आपल्याजवळ ओढून घेत तो म्हणत होता, "राधा, मला तूं हवी आहेस—तुझं सर्वस्व आज मला हवं आहे! एकच क्षण—पण तूं माझी आहेस—संपूर्ण माझी आहेस असें मला वाटूं दे!" तिनें प्रतिकार केला नाहीं. ह्या प्रसंगाला ती तयार होती. हा प्रसंग लवकर आटपावा असेंच तिला वाटत होतें. बाबूनें तिला एकदम बाहुपाशांत घेतली, तिचें चुंबन घेतलें आणि तिच्या कानांत कांहीं तो पुटपुटला. त्याच्या ह्या बोलण्याची तिला शिसारी आली. त्याच्या बोलण्याचीच काय पण त्याच्या अवघ्या देहाची तिला शिसारी आली. तिला वाटलें कीं त्याला दूर लोटून द्यावें आणि हें सारें घरदार सोडून कुठेंतरी चालते व्हावें. परागंदा व्हावें. आणि देहाची ही विटंबना थांबवावी.

—सुडाची संतृत नजर फेकीत जास्त कमी कांहीं न बोलतां दरवाजा उघडून बाबू बाहेर निघून गेला. तिनें एवढा वेळ आवरून धरलेला हुंदका एकदम बाहेर पडला. दरवाजा बंद केला आणि ओक्साबोक्शी ती रडूं लागली. रडत रडत ती आंतल्या खोलींत पलंगापाशीं आली तेव्हां तिला वाटलें कीं हा पलंग, ही पलंगावरची गादी, ह्या दोन्ही उशा हें सारं कांहीं घराबाहेर फेंकून द्यावं. दृष्टीसमोरून नाहींसं करावं. आणि न्हाणीघरांत जाऊन त्या ओंगळ पशूच्या नांवानें आंघोळ करावी.

दिवसभर ती तशीच खिन्न होती. पण संध्याकाळीं नवरा आणि मुलें घरीं आलीं तेव्हां तिला जरा मोकळें वाटूं लागलें. पुन्हा ती संसारांत रमली. मुलांबरोबर हसूं खेळूं लागली आणि नवऱ्याभोंवती घोंटाळूं लागली. अशा तऱ्हेनें कीं दुपारीं घरांत कांहीं झालें नव्हतें, कुणी आलें नव्हतें, आणि तिनें अपराधी मुद्रा धारण करावी असें कोणतेंच गैरवर्तन तिच्या हातून घडलें नव्हतें. तिच्या संसारावर संकट आलें होतें तें तिनें मोठ्या खुबीनें परतून लावलें होतें. आतां भरल्या संसारांतून उठण्याची भीति नव्हती. तिच्याकडे बोट दाखवून कुणी कांहीं बोलण्याची आतां धास्ती नव्हती. आतां संसार तिचा होता. नवरा तिचा होता. दोन्ही मुलें तिचीं होतीं आणि ती त्यांची होती. हें सारें खरें! पण तिनें विचार केला तेव्हां तिला वाटलें कीं ह्या संसारासाठीं आपण केवढें मोठें मोल दिलें आहे! केवढें मोठें दिव्य केलें आहे!

पुढें चारआठ दिवस ती नाना तऱ्हेनें संसारांत रमली. नाना तऱ्हेनें तिनें मुलींचे लाड केले आणि नवऱ्याला सुख दिलें. अशा तऱ्हेनें ती वागत होती कीं उत्साह नुसता ओसंडून वहात होता. तिच्या ह्या वागणुकीचें नवऱ्यालाहि आश्चर्य वाटलें. त्यानें तिला त्याविषयीं विचारलें तेव्हां उलट तिनेंच नवऱ्याला विचारलें, "तुम्ही माझे आहां ना! मी तुमची आहे ना? आपण दोघं एकमेकांचीं आहों ना! हीं मुलं आपलीं आहेत ना!" तिच्या ह्या प्रश्नांचें नवऱ्याला आश्चर्य वाटलें. तो थोडाफार दचकला. त्याला वाटलें कीं हिनें आपल्याला असें कां विचारावें! उभ्या आयुष्यांत असें तिनें आपल्याला केव्हांच विचारलें नव्हतें आणि आजच कां विचारावें?—

पण तिचा हा उत्साह चारच दिवस टिकला. पुढें तिला थकल्यासारखें वाटूं लागलें. ओटीपोटांत दुखत असल्याची जाणीव होऊं लागली. थोडा तापहि येऊं लागला. आपल्याला आतां कांहींतरी मोठें दुखणें येणार आहे ह्याविषयीं तिची खात्री झाली. तिला एक तऱ्हेची भीति वाटूं लागली. हें असें कां व्हावें तिला कळेना. शेवटीं नवरा रात्रीचा घरीं आला तेव्हां तिनें डोळ्यांत पाणी आणलें आणि म्हटलें, "ताप येतो. ओटीपोटांत दुखतें..."

"आणखी काय होतें?"

"आणखी पुष्कळ होतें!" ह्यावर त्यानें तिच्या केंसांतून हात फिरवला आणि धीर देण्याकरतां म्हटलें, "तूं घाबरूं नको. उद्यां लेडी डॉक्टरला दाखवूं आणि तुला बरी करूं—"

लेडी डॉक्टरनें तिला बराच वेळ तपासली. नानातऱ्हेचे प्रश्न विचारले. पुन्हा पुन्हा तपासलें आणि पुन्हा पुन्हा प्रश्न विचारले. डॉक्टरीणबाईंनीं नुसत्या लक्षणावरूनच रोगाचें निदान निश्चित केलें होतें. पण ज्या बाईच्या ठिकाणीं हा रोग जडला होता ती घरंदाज होती, कुलीन होती. त्यामुळें पक्की खात्री झाल्याशिवाय निर्णय देणें उचित नव्हतें. शेवटीं तपासणी पुरी झाली तेव्हां घाईघाईंत तिनें डॉक्टरीणबाईंना विचारलें, "काय झालें आहे? मी बरी होईन ना!" पण तिच्या प्रश्नाकडे दुर्लक्ष करून डॉक्टरीणबाई बाहेरच्या खोलींत तिचा नवरा बसला होता त्या ठिकाणीं गेल्या आणि हलके हलके कांहींतरी सांगूं लागल्या.

उठवत नव्हतें तरी ती जागेवरून उठली. दरवाजाआड उभी राहिली आणि डॉक्टरीणबाई काय सांगतात तें जिवाचे कान करून ऐकूं लागली.

डॉक्टरीणबाईंनीं बाहेरच्या खोलींत जें सांगितलें तें ऐकून ती एकदम दचकली. तिला वाटलें कीं हा आघात सहन न होऊन, नवरा आंत यायच्या आंतच आपण खालीं पडणार आहों. क्षणाक्षणाला आपली शुद्ध नाहींशी होत आहे आणि डोळ्यापुढें अंधारी येत आहे. ह्या अशा स्थितींतच, नवऱ्यानें कांहीं विचारण्यापूर्वी आपलें बरेवाईट झालें तर किती चांगलें होईल! हें काय आणि कसें झालें तें नवऱ्याला सांगावें तरी लागणार नाहीं. आपलें हें काळें तोंड नवऱ्या देखत जगाला दाखवावें लागणार नाहीं. पण तिच्या मनाविरुद्ध, नकळत तिनें फळीचा आधार घेतला आणि तशीच कांपत, थरथरत ती तेथें उभी राहिली. तिला वाटलें कीं नवऱ्यानें आंत यावें आणि घडल्या प्रकाराचा एकदां सोक्षमोक्ष लावावा, आपली निर्भर्त्सना करावी आणि घराबाहेर हाकून द्यावें. पण नवरा आंत येण्याचें लक्षण दिसेना. तिनें भीत भीत दरवाजाच्या फटींतून बाहेर वाकून पाहिलें. कपाळाला हात लावून तो खुर्चीवर बसला होता. त्याच खुर्चीवर कीं ज्या खुर्चीवर बसून बाबूनें कांहीं मागितलें होतें आणि तें देतांना तिनें त्याला अव्हेरलें आर्जविलें होतें. आणि असतां त्यानें खुर्चीवर बसून नवरा तिचा अव्हेर करणार होता, चालती हो म्हणून सांगणार होता. आणि तें तिला ऐकावें लागणार होतें. कुलटा म्हणून लोक तिच्याकडे बोट दाखवणार होते आणि तें तिला सहन करावें लागणार होतें. अरेरे, अब्रूनें जगण्याच्या आणि संसारांत राहण्याच्या मोहानें आपण हें काय करून घेतलें?

बाहेरल्या खोलींत कपाळाला हात लावून नवरा अगदी हताश बसला होता. त्याला वाटलें कीं अरे, हें काय झालें? नशीबानें हा असा कसा दावा साधला? हें असें कसें झालें! कुठल्या तोंडानें तिच्याजवळ जाऊं आणि हें काळें तोंड तिला दाखवूं? तिला काय सांगूं? एकदांच कां होईना, पण घरातल्या ह्या सोन्यासारख्या गृहलक्ष्मीला लाथाडून चौकनाक्यावरल्या गांव-लक्ष्मीकडे जायची दुर्बुद्धि मला कोठून झाली?—अरेरे

आजचा यंत्र-मानव हा 'कशासाठीं ? तर पोटासाठीं !' एवढेंच पालुपद गुणगुणत बसला आहे. खंडाळ्याचा घाट व तिथली हसरी हिरवी सृष्टि यांचा त्याला विसर पडला आहे.

तुम्हाला रवीन्द्रनाथ ठाकूर यांची ती गोष्ट माहीत आहे का ?

—विजयादशमीची मिरवणूक निघाली होती. भालदार, मानकरी, सरदार व असंख्य जन-समूह यांच्या समवेत राजाधिराजांची स्वारी मिरवत चालली होती; याचकांच्या अंगावर धन उधळीत होती. सर्वजण राजाला दुवा देत होते; त्याच्या नांवाचा जयजयकार करीत होते

या सर्व मनोहर दृश्यापासून थोडें दूर, रस्त्याच्या कडेला एक भिकारी उभा असलेला राजानें पाहिला. 'मुंभाचा करगोटा, रुकट्याची लंगोटी' अशी संत नामदेवांप्रमाणें त्याची स्थिति होती. हातांत जीर्ण, मलीन झोळी व डोळ्यांत दैन्य ! या सर्व धुमाळींत आपली वर्णी लागणें कठीण या कल्पनेनें तो दूर उभा असावा असें राजाला वाटलें.

राजानें झटकन् माहुताला खूण केली. तो खालीं उतरला व त्या भिकाऱ्याजवळ गेला. भिकाऱ्याला आश्चर्य वाटलें, आनंद झाला. राजा आतां आपल्याला निदान एकादी सुवर्ण-मुद्रिका दान करील या अपेक्षेनें, आतुरतेनें त्यानें आपली झोळी पुढें केली. पण झालें भलतेंच ! राजानेंच त्याच्यापुढें आपला हात पसरला. एका राजेश्वरानें यःकश्चित् भिकाऱ्याजवळ याचना करावी !—केवढा विलक्षण प्रसंग ! भिकारी स्तंभित झाला, निराश झाला, चरफडला. त्यानें मोठ्या मिनतवारीनें झोळींतले दोन दाणे राजाच्या हातावर ठेवले. राजानें प्रसन्न मनानें ते स्वीकारले व पुन्हा अंबारींत बसून तो निघून गेला. भिकाऱ्यानें खोपटांत आल्यावर झोळी पालथी केली, तों काय आश्चर्य ! ज्वारीच्या त्या ढीगा-ढिगांत दोन सुवर्णकण चमकत होते. मोगऱ्याच्या पुष्पराशींत सोनचाफ्याचीं दोन फुलें कुणी टाकावीत, तसे ! त्यानें राजाला दिलेल्या कणांएवढेच कण होते ते. लहान नाहींत व मोठेहि नाहींत, अगदीं तेवढेच ! धान्याच्या त्या राशीकडे पाहून तो भिकारी पश्चात्तापानें ढसढसां रडला !

—विश्वमोहिनी सुवर्ण-रथांत बसून आमच्या दाराशी आली कीं आम्हीहि तिच्यापुढें हात पसरतों; पण तिनेंच आपल्याजवळ याचना केली कीं आपण मुलखाचे कृपण होतों. तिला कमींत कमी काय देतां येईल याचा विचार करतों. 'पण यावें तसें द्यावें हा तर सुखाचा मूलमंत्र आहे; किंबहुना दुसऱ्याला दिल्याशिवाय घेतां येत नाहीं, अशी एकच गोष्ट या जगांत आहे.—ती म्हणजे सुख !

आमची त्यागविमुखता व स्वार्थलोलुपता यांनीं आम्हीं आमचीं दुःखें व आमच्या आजच्या साऱ्या समस्या निर्माण करून ठेवल्या आहेत. आज आम्ही वंचनेच्या वाळवंटीं उभे आहोंत. व्यक्तिसुखाचीं जीं कमनीय वांछितें आम्हांला भुलावण घालतात तीं कांचनमृगाप्रमाणें फसवून समाजजीवनापासून दूरवर नेतात व शेवटीं तोंडघशी पाडतात, सपशेल फसवितात. मी, माझें कुटुंब, माझीं मुलेंबाळें, माझा बंगला एवढेंच काय तें जीवन अशी लक्ष्मण-रेषा आम्ही आमच्या भोंवतीं आंखून घेतों. चाळी-तल्या माडीकऱ्यानें गॅलरींतल्या कुंडींत अधिक धान्य पिकविण्याची मोहीम सुरू करावी तसे आम्ही आमच्या अस्मानी आकांक्षांभोंवतीं कुंजी घालतों. स्वसुखाभिलाषेची परिसीमा झाली कीं मनुष्य कांचनाचा दास बनतो. कुसुमदलांच्या किनखापी कोशांत भ्रमरानें गुंतून रहावें त्याप्रमाणें अशा माणसाला कनकाच्या कैदेंतून मुक्त व्हावेंसें वाटत नाहीं. धनलाभाचा हव्यास वाढला कीं अपहरणाची प्रवृत्ति वाढते त्यामुळें असंतोष, हेवा, द्वेष, कलह या सर्वांची वाढ होते. आज आमची अशी स्थिति झाली आहे. कालचा साधाभोळा माणूस आज यंत्र-



प्रा. हेमन्त विष्णु इनामदार, एम्. ए.

मानव झाला आहे. उद्यां तो यंत्र-दानव होईल कीं काय अशी भीति निर्माण झाली आहे. सत्य, शिव व सुंदर यांऐवजीं रुपये आणे व पै यांमध्यें तो जीवनाचें मूल्यमापन करूं लागला आहे. "कशासाठीं, पोटासाठीं—खंडाळ्याच्या घाटासाठीं !" असें एक शिशुगीत आहे. आजचा यंत्र-मानव हा 'कशासाठीं ? तर पोटासाठीं !' एवढेंच पालुपद गुणगुणत बसला आहे. खंडाळ्याचा घाट व तिथली हसरी हिरवी सृष्टि यांचा त्याला विसर पडला आहे. भाकरीच्या तत्त्वज्ञानानें तो भारावून गेला आहे, भांबावून गेला आहे. खाद्य, पेय, दृश्य व श्राव्य हीं सारीं त्याच्या सेवेला सादर आहेत; तरी पण तो असंतुष्ट आहे. त्याच्या सुखसोयी वाढत आहेत, पण सुख मात्र कमी

होत चालले आहे आपलें 'हरपलें श्रेय' कसें गवसेल या चिंतेंत ती चूर आहे.

"सुखें सारीं भवतालीं
तरी नाहीं समाधान;
असें कसें वडविलें
देवा, तुम्ही माझें मन?
वाटे माझें परब्रह्म
पैल यमुनेच्या तीरीं
उभें राही नादवीत
गूढ मधुर वांसरी!"

—आणि या असंतोषाचें कारण अगदीं स्पष्ट आहे. आमच्या आजच्या जीवनांत विश्वास औषधापुरताहि उरला नाहीं, श्रद्धेचा मागमूसहि राहिला नाहीं. भक्तीचा ओलावा सुकला आहे. जीवन हें त्यामुळें कोरडें, शुष्क व रसहीन बनलें आहे. लोकांना नेत्यांविषयीं आदर वाटत नाहीं, सरकारवर त्यांची भक्ति नाहीं. राज्यकर्त्यांना जनतेची नाडी सांपडली नाहीं. जनतेला पोट नाहीं, डोकें नाहीं व हृदयहि नाहीं, अशी मात्र त्यांची कल्पना झाल्यासारखी दिसते. विद्यार्थ्यांना अध्यापकांविषयीं आदर नाहीं, पालकांबद्दल प्रेम नाहीं, पुढाऱ्यांविषयीं प्रीति नाहीं. भाऊ-भाऊ, पिता-पुत्र, माय-लेक, पति-पत्नी, सासू-सून, बहीण-भाऊ हीं सारीं नातीं नांवापुरतीं राहणार अशी भीति वाटूं लागली आहे. त्यांच्यांतील उत्कटत्व कमी होऊं लागलें आहे. घर ही संस्था दिवसेंदिवस ढासळत चालली आहे. आमचें जीवन विकल होत चाललें आहे, विफल होत चाललें आहे 'नेति, नेति' हें आजच्या जीवनाचें सारसर्वस्व बनलें आहे.

सद्यःसमाज-जीवनांत ही जी मोठी पोकळी भासत आहे तिला जबाबदार कोण? ती भरून निघेल काय? कशी निघेल? कोण ती भरून काढील? कळिकांप्रमाणें लोकांचीं मनें उमलावींत व त्यांतून समाधानाचें सौख्य-धन दरवळावें असें वाटतें; पण त्यांना अरुणाचे कुंकुमकर केव्हां स्पर्श करतील? जीवनांतील दुःखपूर्ण घटनांमुळें विरक्त झालेल्या महात्मा बुद्धानें बोधिवृक्षाखालीं तपस्या आरंभिली. 'अमृतं प्राप्तुमित्थोऽहं ये पियासा' असें म्हणून त्यानें तपश्चर्येला सुरुवात केली. त्याला जें अमृत सांपडलें तें आतां कोठें मिळेल?


ध्येय, प्रीति, आणि आशा.
ह्यांची होतें कां कधीं पूर्ती ?.
वेड्यापरी पूजिता कां
भंगणाऱ्या अशा मूर्ती !,
एका निष्पाप तरुणीची हृदयस्पर्शी कहाणी !
हरिहर फिल्म्स
निर्माता-दिग्दर्शक:- दादा परांजपे
कथा नागेश जोशी
संवाद बाळ बेळगांवकर
पद्य शांताराम आठवले
कला श्रीकृष्ण आचरेकर
ध्वनी : किशोर राणे
संगीत : पी. रमाकांत
छाया : व्ही. कामत
भूमिका : राजकमल, विवेक, नायमपल्ली, विकास, धुमाळ आणि दुर्गाबाई खोटे.
हक्कांसाठी लिहा :—हरिहर फिल्म्स, C/o श्री साऊंड स्टुडिओज, मुंबई १४.

हिंदुस्थानांत मुद्रणकलेचा प्रारंभ युरोपियन मिशनऱ्यांकडून झाला व पहिला छापखाना सुरू करण्याचें तसेंच पहिलें मुद्रित पुस्तक प्रसिद्ध करण्याचें श्रेय गोमंतकाला मिळालें !




लेखक : काशिनाथ दामोदर नायक

रविवार ता. २० मे सन १४९८ रोजीं वास्को द गामाचीं जहाजें कालिकत बंदरांत नांगरलीं आणि हिंदुस्थानचा मार्ग युरोपला मोकळा करून देण्याचें श्रेय पोर्तुगालला मिळालें. कालिकतमध्यें गामाला एका मूर गृहस्थानें 'इकडे येण्यांत तुमचा उद्देश काय?' असा प्रश्न केल्यावेळीं 'आपण मसाल्याचे जिन्नस व खिस्ती लोक (pimenta e cristaos) यांच्या शोधार्थ अलों,' असें उत्तर दिलें. हिंदुस्थानांत यानंतर इंग्रज, फ्रेंच, डच यांचें आगमन झालें, व त्या त्या देशांतील मिशनरीहि आले. परंतु धर्मप्रसाराचें मुख्य ध्येय जसें पोर्तुगिजांनीं आपल्यापुढें ठेवलें होतें, तसें इतरांनीं ठेवलें नसल्यानें धर्मप्रसाराचें कार्य जितकें पोर्तुगिजांकडून त्या कोळीं झालें, तितकें इतरांकडून झालें नाहीं. या धर्मप्रसाराच्या उद्देशामुळें युरोपांतील मिशनऱ्यांकडून अनेक भलींबुरीं कृत्यें झालीं. त्यांतील भल्या कृत्यांत आपल्या धर्मप्रसाराच्या निमित्तानें हिंदुस्थानांतील अनेक भाषा व साहित्य या बाबतींत त्यांच्याकडून झालेल्या प्रयत्नांचा उल्लेख केला पाहिजे. या प्रयत्नांचा इतिहास फार मोठा आहे. अद्याप या प्रयत्नांचा संकलित इतिहास प्रसिद्ध व्हावयाचा आहे. त्याकरतां ठिकठिकाणीं विखुरलेल्या स्थितींत पडून असलेली माहिती पुढें आली पाहिजे.

हिंदुस्थानांत मुद्रणकलेचा प्रारंभ या युरोपियन मिशनऱ्यांकडून झाला व पहिला छापखाना सुरू करण्याचें, तसेंच पहिलें मुद्रित पुस्तक प्रसिद्ध करण्याचें श्रेय गोमंतकाला मिळालें; कारण, युरोपियन लोकांपैकीं पोर्तुगिजांची अधिसत्ता सर्वांपूर्वीं गोमंतकांतच स्थापन झाली, हें होय. या युरोपियन मिशनऱ्यांनीं आपल्या धर्मप्रासाराकरितां इकडील भाषांचा अभ्यास सुरू केला, व त्याकरितां कांहीं व्याकरणें रचलीं. यामुळें हिंदी, गुजराथी, बंगाली व कोंकणी या भाषांतील आद्य व्याकरणकारांचा मान या युरोपियन लोकांकडे जातो. सन १९३६ सालीं मराठी व्याकरणरचनेस शंभर वर्षें पूर्ण झालीं. त्यानिमित्तानें लिहिलेल्या "मराठी व्याकरणाची कुळकथा" या आपल्या लेखांत विद्वान संशोधक अ. का. प्रियोळकर यांनीं बंगाली व्याकरणाची आद्य रचना Nathemal prassy Halhed यांजकडून झाली असल्याचें लिहिलें आहे. परंतु यापूर्वीं एका पोर्तुगीज पाद्र्यानें बंगाली भाषेचें व्याकरण रचून तें रोमन लिपींतून पोर्तुगालमध्यें १७४३ सालीं प्रसिद्ध केलें. हाच बंगाली भाषेचा आद्य व्याकरणकार होय. याचें नांव Fr Manoel da Assumpcam असून तो पोर्तुगालमधील Evora या गांवचा होता Halhed चें व्याकरण १७७८ सालीं प्रसिद्ध झालें. हें व्याकरण बंगाली लिपींत लिहिलेलें होतें, व त्याच लिपींत तें छापलें गेलें. हें ज्या छापखान्यांत छापलें तो छापखाना अँड्रूस नांवाच्या एका पुस्तकविक्रेत्यानें स्थापन केला होता. अर्थात बंगाली लिपींतील पहिलें आणि बंगालमधील पहिल्या छापखान्यांत छापलेलें हें, या दृष्टीनें श्रीयुत Halhed याच्या व्याकरणाचें वैशिष्ट्य आहे, हें नाकबूल करतां येत नाहीं. पाद्री मानुएल आसुंप्सांव या पोर्तुगीज मिशनऱ्याकडे जसा बंगाली भाषेंतील आद्य व्याकरणकाराचा मान जातो, त्याचप्रमाणें 'बांगला प्रथम' म्हणजे, रोमन लिपींतील पहिलें मुद्रित बंगाली पुस्तक रचणाराचाहि मान याजकडे जातो.

बंगालमध्यें धार्मिक प्रचाराकरितां पोर्तुगीज मिशनऱ्यांचें आगमन कोणत्या काळांत झालें हें निश्चित सांगतां येत नाहीं. त्या काळांत तेथें असलेले पोर्तुगीज व्यापारी, सैनिक, त्यांचे गुलाम, तसेंच पोर्तुगीज-बंगाली मिश्र प्रजा, यांच्या आश्रयाखालीं त्यांचें आगमन झालें. बंगालमधील कांहीं हिंदु जमीनदारांनीं पोर्तुगीज पाद्र्यांना बरेच अधिकार देऊन आपल्या राज्यांतील देशी ख्रिश्चनांकरितां चर्चेस वगैरे बांधण्याची परवानगी दिली. तारीख ७ जानेवारी १५९९ मध्यें, जेजुईत पंथाचे मिशनरी Francisco Fernandes यांनीं पूर्व बंगालमधील सोनारगांवजवळील श्रीपूरहून गोव्यास असलेले या पंथाचे अध्यक्ष Nicolao Pimenta यांना एक पत्र लिहिलें. त्यांत ते लिहितात : "आपण खिस्ती धर्माच्या मूळ कथा देऊन एक लहानसें पुस्तक व एक प्रश्नोत्तर माला लिहिली आहे. शिवाय आपले सहकारी पाद्री Dominic Souza

बंगाली भाषा शिकण्याचे प्रयत्न करीत आहेत. ते आपल्या दोनहि पुस्तकांचें बंगालींत भाषांतर करणार..." यावरून असें दिसतें कीं सामान्यतः सोळाव्या शतकाच्या शेवटच्या दशकांत पोर्तुगीज मिशनरी खिस्ती धर्मप्रचाराकरितां बंगाली शिकून त्या भाषेंत भाषांतरें करण्याच्या कार्यास लागलेले होते, व अशा रीतीनें बंगाली साहित्यांत आपलें असें नवीन दालन निर्माण करीत होते.

हिंदुस्थानांत पुष्कळ काळपर्यंत पोर्तुगिजांशिवाय दुसऱ्या युरोपियन जातीनें धर्मप्रसाराचें कार्य हातांत घेतलें नव्हतें. फ्रेंच व इंग्रज हे लोक जरी या वेळीं इकडे होते, तरी ते केवळ आपल्या लोकांच्या धार्मिक कार्याकरितां मिशनरी पाठवीत असत. पोर्तुगिजांनीं आपलें राज्य गोमंतकांत स्थापन केल्यावर तेथील बऱ्याच लोकांना खिस्ती करून तेथें कॅथलिक धर्माचें मुख्य केंद्र केलें होतें. हिंदुस्थानांत अन्यत्र स्थापन केलेल्या धार्मिक संस्थांचा कारभार येथूनच चालत असे. अठराव्या शतकाच्या मध्यभागीं, अर्थात् १७४३ सालीं, ज्या पुस्तकाबाबत आम्ही माहिती देणार आहों तें प्रसिद्ध झालें. त्या वर्षी बंगालमध्यें पोर्तुगिजांचीं पंधरा मिशनें अथवा धर्मप्रसाराचीं केंद्रें होतीं.

बंगालमध्यें पोर्तुगिजांनीं स्थापलेलीं चर्चे आज सुद्धां पुष्कळ ठिकाणीं आहेत. परंतु तेथील पाद्री पोर्तुगीज अगर गोमंतकीय नसून बहुतेक पोपमार्फत नेमलेले बेल्जम किंवा आयरिश जेजुईतपंथीय आहेत. मात्र ढाक्यामधील भावलचे S. nicolao de Jolentino चें प्राचीन चर्च व मिशन आजहि विद्यमान असून तें आजहि पोर्तुगीज किंवा गोमंतकांतील आर्च-बिशपच्या आधिपत्याखाली आहेत.

आतां हिंदीसंघ राज्यांतील या सर्व मिशनचे अधिकार गोमंतकांतील आर्च बिशपकडे नसून ते हिंदुस्थानांतील आर्चबिशपकडे आले आहेत. बंगाली खिस्ती साहित्याची परंपरा अशी आहे. त्या काळीं बंगालमध्यें भावल (ढाका) हें पोर्तुगीज मिशनऱ्यांचें मोठें केंद्र होतें. येथें Missao de Nicolau Tolentino हें मिशन धर्मप्रसाराचें कार्य करीत असे. याचे Reitor आगुस्तीनपंथी पाद्री Frey Manuel de Assumpcam हे होते. यांनीं तेथें धर्मप्रसाराकरितां बंगाली भाषेचा अभ्यास करून दोन बंगाली भाषांत पुस्तकें लिहिलीं आणि एका बंगाली भाषेंतील पुस्तकाचा पोर्तुगीज अनुवाद केला. हे गृहस्थ पोर्तुगालमधील Evora गावचे होते.

पाद्री मानुएल यांनीं खालील पुस्तकें लिहिलीं. पहिलें "कृपा शास्त्रेर अर्थभेद" हें एका धार्मिक पुस्तकाचें बंगाली भाषेंत भाषांतर आहे. दुसरें, "बंगाली भाषेचें व्याकरण, बंगाली-पोर्तुगीज शब्दकोश व पोर्तुगीज-बंगाली शब्दकोश" एकत्र हें पुस्तक १७४३ मध्यें रोमन लिपींत छापलें. तिसरें पुस्तक बंगालमधील Busna भूषणाचे राजपुत्र Dom Antonio do Rosario यांनीं धर्मप्रसाराकरितां बंगाली भाषेंत "ब्राह्मण रोमन कॅथलिक संवाद" हें पुस्तक लिहिलें. याचें पोर्तुगीज भाषेंत पाद्री मानुएल यांनीं भाषांतर केलें. हीं सर्व मूळ पुस्तकें रोमन लिपींत आहेत.







'आरंभ उल्लेखिलेल्या या तीन पुस्तकांपैकीं व्याकरण व शब्दकोश बंगाली-पोर्तुगीज (एकत्र) व ब्राह्मण रोमन क्याथलिक संवाद या पुस्तकांचें पुनर्मुद्रण कलकत्ता विश्वविद्यालयानें केलेलें आहे. कृपा शास्त्रेर अर्थभेद यांचें पुनर्मुद्रण झालेलें नाहीं. याचा थोडा भाग तरी मुळा-बरहुकूम रोमन लिपींतच पुनर्मुद्रित करावा अशी बंगाली संशोधकांची सूचना आहे. पाद्री मानुएल यांच्या दोन पुस्तकांच्या भाषेविषयीं व अंतरंगाविषयीं डॉ. सुनीतिकुमार चटर्जी यांनीं व्याकरण व कोश या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत यांबद्दलची चर्चा केलेली आहे. ती महत्त्वाची असल्यानें तिच्यांतीलच भावार्थ आम्ही देत आहों. ते म्हणतात : "पाद्री मानुएल यांनीं लिहिलेल्या भाषेंत बरेच फिरंगीपणाचे दोष आहेत. परंतु गुणहि बरेच आहेत. बंगालमध्यें जन्म घेऊन तेथेंच वास्तव्य करणाऱ्यांची जी भाषा तयार व्हावी तशी यांची बंगाली भाषा नाहीं. कित्येक दोष आहेत. परंतु कित्येक ठिकाणीं त्यांची भाषा ओघवती आहे. ज्या काळांत बंगाली भाषेंत गद्य साहित्य नव्हतें म्हटलें तरी चालेल, अशा काळांत एका विदेशी व्यक्तीच्या लेखणींतून अशी भाषा निर्माण व्हावी यांत त्यांचा श्रेष्ठपणा दिसून येतो. पोर्तु-गीज पाद्र्यांनीं रोमन लिपींतून बंगाली मजकूर लिहिण्याची एक पद्धति निश्चित केली होती. या बाबतींत त्यांचे प्रयत्न सोळाव्या शतकाच्या अखेरीस Dominic de Souza यांच्या वेळे-पासूनच सुरू झाले होते. पाद्री आसुम्सांवच्या पुस्तकांतील बंगालीचें रोमनमध्यें लिप्यंतर करण्याची रीत बरीच सुलभ व कार्यक्षम असून बंगाली उच्चार बरेचसे मुळाबरहुकूम दर्शविण्यास उपयुक्त आहेत. ही रीत पुष्कळ दिवसांच्या प्रयत्नांचें फल आहे, असें निश्चयानें समजतां येतें. 'प्रारंभींच्या पोर्तुगीज पाद्र्यांना बंगाली भाषेचा अभ्यास करून तिच्यांत कोणकोणते ध्वनि आहेत तें निश्चित करून घ्यावें लागलें होतें. बंगाली वर्णमाला आणि उच्चारित ध्वनिसमूह यांत जें अंतर आढळतें, त्यामुळें सुरुवातीस त्यांना बराच त्रास झाला असावा. हें अंतर ओळखणें म्हणजे सोपें काम नव्हतें. बंगाली भाषेंतील वर्णयोजना अनेक स्थळीं उच्चारांच्या बाबतींत गैरसमज निर्माण करणारी आहे. अशा ठिकाणीं उच्चारांचें खरें स्वरूप हुडकून काढण्यास सूक्ष्म दृष्टीचीच आवश्यकता आहे. पोर्तुगिजांचा बंगाली भाषेपूर्वी कोंकणी-मराठीशीं परिचय झाला होता. कोंकणी भाषेंत

सतरव्या शतकांत त्यांनीं बरेंच फिरंगी कोंकणी वाङ्मय निर्माण केलें. या वाङ्मयांत कोंकणी भाषा रोमन लिपींत लिहिली जात असे. गोव्यांत कोंकणीमधील ध्वनीचें रोमनमधील लिप्यंतर पोर्तुगिझांनीं निश्चित करून घ्यावें लागलें होतें. त्यामुळें बंगालांत आलेल्या पाद्र्यांना कोंकणीप्रमाणेंच एक आर्य भाषा असलेल्या बंगालींतील उच्चारासाठीं रोमन लिपींतील वर्णयोजना निश्चित करणें सोपें गेलें असावें. कांहीं विशिष्ट भारतीय वर्णध्वनि—उदा., मूर्धन्य वर्णांचा ध्वनि दर्शविण्यासाठीं कोंकणींत व्यवस्था करण्यांत आली होती. बंगालींत तिचाच उपयोग करण्यांत आला. Ketelaer या डच गृहस्थानें हिंदुस्थानी भाषेचें व्याकरण लिहिलें, तें हॉलंडमधील लायडन शहरांत David mills या इंग्रजाच्या संपादकत्वाखालीं प्रसिद्ध झालें. या व्याकरणांत हिंदुस्थानी भाषेच्या रोमनमधील प्रतिरूपांत विशेष सुसंगति आढळत नाहीं. या प्रयत्नाशीं तुलना करतां, पोर्तुगीज पाद्र्यांनीं केलेलें बंगालीचें रोमनमधील लिप्यंतर हें सुव्यवस्थेच्या दृष्टीनें प्रशंसेस पात्र ठरतें.

"एकंदरींत पाहिल्यास ज्या काळीं हें पुस्तक लिहिलें गेलें तो काळ लक्षांत घेतां, अनेक दोष व उणीवा असूनहि हें पुस्तक चांगलें उतरलें आहे, असें म्हणावें लागतें. आणि या पुस्तकाच्या साहाय्यानें दोन तीन पिढ्यांपर्यंत तरी युरोपियनांमध्यें बंगाली भाषेचा प्रचार झाला होता हें सांगण्याची गरज नाहीं. आणि वंग भाषेच्या इतिहासाची चर्चा करतांना या पुस्तकाला विशेष महत्त्व आहे हें खास. "पाद्री आसुंप्सांव यांच्या दोनहि पुस्तकांचें उत्तम प्रकारें विवेचन करावयाचें झाल्यास, भावलच्या अलीकडील बंगाली भाषेशीं, विशेषतः तेथील रोमन क्याथलिक खिश्चनांमध्यें प्रचलित असलेल्या भाषेशीं परिचय असणें अवश्य आहे. तसेंच गोव्यांतील कोंकणी भाषेचें व पोर्तुगीज भाषेचेंहि ज्ञान असणें जरूर आहे. (कारण या दोन्ही भाषांचा, विशेषतः पोर्तुगीजचा, प्रभाव या फिरंगी बंगालीवर शब्दसंग्रह व वाक्यरचना या दोन्ही दृष्टींनीं पडलेला आहे.) शेवटीं, बंगाली गद्य साहित्याचा प्रारंभ ज्यांच्यामुळें झाला, तसेंच बंगाली भाषेचा आद्य व्याकरणकार या नात्यानें, पाद्री मानुएल आसुंप्सांव हे बंगाली भाषा आणि साहित्य यांच्याविषयीं प्रेम बाळगणाऱ्या प्रत्येक बंगाली व्यक्तीच्या आदरास पात्र होतील."

डॉ. सुनीतिकुमार यांच्या वरील अभिप्रायावरून पाद्री मानुएल यांच्या पुस्तकांची कल्पना येईल. धर्मप्रसाराच्या निमित्तानें का होईना, त्यांच्याकडून हें जें कार्य घडलें त्याबद्दल ते सर्वांच्या आदरास पात्र आहेत. त्यांचें व्याकरण व शब्दकोश, तसेंच भूषणाच्या राजकुमारांनीं लिहिलेलें "ब्राह्मण रोमन क्याथलिक संवाद" यांच्याबद्दलची माहिती विस्तारभयास्तव पुढें ठेवणें भाग आहे.

या लेखाच्या बाबतींत डॉ. सुनीतिकुमार चटर्जी व डॉ. सुरेंद्रनाथ सेन यांच्या त्यांनीं संपादिलेल्या पुस्तकांच्या प्रस्तावना तसेंच अध्यापक अमूल्यचरण विद्याभूषण यांचा प्रवासी मासिकांतील लेख यांची मदत झाली, याबद्दल त्यांचे आभार मानून हा लेख पुरा करतो.

एक प्रदीर्घ पथ-कथा



# अहिल्या

स. आ. जोगळेकर

माझ्या भटक्या आयुष्यांत मला आजवर अनेक स्त्रिया भेटलेल्या आहेत. त्यांपैकीं कांहीं चटका लावून गेल्या—त्यांच्या पुनर्दर्शनाची इच्छा एकादे वेळीं होते—आणि कांहीं फटका देऊन गेल्या;—त्या पुन्हा भेटतात कीं काय अशी धास्ती कधीं कधीं मनांत येते—पण अहिल्ये-शिवाय कोणीही माझ्या अंतर्यामांत प्रविष्ट होऊं शकली नाहीं; इतर जशा आल्या, तशा गेल्या; ही मात्र ठाण मांडून राहिली!

अनुक्रमणिका



मला अहिल्येचें पहिलें दर्शन झालें त्यावेळीं मला वाटलें कीं माझ्या अंतर्यामानें जन्मोजन्मीं जतन करून ठेवलेल्या संवेदनांचें स्पंदन होत आहे. त्या प्रसंगाला आज किती तरी वर्षें झालीं; पण तिचें स्मरण झालें कीं अजूनही त्या क्षणींची क्षुब्धता प्रत्ययास येते. त्यावेळीं मी तरुण नसलों तरी, जीवनाच्या पटारावर बेदरकारपणें वावरत होतों, मनोराज्यें उभारीत होतों. आतां मी निश्चितपणें उताराला लागलों आहें; तत्कालीन उपभोगांच्या आठवणी आळवीत आहें; भोंवतीं भग्न मनोरथांचे व विटलेल्या सुखस्वप्नांचे अवशेष विखुरलेले आहेत—त्यांचें उत्खनन करीत आहें.

मला अहिल्येचें पहिलें दर्शन झालें विश्रामबागेच्या कोंपऱ्यावर, किती आकस्मिक! तिचें माझें पहिलें बोलणें झालें प्रताळेश्वरनजीक, किती अनपेक्षित! तिची माझी ओळख झाली चंद्रिका चित्रमंदिरांत, किती अभाविक! यापुढेंही आमच्या आयुष्यांत अनेक घटना घडल्या, त्याही अगदीं अकल्पित. जणुं ते ते प्रसंग घडावेत असाच संकेत होता, म्हणून वस्तुमात्रानें त्या त्या क्षणीं विशिष्ट हेलकावे हेतुपुरःसर घेतले!

अहिल्येशीं माझी ओळख झाली, त्यानंतर वेळोवेळीं आम्ही एकमेकांना ठिकठिकाणीं भेटलों आणि यापुढें गांठभेट घ्यावयाची नाहीं असें आम्हीं अखेरचें ठरविलें, त्या प्रसंगांना आतां किती तरी वर्षें लोटलेलीं आहेत; पण त्यांच्या स्मृति माझ्या मनांत ताज्या आहेत, स्मृतींच्या पुनःस्मरणानें मीं त्या ताज्यातवान्या ठेवलेल्या आहेत. कोणत्या वेळीं तिनें कोणती वेषभूषा केली होती, कोणत्या फुलांची वेणी घातली होती, कोणता आविर्भाव धारण केला होता, रतिरहस्यांतील कोणत्या रीतीचें प्रात्यक्षिक दाखविलें होतें, हे सारे सारे तपशील माझ्या ध्यानांत आहेत. आतां मी हें लिहीत आहें ना, मला वाटत आहे कीं ती त्या वेळची मूर्ति माझ्या समोर उभी आहे, वाऱ्याच्या लहरींवर पदन्यास करीत चाललेल्या संगीताच्या किंवा सुगंधाच्या लकेरींसारखी ती समोरून तरंगत चाललेली आहे; कधीं वाटतें, ती माझ्या शेजारीं आसन्दिकेला रेलून उभी आहे; कधीं ती नजर चुकवून शेजारून मान खालीं घालून लगबगीनें चाललेली आहे; कधीं समोरून डोळ्याला डोळा भिडवीत आहे आणि कधीं या तर कधीं त्या बाजूनें मजकडे साभिप्राय अर्धतारकावलोकन करीत आहे; कधीं मला प्रोत्साहन देत आहे तर कधीं माझा हिरमोड करीत आहे; कधीं आपण होऊन उल्हासानें एखादी आठवण सूक्ष्म व नाजुक तपशील सांगून टवटवीत करीत आहे; आणि कधीं दटावणीनें तर कधीं काकुळतीनें सांगत आहे कीं नका, नका, हें सांगूं नका, कारण तें फक्त आपणां उभयतांमधलें रहस्य आहे, कोणी ऐकलें तर लोक काय म्हणतील?

लोक काय म्हणतील? म्हणेनात. म्हणोत बिचारे. लोक काय म्हणाले याची आपण पर्वा केली नाहीं, मग काय म्हणतील याची फिकर कशाला?

अहिल्या—अहिल्या—मीं जीं सांगणार आहें तीं रहस्यें आहेत हें मला माहीत आहे; पण मी जें लिहीत आहें तें कधीं काळीं तुझ्या वाचनांत आलें तर तूंही मान्य करशील कीं आपलीं अगदीं खास अशीं जीं रहस्यें आहेत त्यांचा मी येथेंहि परिस्फोट केलेला नाहीं.

शिवाय रहस्य रहस्य झालें तरी तें गुप्त किती दिवस ठेवायाचें? आणि कोणाकोणापासून? रहस्यांनाहि मोकळें वातावरण चांगलें मानवतें, नाहीं तर तीं गुदमरतात, कुचंबतात. शिवाय या निमित्तानें अहिल्ये, तुझ्या स्मृति स्पष्ट व साकार, सजीव व सशब्द होत आहेत. जणूं स्मृतींचा सुगंध स्वयंस्फूर्तीनें वाऱ्यावर दरवळण्यासाठीं उत्सुकतेनें उचंबळत आहे! आतां अगदीं रहवत नाहीं, म्हणूनच हें सारें मी सांगत आहें.

मला आजवर अनेक स्त्रिया भेटलेल्या आहेत; पण अहिल्येशिवाय त्यांपैकीं कोणीही माझ्या अंतर्मनाचा ठाव घेऊं शकली नाहीं. कातळाला सुरुंग लावला कीं फार तर त्याचा एखादा ढलपा उडतो, पण त्यावर वीज कडाडून कोसळली तर ती त्याच्या कवचाचा भेद करून अंतर्यामींतल्या जिवंत झऱ्यापर्यंत झळाळते. माझ्या जीवनांत अहिल्या अशाच आवेशानें प्रविष्ट झाली. तिनें पहिल्या झपाट्यासरशीं माझ्या रक्ताचें पाणी पाणी केलें. माझ्या जीवनाच्या रखरखीत वाळवंटांत हा एकदाच गारवा व ओलावा; बाकीचीं सारीं मृगजळें—तीं तृषार्त जीवाला तृप्त करीत नाहींत, कासावीस मात्र करतात. अहिल्येचा माझ्या जीवनांत झालेला प्रवेश ही मामुली घटना नव्हती, हंगामी वादळासारखी क्षणभंगुर नव्हती; धरणीकंपासारखी चिरपरिणामी होती. एखादी घटना जिव्हारीं घाव घालून जाते; त्या घावाची जखम भरून आल्यानंतरही वण राहतोच. आठवण हाही एक वणच आहे. जखम जितकी खोल तितका तिचा वण ठळक. जखमा भरून येतात आणि घटना विसरून जातात; म्हणूनच मनुष्य जीवन जगूं शकतो, आसक्तींचा अनुनय असोशीनें करूं शकतो. अहिल्येच्या आठवणींमुळें मात्र माझ्या जीवनांतील आसक्ति नष्ट झालेली आहे.

मला आजवर अनेक स्त्रिया भेटलेल्या आहेत, पण अहिल्येशिवाय त्यांपैकीं कोणीही माझ्या जीवनाचा कब्जा घेऊं शकली नाहीं. दरेक व्यक्तिमात्राचा स्वभाव वेगळा असतो; तो जितका संकीर्ण तितकी त्याच्या अंतर्जीवनाची वाट अरुंद, नागमोडी आणि खांचखळग्यांची. त्याच्या कलानें व त्याच्या जोडीनें, चिकाटीनें व राजीखुषीनें या आडवळणांतून व त्या अडथळ्यांतून वाट काढणारालाच तेथें प्रवेश मिळायचा. अहिल्या तेथवर पोचूं शकली, कारण आम्हीं परस्परांच्या गुणांची हेळसांड केली नाहीं किंवा अवगुणांचा पुनरुच्चार केला नाहीं; पापपुण्याची क्षिति बाळगली नाहीं, मालकी हक्काची अपेक्षा केली नाहीं किंवा पर्वाही केली नाहीं. कदाचित् असेंही असेल कीं अपवादात्मक परिस्थितींत मी होऊन तिचा परिचय करून घेतलेला असल्यामुळें माझ्या मनांत तिच्याबद्दल एवढी आपुलकी निर्माण झालेली असेल. स्वकष्टार्जित, आणि खरोखरीच कष्टार्जित तेंच विशेष रुचकर वाटतें, नाहीं का? मग त्यांत अलौकिक असें कांहीं असो वा नसो. कदाचित् यांत पूर्वजन्मींच्या ऋणानुबंधांचाही कांहीं अंश असेल; कोणी सांगावें? कदाचित् असेंही असेल कीं ज्या विलक्षण प्रसंगांच्या प्रणालीमुळें आम्हां उभयतांच्या जीवनांतील कांहीं धाग्यांची गुंतागुंत झाली ते घडून आले नसते तर या ओळखीचा सुगावा माझ्या अंतर्मनांत तरी राहिला असता कीं नाहीं, कोण जाणे?

मला आजवर अनेक स्त्रिया भेटलेल्या आहेत असें मीं वर सांगितलें; त्यांपैकीं कांहीं आपआपल्या वर्तुळांत सौंदर्यासाठीं व सौष्ठवासाठीं विख्यात होत्या. त्यांची ख्याति व स्तुति मीं अनेकांच्या तोंडून ऐकलेली आहे; अशा शब्दांत व प्रसंगांबाबत कीं ऐकतांनाही शरम वाटावी. त्यांच्या ओझरत्या

अनुक्रमणिका






प्रेमाचा खेळ असलाच असतो, निष्काळी व निर्दय. ऋणानुबंधांच्या सूत्रांभोंवतीं पहिली फिरकी पडण्यापूर्वीच या खेळांतून माघार घेण्याची शक्यता असते. अहिल्येचें आव्हान मीं स्वीकारलें होतें आणि माझें तिनें; परस्परांभोंवतीं आमच्या मिठ्या यापूर्वीच पडल्या होत्या; आतां कोणालाही माघार घेतां येणें शक्य नव्हतें.

दर्शनासाठीं त्यांच्या घरांभोंवतीं किंवा त्यांच्या जाण्यायेण्याच्या रस्त्यांवर येरझारा घालीत घुटमळणाऱ्यांना मीं अनेक वेळां पाहिलें आहे. हातीं पिशवी किंवा रुमालाची घडी घेऊन त्या लगबगीनें मंदिराला निघाल्या किंवा रंगाचा प्याला घेऊन झुलत डोलत दत्ताच्या दर्शनाला निघाल्या कीं त्यांची चाल वेगवेगळ्या कोनांतून पाहण्यासाठीं, लंपट लोक त्यांच्या आगेमागें घोटाळत असतात; हेंही मीं अनेक वेळां पाहिलेलें आहे. बिचारे! गैरमाहीतगार व गैरवाकबगार; अशा या विख्यात सौंदर्यवतींपैकीं अनेक जणी मला बिनबोभाट भेटलेल्या आहेत; असें असूनही पहिल्या भेटीनंतर त्यांच्या पुनर्भेटीविषयीं मला कधींही असोशी वाटली नाहीं. कधीं काळीं त्यांची पुसट आठवण होते, पण ती आळविण्यासाठीं नव्हे, केवळ नाक उडविण्यापुरती. शिशीच्या अंगलटीवर आणि तिच्या पारदर्शक शरीरांतून दिसणाऱ्या चकाकित द्रव्याच्या आकर्षक रंगावर मोहित होऊन, विशिष्ट किंवा अपूर्व सुगंधाच्या अपेक्षेनें ती देखणी व महाग कुपी खरेदी करावी, घरीं जाऊन एकांतीं मोहोर फोडून तिचें बूच उघडावें आणि अपेक्षित मंद व मादक सुगंधाच्या लकेरीऐवजीं उग्र व सवंग दर्पाच्या भपकाऱ्यानें शिसारी यावी, असा अनुभव या देखण्या स्त्रियांच्या बाबतींत मला वारंवार आलेला आहे. चालू चित्रपटांतील नायिकेची किंवा तिच्या पार्श्वचारिणीची जी वेषभूषा, तीच तीच ह्यांचीही; फक्त अपेशी अनुकरणामुळें हास्यास्पद झालेली, एवढेंच; आणि कधीं कधीं तर त्या त्या चित्रपटाच्या हंगामापुरतीं ह्या त्यांचीं नांवेंही घटकाभर धारण करतात! सौंदर्यप्रसाधनांच्या दुकानांत त्या त्या मोसमांत घमघमत असेल तो, तोच भपकारा ह्यांच्याही भोंवतीं. नैसर्गिक किंवा वैयक्तिक असें कांहींही त्यांचे अंगीं कधींही आढळत नाहीं! अंगसुगंध किंवा अंगदुर्गंध सुद्धां! सारें कृत्रिम, इतकें कृत्रिम कीं जें स्वभावतः कमनीय तें यांनीं नटवून थटवून वेढब, ओंगळ व तिरस्करणीय केलेलें. कसलेल्या कलाकारानें नाजूक वर्तिकेनें काढलेल्या सूक्ष्म व सफाईदार बाह्य रेषांनीं अंकित असलेल्या आकृति हलक्या, हातानें फिक्या रंगांनीं अलंकृत कराव्या आणि चित्र पुसट दिसतें म्हणून बाह्य रेषा ढोबळ व रंग गडद करण्यासाठीं नवशिक्यानें त्यांवरून कुंचले फिरवून तें गोबरें करून नासाडून टाकावें, तसें.

यामुळें ज्यांच्या भेटीसाठीं जग व्याकुळ त्यांच्या बाबतींत मी उदासीन. रंगूताई, राधाबाई, सखूताई—आणखी कितीतरी घरवाल्यांना माझ्या सुलखा-वेगळ्या वृत्तीबद्दल मोठा अचंबा वाटे! कारण अशा सावजांना ईर्ष्येनें पाठपुरावा करणाऱ्या व त्यांच्यासाठीं सढळ हातानें खर्च करणाऱ्या गुलहौशी मित्रांचा यांच्याकडे बराच मोठा भरणा असल्यामुळें त्यांच्या हौशी तत्परतेनें पुरविण्याचा यांना सराव होता. त्यांनीं सर्वांनीं ठरवून ठेवलें होतें कीं मी चिक्कू तरी आहे, किंवा चक्रम. त्यांना मी सांगें, माझ्या मनाचा थांग लावणें किंवा चित्राचे रंग समजणें तुमच्या आवाक्याबाहेरचें आहे; तुमच्याच काय माझ्याही. मी असें कांहीं बोलूं लागलों म्हणजे 'काय तरी बाई हें बोलणं.' असें म्हणून त्या खांदे उडवीत. अहिल्येची नि माझी भेट झाली, ठिकठिकाणीं तिच्या माझ्या भेटी झाल्या आणि अंतर ती भेटनाशी झाल्यावर मीं तिचा ध्यास घेतला तेव्हां मात्र त्यांचे माझ्याबद्दलचे ग्रह पालटले. त्यांना वाटूं लागलें कीं आतां कोठें मी माणसांत आलों. कांहीं काळपर्यंत मला मात्र वाटत होतें कीं मी पशुवर्गात समाविष्ट झालों. इतरांना सर्वसाधारण वाटणाऱ्या एकाद्या स्त्रीसाठीं मी इतका पागल होईन अशी त्यांची कल्पना नव्हती;—आणि माझीही.

मला आजवर अनेक स्त्रिया भेटलेल्या आहेत असें मीं वर सांगितलें. यासाठीं मला अनेक संकेतस्थानें पालथीं घालावीं लागलेलीं आहेत. हीं स्थानें धुंडावींच लागतात; कारण हा व्यवहार खुल्या बाजारांतला नसतो. बेकायदा चोरीचा मामला. माणकासाठीं ब्रह्मदेशांत जावें लागतें आणि मोत्यांसाठीं मलबारांत. बहुरत्ना वसुंधरा हें खरें; पण या रत्नांचें संचारक्षेत्र मर्यादित असतें; कारण तें वैयक्तिक परिचयावर अवलंबून असतें. या संकेतस्थानीं या स्त्रिया कां येत होत्या? कोणी उमेदवार, औत्सुक्याच्या उसळीमध्यें, कोणी पटाईत, अतृप्त वासना शमविण्यासाठीं. कोणी फसून, कोणी फसवून. कोणी पालकांच्या, कोणी मालकांच्या प्रेरणेमुळें तर कोणी त्यांच्या नोकरीपायीं. बिनभांडवल व बिनबोभाट, बिनायास व त्वरितसाध्य वेतनासाठीं. तरकडे खर्च भागविण्यासाठीं, क्षुद्र हौसांच्या ओढीनें, लटक्या प्रतिष्ठेच्या तेढीनें. अंतिम हेतु कोणताही असो, साऱ्या येतात त्या चोरपावलांनीं; सदर काढून, तोंड चुकवीत, अधोमुख; जणूं आपलें पाऊल वांकडें म्हणून तें सांभाळून टाकलें पाहिजे, याची त्यांच्या पावलांनाही जाणीव आहे. पाऊल वांकडें पडतें, किंवा टाकावें लागतें, हा दोष चालणाराचा कीं धरित्रीचा? व्यक्तीचा कीं परिस्थितीचा? कोण जाणे! आणि या ठिकाणीं येणारे पुरुष? असंतुष्ट व अतृप्त, भटके व आत्मवंचित; लब्धप्रतिष्ठित आणि बहुधा एकांडे; रुचिपालटांत तृप्तीची व स्पर्शजन्य संवेदनांत समाधानाची अपेक्षा बाळगणारे; वेष्टनावरून अंतर्यामाची पारख करूं पाहणारे; सरस यौवनाच्या सहवासांत स्वतःची सुकलेली वयस्कता विसरण्यास उत्सुक असणारे. असें सांगतात कीं संभोग हा संग्रामाचा व क्रौर्याचा एक प्रकार आहे; विजिगीषु पौरुषाच्या, व जयिष्णु जीवशक्तीच्या संवर्धना आविष्कार आहे. या स्वाभाविक भावनेची मागणी पुरविण्यासाठीं? आणि व्यभिचार हें त्याचें व्यंगचित्र आहे! कोण जाणे! व्यसन व पाप ह्यांचें आवरण अत्यंत आकर्षक असतें; त्यांचें दर्शन मनुष्याला बेचैन करतें, चैनीकडे प्रवृत्त करतें, चैन ही व्यसनाची बाह्यरेषाच आहे. औत्सुक्याच्या उसळीसरशीं, मस्तीच्या भरांत मनुष्य पाऊल टाकतो, तें वांकडें पडलें तरी आपलें कांहीं वांकडें होणार नाहीं, असा त्याला विश्वास वाटत असतो, म्हणूनच. कारण जीवसृष्टींत आपण असाधारण आहोंत अशी त्यानें आपली समजूत करून घेतलेली असते. ज्याचें मन व शरीर हीं दोन्हीं दुबळीं असतात; परिस्थिति त्यांचें दौर्बल्य वृद्धिंगत करते; त्याचप्रमाणें मन व शरीर हीं दोन्ही उच्छृंखल असतात; किंबहुना, उच्छृंखलता हाहि दौर्बल्याचाच एक प्रकार आहे. परिस्थितीमुळें या दौर्बल्यांची स्फोटकता वृद्धिंगत

होते- यामुळें केव्हां काय होईल, कसें आणि कां, हें कोणी सांगावें ?

आणि मी ? मी एक सर्वसाधारण मनुष्य. मध्यम स्थितींतला—सदैव दृष्टीनें प्रपंचाच्या खर्चासाठी अंग मोडून मेहनत करावी लागणार नाहीं, वर्षाखेरीसुद्धां चार पैसे हातांत खेळत राहतील, एवढ्या अविच्छिन्न उत्पन्नाची तरतूद पूर्वजांनी करून ठेवली होती. वडिलार्जित स्नेह्यांच्या भागीदारींत अधूनमधून छोट्या प्रमाणावर लेकेदारी करीत असें. वयांत आलों, तेव्हां शिक्षण संपुष्टांत आलेलें होतें. अशा परिस्थितींत मांडलेला संसार हातीं आला. पुढील दारीं कुत्रा, मधल्या घरीं बायको, मागील दारीं म्हैस, जसें पूर्वीपासून चालत आलें होतें तसेंच मीही समदृष्टीनें तें चालवीत होतों; कोणाला कांहीं कमी पडूं दिलें नाहीं. दुष्टदृष्टीच्या आहारीं जाऊन कधीं काटकसर केली नाहीं, किंवा कोणी विचारता नाहीं म्हणून कधीं उधळपट्टीही केली नाहीं. समाजाच्या या थरांतले शिष्ट वागल्यत, तशीच माझी खुशालचेंडू वागणूक होती. वृत्ति उनाड, स्वभाव चंचल; मनाचा मोकळा, छानछोकीचा हौस. बाह्यतः संभावित, अंतर्यामी लंपट. रसिकतेच्या किंवा तत्त्वज्ञानाच्या अवगुंठनाखालीं अंतर्यामींची लंपटता लपविण्याची माझी इच्छा नाहीं. मात्र ही लंपटताही कधीं संभावितपणाच्या मर्यादा ओलांडणार नाहीं, अशी खबरदारी मी जागरूकतेनें घेत होतों. माझी वृत्ति संकीर्ण आहे, संमिश्र संस्कारांच्या अनुरोधानें; आमचे कोणी पूर्वज कर्मठ पण्डित होते, असें सांगतात; आणि कोणी सर्वावगुणसंपन्न! मलाही कधीं वाटतें कीं उपाध्याय व्हावें कधीं वाटतें, चैतन्यें घुमावें ! मनोविकारांना आवरून धरण्याची असाधारण शक्ति माझ्या अंगीं नाहीं. मी त्यांच्या आहारीं गेलेला नाहीं, हेंही तितकेंच खरें. प्रवाहाबरोबर वहावलों तरी भोंवऱ्यांत घुटमळणार नाहीं अशी खबरदारी घेण्यापुरतें व्यवधान आणि गुरफटलोंच तर डुबी घेऊन त्याच्या फेऱ्यांतून बाहेर निसटण्याइतकें कौशल्य माझ्या अंगीं आहे. दोन गटंगळ्या घ्याव्या लागल्या तरी ऐन वेळीं सावध होऊन धार तोडण्याचें सामर्थ्यहि माझ्या अंगीं आहे. माझी मनोवृत्ति थोडी विकृत आहे. मी अतृप्त आहें, शरीरानें व मनानेंही; मी तहानेलेला आहें; सरळ सांगतों, माझी तहान नुसत्या पाण्यानें, मग तें कितीही मधुर आणि शीतल असो, किंवा दुधानें, मग तें अगदीं निर्भेळ किंवा धारोष्ण असो, भागणारी नाहीं. मानवदेहांत परमेश्वराचें अधिष्ठान असतें आणि सैतानाचीही बैठक असते. देवघरांतला नंदादीप विझला कीं जणूं तोंवर थोपून राहावें. लागे त्यामुळें प्रक्षुब्ध झालेले समंध धिंगाणा घालूं लागतात. नंदादीपाचा आधार मी कधीं पाळलाच नाहीं. त्यामुळें समंधाची लहर उठेल तेव्हां मी झपाटला जातों; तेव्हां संस्कार माझ्यावर सत्ता चालवूं शकत नाहींत, प्रतिष्ठेचीं बंधनें मला थोपवून धरूं शकत नाहींत. मग थोडा वेळ घुमविल्यावर तेकाळ पूर्वस्थळीं जातो आणि मी सावध होतों. मी हें सांगत आहें हा छपवा-छपवीचा एक प्रतिष्ठित प्रकार आहे हें कशाला लपवावें ? नीतिशास्त्रांनीं पापाची जबाबदारी परस्पर भागविण्यासाठीं अनेक सोइस्कर सिद्धांत निर्माण केले आहेत, त्यांतलाच हा एक !

मला अहिल्येचें पहिलें दर्शन झालें त्या दिवशीं शनिवार होता. वेळ कलत्या दुपारची होती.

होय, मला पक्की आठवण आहे. त्या दिवशीं गवती मैदानावर शर्यतींचा खास कार्यक्रम होता. तिकडे बरोबर चलण्याविषयीं माझ्या एका मुंबई-कर मित्रानें मला प्रथमच आणि कमालीचा आग्रह केला होता. कां, कोण जाणे, मला त्या दिवशीं सकाळपासूनच कांहीं तरी हुरहूर लागल्या-सारखें वाटत होतें. म्हणून मी कां कू करूं लागलों. तेव्हां दुपार त्याच्या-बरोबर घालविण्याचे मोबदल्यांत सायंकाळीं खाण्यापिण्याची व गाण्या-बजावण्याची चंगळ उडवून देण्याचें आश्वासन देऊन तो माझें मन वळ-विण्याचा प्रयत्न करूं लागला; प्रकृति बिघडल्याची सबब सांगून मीं हें आमंत्रण टाळलें तेव्हां थोड्या धोक्याच्या मोबदल्यांत भरपूर कमाई करून देण्याचें त्यानें आमिष लावलें. शर्यतींत कोणते घोडे जिंकणार याबद्दल त्याला आगाऊ वर्दी मिळत असे. ती इतकी विश्वसनीय असे कीं तिचा सुगावा मिळविण्यासाठीं अनेक प्रतिष्ठित लोक त्याच्या भोंवतीं गोंडा घोळीत असत. या भुलावणीनेंही मी बधलों नाहीं. कारण मीं स्वतःपुरतें ठरवून ठेवलेलें आहे कीं आयुष्याचा आनंद लुटण्यासाठीं मनुष्यानें हवीं तीं व्यसनें करावीत, पण जुगारीच्या फंदांत पडूं नये. कारण इतर सर्व व्यसनांना नैसर्गिक मर्यादा आहेत व सामाजिक बंधनें आहेत. मनुष्य इतर व्यसनें किती करील? हतप्रभ, हतबल होईपर्यंत; समाजांतून बहिष्कृत होईपर्यंत. उलटपक्षीं,








फांसाचें एका फेकीवर भूत, भविष्य, वर्तमान सारें कांहीं पणाला लावतां येतें, लाखोंयांत येतें व गमावण्यांत येतें. किडुकमिडुकाच्या संचयांत समाधान मानणाऱ्या मला गेंगाळ हें कसें परवडणार? हरघडीला सर्वनाशाची सिद्धता असेल त्यानेंच फांशांना हात लावावा. पण—पण मी कुठें वहावत चाललों आहें?

अलीकडे मला वेंधळेपणाची संवयच जडलेली आहे!

मी काय सांगत होतों?—त्या शनिवारीं मी रावाच आमंत्रण कां नाकारलें. वास्तविक त्याच्यासारख्या दिलदार दोस्ताबरोबर चार घटका उडवण्याचा मोका साधण्यासाठीं त्याची मित्रमंडळी टपलेली असे. त्याच्या मित्रमंडळांतील सदस्यांची संख्या सारखी वाढती असे. प्रत्येक वेळीं त्याच्या भोंवतालच्या गराड्यांत चार दोन नवे चेहरे दिसायचेच; पुरुषांचे व स्त्रियांचेही. आमच्या समाजांतल्या प्रतिष्ठित स्त्रियाही शर्यतीच्या छंदांत किती गुरफटलेल्या आहेत याची सर्जेरावाचा परिचय होईपर्यंत मला कल्पना नव्हती. आपल्या मित्रमैत्रिणींची औपचारिक ओळख तो मला नेहमीं करून द्यायचा. हीं नांवें या कानानें ऐकून त्या कानानें सोडून द्यायचीं; त्यांचीं नांवें सुद्धां माझ्या ध्यानांत नाहींत, मग स्नेहाची गोष्टच कशाला? सर्जेरावाची आणि माझी बऱ्याच वर्षांची जानपछान. आपल्या स्नेह्यांच्या अंतर्वर्तुळांत तो माझा समावेश करीत असे. तरीही त्याच्या धंद्याबद्दल मलाही फारशी माहिती नव्हती; मग इतरांना कोठून असणार? दिल्ली, लाहोर, हैदराबाद वगैरे मोठमोठ्या शहरीं आपल्या पेढ्या आहेत, असें त्यानें एकदां रंगांत येऊन मला सांगितलें होतें. तपशिलांत शिरण्याचा त्याचा विचार होता, ऐकण्याची मला उत्सुकता होती; पण तेवढ्यांत एकांत मोडला आणि विषय तुटला. त्याच्या व्यवहारांत कांहीं तरी काळेंबेरें असावें, असा मला एकादेवेळीं संशयहि वाटत असे. त्याची आकर्षक पण तहानेलेली नजर आणि त्याचे निष्ठुर ओठ त्याच्या उलट्या काळजाची ग्वाही देत आहेत, असें मला वारंवार वाटे. तें कसेंही असो, तो जसा श्रीमंत, तसाच दिलदार होता. त्याच्या अंगीं अनेक वैशिष्ट्यें होतीं. बैठकीसाठीं उत्तमोत्तम ठिकाणें निवडण्याची व बैठक रंगविण्याची त्याची हातोटी अद्वितीय होती. बैठक रंगवण्यासाठीं ती गाण्याची असो—अगर खाण्यापिण्याची असो—तो बेमाप खर्च करी, सर्वांचा खर्च तोच करी, आणि औदार्याच्या जोडीला सौजन्य एवढें कीं हें सारें चालू असतांना तो इतरेजनांना शिताफीनें असें भासवी कीं खर्च होत असलेलें द्रव्य ज्याचें त्याचें आहे. त्याच्या बैठकींत गप्पागोष्टींना व हसण्याखिदळण्याला तर नुसता ऊत येई. स्त्रीवेदांतील अनेक श्रुति त्याच्या संग्रहीं होत्या, आणि त्या तो अशा चटकदारपणें रंगवून सांगे कीं बस्स! त्याच्या सान्निध्याचा असा कांहीं गुण होता कीं त्यामुळें जणु नद्यांची मादकता द्विगुणित होई, सुरंगी तरंगी होई, मसाल्यांना मादकता येई, गायिकांच्या स्वराला धार येई आणि वयस्क झालेल्या गणिकांनाही ताज येई! त्याच्याबरोबर शर्यतीच्या मैदानावर जाणें मात्र फार धोक्याचें असे; कारण तेथें जणू चेव आल्याप्रमाणें तो उधळपट्टी करी आणि त्याच्या उत्साहाचा संसर्ग त्याच्या आजूबाजूच्या लोकांना बाधल्यावांचून रहात नसे. त्या दिवशींचें त्याचें आमंत्रण मीं नाकारलें हें बरें झालें. दुसऱ्या दिवशीं मला समजलें कीं आदल्या दिवशीं त्याचा त्रिकूटव्यूह यशस्वी झाला आणि त्याला खूप पैसा मिळाला. त्यांत मी भागीदार असतों तर माझा संयम कदाचित् कायमचा नष्ट झाला असता. शिवाय त्या उन्मादांत त्यानें नंतर एका अनोळखी वेश्यागृहांत घुसून खूप उधम केला, आरसे फोडले, तंबोरे तोडले आणि घर पेटवून देण्यापर्यंत मजल मारली! त्याच्या ओळखीचा एक फौजदार बरोबर होता, म्हणून निभावलें, दबलें. मी त्याच्याबरोबर असतों तर एका रात्रींत माझे केस पिकले असते.



शनिवारीं आणि विशेषतः शर्यती असतील त्या शनिवारी हुन्या अगर खुल्या बाजाराच्या बाजूला फिरकावयाचेंही नाहीं असा मीं स्वतःपुरता आणखी एक नियम आंखून ठेवला होता; कारण या दिवशीं इकडे मोठी धामधूम व घालमेल चालू असते. या दिवशींच्या प्रलयमंथनांत सारें वातावरण गढूळ झालेलें असतें; त्यांत बाजारवाल्यांच्या वृत्ति उत्तेजित झालेल्या असतात; समाजाच्या अगदीं खालच्या तळाशीं सांचलेला गाळ खळमटांसह घुसळून, उफाळून वर येत असतो. शर्यतवाल्यांनीं चढवून ठेवलेल्या छिनालींचे लोंढे गल्ल्याकुच्च्यांतून घरवाल्यांकडे लोटत असतात. वेश्यांच्या वेषांत गरती आणि गरतींच्या वेषांत वेश्या. कारण कोणाला घरगुती समजल्या जाणाऱ्या खव्याची आवड असते तर कोणाला बाजारी मेव्याची! वस्तुतः दोन्ही चिजा एकाच भटारखान्यांत घुसळलेल्या असतात; फक्त पोपुद्रा वेगळा असतो किंवा निराळा शिक्का, याची कोणालाही शुद्ध नसते. आपण शर्यतीच्या मैदानावरून तर

होऊन आलेलों नाहीं असें ध्यानीं येतांच आपली बडदास्त ठेवण्याची उत्सुकता खिडकींत उभ्या असलेल्या सवंग व उच्छृंखल वेश्याही दाखवीत नाहींत; कारण आम्ही मर्यादित मिळकतीचीं माणसें; स्वतःच्या खांद्यावर डोकें सांभाळीत चालणारीं माणसें; ना झिंगलेलीं, ना उंडारलेलीं. आम्ही ह्या बागांना, देऊन देऊन काय देणार? शिवाय त्या दिवशीं तें उनाड मैनांच्या अधमतेलाच रूपं ऊत येतो. परस्त्रिया पंजरबद्ध असल्या तर त्या आम्हांला कशा प्राप्त होणार? म्हणूनच परस्त्रिया, आणि फक्त परस्त्रियाच, पंजरबद्ध नसाव्या, असें आमच्यासारख्यांना वाटतें; त्यांचे मालक सहिष्णु, निदान बंदोबस्ताच्या बाबतींत ढिले असावे, असें आम्हांला वाटतें. त्यांच्या अंगीं उच्छृंखलता असावी, पण असंदिग्ध खलता नसावी; त्या वाटेल तेव्हां भेटूं शकतील इतक्या सुलभ नसाव्या आणि प्रयत्नांतीं आणि फक्त केव्हां तरी प्राप्त होतील इतक्या दुर्लभ असाव्या, असेंही वाटत असतें. पेयाचा रंग सुंदर असावा, त्याची रुचि मधुर असावी आणि तें थोडेंबहुत मादक व जरा महाग्राही असावें. कारण जें सवंग असतें तें रुचकर असलें तरी आवडत नाहीं, मग तें जरा विषारी असलें तरी चालेल; कारण संवयीनें मनुष्य अल्प प्रमाणांत विषही पचवूं शकतो; कारण सुंदर, मधुर व मादक असलें तरी अशा जालीम विषाचें सेवन करण्यास कोणी धजावणार नाहीं. अशा दिवशीं या बाजारांत घुमणाऱ्या विपरवनितांच्या अंगीं असलेलीं विपेंच तेव्हां थबथबत असतात. त्यांचे ते निर्लज्ज आविर्भाव, अभद्र बोलणीं, उत्तान हसणीं, मला तरी सहन होत नाहींत. हें सारें अवसान उसनें असतें, त्या दिवसापुरतेंच असतें; विशिष्ट दर्जाच्या व्यक्तींच्या आवर्तित मागणीच्या अनुरोधानें ओढून ताणून धारण केलेलें असतें. म्हणूनच अशा दिवशीं या बाजाराकडे मी ढुंकूनही पहात नाहीं. कधीं चित्रपट पाहतों, कधीं आनंदपङ्क्तींत पत्ते कुटीत बसतों तर कधीं नागरिकांचें मार्गक्रमण पहात नगर वाचनालयाच्या ओवरींत बसून राहतों.

त्या शनिवारीं सकाळपासून पाहुण्यांच्या वर्दळीमुळें मी घरांत डांबला गेलों होतों. मन आकसल्यासारखें व अंग आंबल्यासारखें झालें होतें. सर्जेरावाच्या आग्रहामुळें जरा अस्वस्थ झालों होतों. म्हणून दुपारींच पाय मोकळे करण्यासाठीं भटकायला निघालों. विशिष्ट उद्दिष्ट दृष्टीसमोर नव्हतें. जमल्यास एखाद्या चित्रपटाचा पराण्ह प्रयोग पहावा असेंही मनांत घोळत होतें.

आभाळ भरून आलें होतें. वारा सुटला होता. पाचोळा गिरक्या घेत होता. रजःकणांमुळें वातावरण धूसर झालें होतें. कुठेंही, पण लवकर जाऊन पोंचलें पाहिजे म्हणून मी झरझर चाललों होतों.

विश्रामबागेच्या कोपऱ्यावरून मी शनीच्या पाराकड वळलों—आणि त्या क्षणीं मी स्वतःला सावरूं शकलों नसतों तर—अहिल्येशीं माझी टक्करच झाली असती.

तिचें नांव मला त्या वेळीं माहीत नव्हतें; नंतर कळलें; आगोदर सांगितलें, एवढेंच.

वाऱ्याच्या झोतामुळें उडणारें वस्त्र सांवरण्यासाठीं ती जरा वाकली होती झुळकीबरोबर ताटव्यावरलें फूल झुकावें, जरा झुलावें, त्याच्या भोंवतालचीं पानें जरा डोलावीं; वाऱ्यानें पुढें ढकलावें, ताटव्यानें मागें ओढावें—अशीच तिची अवस्था त्या वेळीं झालेली होती.

तिला पाहून मी थबकलों; मला पाहून ती चमकली; एक पाऊल मागें सरून उभी राहिली. वाऱ्याच्या आंगचटीमुळें ती जरा त्रस्त झालेली दिसली. मी वरमलों. जरा हसलों, टळलेल्या पण हुकलेल्या प्रसंगाबद्दल तिची क्षमा मागण्यासाठीं. 'माफ करा हं, मीं एकदम वळायचा नको होतें,—' असें कांहीसें मी अस्फुटपणें पुटपुटलों. मला वाटलें, तीही असेंच कांहीं तरी पुटपुटली आणि जरासें हसली. ओठ किती नरम, जिवणी किती नाजुक, स्मित किती मादक!

तिचा वर्ण श्यामल होता,—खरेंच सांगतों, मला हाच वर्ण विशेष आवडतो; अहिल्येची भेट होण्याच्या पूर्वीपासून, नाहीं तर म्हणाल हाही माझ्या ह्या वेडाचाच एक अंश आहे. तिचा बांधा शेलाटा होता, पण भरदार व डौलदार; आणि लवचिक. तिच्या सौंदर्यांत डोळ्यांत भरण्यासारखें जर कांहीं मला त्या क्षणीं दिसलें असेल तर तिचे ते निर्मळ व विशाल डोळे; अथांग आणि काळेभोर; त्यांत जणूं काळी वीज चमकत होती. त्या नजरेला नजर भिडली कीं दुसरें कांहीं दिसेनासें होई, पाहणारा बेचैन होई, बेभान होई. कांचपात्रांत सोडलेला गोलसर काळाभोर मासा दिशा बदलताना झटका मारतो, तसाच दृष्टिक्षेप करण्याची तिची लकब होती. वळणावर तो जसा चमकतो तशींच हिचीं बुबुळेंही चमकायचीं. म्हणून एकदां तर मीं तिचें नांव मीनाक्षी ठेवावें असें ठरविलें होतें. तिचें नाक जरासें अपरें होतें; हट्टी? नव्हे, निश्चयी; खेळकर व खेळवणारें, लाडिक, हौशी, पण जग निष्ठुर. ओठ तर असे लालचुंद, टपोरे व रसाळ मधाच्या मोहोळासारखे कीं त्यांकडे पाहतांच आपल्याही ओठांना पाणी सुटावें! नेत्रांत सस्मित आवाहन आणि ओठांत निकराचें आव्हान!

तिची रया नागरी होती, पण बाज ग्रामीण होता. एकाद्या रागाच्या सुरावटींत दुसऱ्या रागाच्या स्वरांचें मिश्रण केल्यानें संमिश्र थाट जसा

मुग्धो तशी माधुरी तिच्या घाटांत दिसत होती !

माझी नजर बारीक, पण एकाद्यादुसऱ्या क्षणांत मी आणखी काय काय पाहूं शकणार ?

होडीनें सुकाणूंजरा हलवावें किंवा वल्हें एकाच बाजूनें मारावें, म्हणजे ती जागच्या जागी दिशा बदलते. तेवढ्याच संथपणानें आणि तेवढीच जरूर तेवढीच जागा दरम्यान सोडून ती मला ओलांडून रस्त्याला लागली.

वळतांना आणि वळल्यानंतर तिनें माझ्याकडे दृष्टिक्षेप केला असावा, असें मला वाटलें. वळतांना व वळल्यानंतर मला त्याकडे आणखी थोडेंसें निरखून पाहतां आलें.

ती फिक्कं भगवें पातळ नेसली होती; हिरव्यागार काठांचें; तलम व सळसळीत. वाऱ्याच्या झोताबरोबर पदर जरासा फडफडला. त्याच रंगाची तंग चोळी तिनें अंगांत घातली होती. दण्डावर जरीचा कांठ होता व स्कंधांवर नाजुक चुण्या होत्या, म्हणूनच तिनें चोळी घातलेली आहे असें दिसावें, इतका तो रंग तिच्या तकतकीत कान्तीशीं एकजीव होता. तिच्या मांसल दण्डावर चोळीची बाही जरा चिरली होती—यौवनाच्या भरामुळें, पोताच्या तलमतेमुळें, कीं काटेकोर वेतणीमुळें ? रसांच्या भरामुळें फळाची सूक्ष्म त्वचा कधीं कधीं अशीच उकलते. तिचा ओलसर, चमकदार, डुलता कणा व त्यावर रुळणारा बहुरंगी गोंडा क्षणभर दिसला, लगेच सांवरलेल्या पदराखालीं अदृश्य झाला. नेसणें दुहेरी कासोट्याचें, पण तें इतकें चापून-चोपून कीं त्यामुळें तिच्या अंगप्रत्यंगाचें अवगुंठित दर्शन आवाहक व्हावें, संभ्रम स्पष्ट व्हावें, कंप सशब्द व्हावेत ! तिच्या कासोट्याचा समला जरा फडफडला, क्षणभर पोटरी उघडी पडली, दिसली न दिसली तोंच तिनें जरा पाय वेळावून घेतले आणि पदर तर्जनीनें थोडा ओढून धरला.

क्षणभर मी स्तिमित झालों. जणूं गारुड्याला जंगलांतलें जिवंत नागांचें सळसळतें वारुळ दिसलें; जणूं शस्त्रसज्ज शिलेदाराला विनीचें निशाण दिसलें !

भानावर आल्यावर क्षणभर विचार केला. वाटूं लागलें, हिच्या मागोमाग जावें, लगेच जावें. मनांतला शिष्ट आवरीत होता—व्याघ्र शिकारीची प्रेरणा देत होता. क्षणभर ओढीचा अंदाज घेतला. जोरदार धारेला लागलें कीं तरणपटूला तिच्याबरोबर थोड्याबहुत अंतरापर्यंत जावेंच लागतें. तुमची इच्छा असो, नसो, ती तुम्हांला ओढून नेतेच. अशा धारेला लागलों कीं लगोलग तिला तोडण्याची तडफड मी करीत नाहीं. कारण तिच्या अंतर्यामीं दैवानें माझ्यासाठीं कांहीं तरी संचित ठेवलेलें असेल असें मला सारखें वाटत असतें.

लगेच मीं तिचा पाठलाग करायचें ठरविलें.

मला आठवतें कीं मनाशीं हा निश्चय होण्यापूर्वीच माझ्या देहानें जणूं स्वयंप्रेरणेनें पाठलाग सुरूही केलेला होता.

अर्थात खरें. नाहीं तरी दुपार मोकळीच होती. चित्रपट काय, केव्हांही पाहतां येईल.

पण पाठलाग तरी एकदम कसा सुरू करायचा ?—कांहीं लाजलज्जा ? मनाची नसेल, पण जनाची तरी खरी ! आपल्या मनांत पाप असलें कीं उगाचच सारखा अंदाज घेत असतो सान्या जगाच्या नजरा आपल्या-वर रोखलेल्या आहेत. चांदणें आतें मनांत, चोरला दिसतें जगांत. असले प्रसंग बरेच येऊन गेलेले असल्यामुळें अशा वेळीं कसें वागायचें याचें माझें तंत्र ठरून गेलेलें आहे. आपण कांहीं तरी विसरलों आहोंत, कांहीं तरी चुकलें आहे, असा आविर्भाव करायचा, जरा थबकायचें, स्वतःशीच हसून इकडे तिकडे पहायचें, ओठातली सिगरेट रस्त्यावर आपटून टांचेखालीं चुरगळायची, खिसा चांचपून पाकीट-पेटी बाहेर काढून ताजी सिगरेट शिलगावायची—आणि पूर्वीचा मार्ग बदलून शिकारीनें स्वीकार-लेल्या रस्त्यानें, विचारमग्न मुद्रेनें, किलकिल्या नजरेनें इकडे तिकडे टेहळणी करीत, स्नेह्यासोबत्यांना टाळीत, मार्गक्रमण सुरू करायचें.



वस्तुतः एवढ्या बतावणीची जरूरी नसते. साधारणपणें जग-नेहमींच्या व्यवहारांत इतकें मग्न असतें कीं कोण काय करीत आहे, कुठें काय चाललें आहे, याकडे कोणाचेंही लक्ष नसतें. रिकामटेकडे टवाळ आणि असंतुष्ट शिष्ट यांच्याबद्दल सावधगिरी बाळगली म्हणजे झालें. टवाळीमुळें विरस होतो, शिष्टाईमुळें वैयग.

पुष्कळ वेळां माझा मलाच प्रश्न पडतो कीं विशिष्ट पुरुषाला विशिष्ट स्त्रीचेंच सौंदर्य कां आकर्षित करतें ? विशिष्ट धाटणीच्या स्त्रियांचें सौंदर्य मोहक असतें व मोहाची प्रवृत्ति अनीतीकडे असते, म्हणून तें वर्ज्य मानावें, त्याविषयीं विचारहि मनांत येऊं देऊं नये, असें स्वसंतुष्ट मोक्षमार्गी मानतात. मानोत बिचारे. त्यांच्या वृत्तीची चिकित्सा आपल्याला कशाला ? इथून तिथून स्त्रिया तेवढ्या सारख्या, असेंही कांहीं पुरुष लंपटतेच्या लहरींत किंवा वैराग्याच्या छरींत सांगतात; ते मुक्त किंवा पशु; कमींत कमी अरसिक. आंब्याची चव झाडागणीक वेगळी; फुलाचा रंग व गंध जातीगणीक वेगळा. कोणाला शिरीषाचें नाजूक फूल आवडेल तर कोणाला छबीदार मोगरीचें किंवा ऐटदार सोनचाफ्याचें ! शिरीष किती नाजुक ? उच्छ्वासानेंही कोमेजतें; त्याचा आस्वाद घेणें हेंहि कौर्य ! तसेंच कमळ; दुरून साजरें, स्पर्शही सहन करीत नाहीं ! चांफेकळी दमदार खरी, पण कोमेजली कीं कशी विगलित होते. कशी काळवंडते ? उमललेली कळी, मग ती कोणत्याही जातीची असो, जोंवर ताजीतवानी आहे तोंवरच तर कोणालाही मोहित करील; कारण तिची आकर्षकता व धमधमाट तिच्या टवटवीवर



## नवकवीचें मनोगत

[नव्याला मान देऊन व जुन्याचा अभिमान बाळगून]

प्रासां चढवूंया फांसावर
यमकें धाडूं यमसदनाला
यती पाठवूं रतीकडे अन्
चरणां चूरणां ठोकुनि टाला

श्लेषांचीं तर ठेंचूं तोंडें
लघुगुरु मात्रा गेल्या वायां
इथें न मात्रा चाले आतां
गणांस देखिल गणकावूं या !

वृत्त अतां निवृत्त जाहलें
नष्ट करूं त्यीं जाती आतां
उभे विपुववृत्तावर राहुन
लिहूं मुक्तछंदीं नवकविता !

डुर डुर डुक्कर आले दारीं
तयांस मोदें देउं निमंत्रण
जगा ऐकवूं मुसंडींतुनी
गटारींतलें गिटार-वादन

पंपत पंपत काळोखाला
अपुल्या या अंधाऱ्या खोलींत
वास्तवामिषें घेउनि हातीं
विस्तववादाचें हें कोलित

वर्षाव करूं वत्सलतेचा
एकुल्याच त्या बीभत्सावर
प्रामाणिकता मिरवूं आतां
प्रमाण ठेवुनिया धान्यावर

अशीच नाविन्याविपणाची,
पिस्टनता नवकाव्यें लिहुंया
पाविन्त्र्याचें भूत काढोनी
भंगल्यासी लथ लावुं या !

—सोपानदेव चौधरी

अवलंबून असतात. इतरांची आवड काय असेल ती असो; मला आवडते बकुळी. वर्णानें सांवळी, बांध्यानें ठुसकी, वृत्तीनें हौशी; सुवास स्वेदगंधासारखा, वैयक्तिक व नैसर्गिक, मंद, मादक व मर्दक. बकुळीचीं फुलें ओंजळींत घेतलीं, गजऱ्यांत गुंफलीं, कितीही हाताळलीं, तरी कोमेजत नाहींत, अंग चोरीत नाहीं; करपत नाहींत, कुजत नाहींत; अंग, वर्ण व गंध यांचा स्वाद कितीही काळपर्यंत मनमुराद लुटला तरी बकुळीच्या पाकळ्या दळत नाहींत, तिचा रंग कोमेजत नाहीं, सुगंध संपत नाहीं !

पुष्कळ वेळां मात्र मलाच प्रश्न पडतो कीं स्त्रियांचें सौंदर्य न्याहाळावें तें समोरून कीं पाठमोरें ?—विकच्छ परिधानपद्धति प्रचारांत आहे तेथील रसिकांना ती कशी रुचत असेल कोण जाणे. त्यांचें मत काय असेल तें असो. महाराष्ट्रापुरतें आणि इथेंही अद्याप अस्तित्वांत असलेल्या पण दुर्दैवानें विसर्जित होत असलेल्या सकच्छ जमान्यापुरतें बोलायचें, किंवा स्वतःपुरतें सांगायचें म्हणजे मला सन्मुखदर्शनाहून पार्श्वदर्शन व त्याहूनही पृष्ठदर्शन अधिक आवडतें; जास्त मोहक व विशेष उत्तेजक वाटतें.

सन्मुखदर्शनांत मुख्यत्वेंकरून मुखमण्डलाच्या सौंदर्यावर लक्ष केंद्रित होतें. भांग, फुगे व बटा यांनीं सजलेलें; कृष्णवर्तिका, रक्तशलाका व चूर्णकुंकुम यांच्या सूक्ष्म स्पर्शामुळें शोभायमान; असें मुखमण्डल समोरूनच दिसूं शकतें. भृकुटि-भङ्ग, अपाङ्ग नेत्र, जिवणीचें स्पंदन यांही व्यक्त होणारी सौंदर्याची सजीवता व जीवनाची सरसता यांचा प्रत्यय अभिमुखदर्शनांतच येऊं शकतो, हें खरें, पण तें कोणाला? ज्याच्याविषयीं त्यांच्या अंतःकरणांत अनुराग, निदान अनुकूलता असेल त्यांना; आमच्यासारख्या अभागी, अपरिचित पामरांना याचें काय? कृपेचा प्रसाद इतरांना मिळत असलेला पाहण्याचें दुर्दैव तेवढें आमच्या नशिबीं.

आणि पृष्ठदर्शनांत ? येथें कृत्रिमतेला अवकाश नाहीं. प्रसाधनांना अवसर नाहीं, द्विधा वृत्तीला वाव नाहीं; वर्ण्य किंवा वर्ज्य, उपभोग्य किंवा त्याज्य हलक्या हातांनीं सैलसर बांधलेला डुलता अंबाडा, त्यांत तिरपें खोंचलेलें एकादेंदुसरें भरदार पानफूल, किंवा मरव्याची रोप असलेली मुक्या कळ्यांची वेणी; ~~अमर~~ सुंदर, सुरंगी, सुगंधी, प्रफुल्ल फुलांचा मजरा ! किंवा शेंपटा सोडलेला असल्यास त्याची व त्याच्या गोंड्याची कुण्यांशीं व नितंबांशीं, पदन्यासाच्या अनुरोधानें, कधीं सुसंगत तर कधीं विसंगत अशी हालचाल ! जणूं केतकीच्या वेटांतला काळाभोर नाग आवेशानें शेपटावर उभा राहून तिच्या मुखमण्डलावर फडेची सांवली धरून ग्वाही देत आहे कीं या सौंदर्यवतीला सम्राज्ञीचें पद कामदेवाच्या आज्ञेनें प्राप्त होणार आहे; जणूं विभग्यांना अनुरागी करणारा हा ऐंद्रजालिक प्रतोद आहे; जणूं अनुगामी अनुराग्यांना ओढून नेणारा हा रेशमी गुंफी व दोर आहे ! पार्श्वदर्शनाची खरी खुमारी पहावयाची असेल तर डाव्या अंगानें पंचेचाळीस अंशांचा कोन करून किरण सांभाळून चालत रहा, पहात रहा. नायिकेनें गपती चोळी किंवा कटोरी कंचुकी धारण केलेली असल्यास कण्याची मुलतानी कमान व कटीची मुलायम कृशता. कधीमधीं मौल्यवान व तलम वस्त्रांत अवगुण्ठित असलेल्या स्तनमण्डलांचें तिरपें ओझरतें दर्शन. हिरण्यागार पानांआड दडलेला पायरीचा पाड; कांदे, ऊ किती लपेल, देंटासरशीं किती लपेल ? भडक रंगाचे बुट्टीदार रेशमी खण त्यांची उभारी आवरून धरतात आणि गळ्याचे पट्ट्यांचे त्यांचे कांठ दण्डांच्या व पाठीच्या मांसलेंत रुतून बसतात; किंवा पारदर्शक पोताचें पोलकें घातलेलें असल्यास त्याच्या फिक्या, रंगीत, नक्षीदार, तलमतेंतून स्तनधारिणीचे हृदयंगम तंग ताण उठून दिसतात; आणि त्यावील नक्षी अशी शोभते









कीं हीं जणूं चित्रकारानें चंदनाच्या रंगीबेरंगी ओलसर उटींत कोरलेली आहे !

आणि कांसोटा ? हें तर सौष्ठवाचें भूषण आणि महाराष्ट्रीय वेषभूषेचें अद्वितीय वैशिष्ट्य; मग तो पुणेरी एकेरी असो किंवा कोल्हापुरी दुहेरी; मेखलेसारखा दृढ असो किंवा कुपर्गेवेसारखा शिथिल. त्याची शोभा पार्श्वदर्शनांत किंवा पृष्ठदर्शनांतच दृष्टोत्पत्तीस येते. ललित पदन्यासांचा ठेका धरणारा पृथुल नितंबांचा डौल कांसोट्याच्या दर्शनावर अवलंबून असतो आणि कांसोट्याच्या पट्टीचा डौल नितंबांच्या घाटावर व पुष्टतेवर. सौष्ठवाची परिणति, वक्रतेची आकर्षकता, आसक्तीला आमंत्रण आणि तृप्तीचें आश्वासन; भृकुटीनें किंवा तर्जनीनें करतां येणार नाहीं असें सूक्ष्मतम आवाहन नितंबांच्या स्पंदनानें व्यक्त करतां येतें. ही पदन्यासाच्या कौशल्याची परिसीमा. त्या धन्य कीं ज्यांच्या अंगीं हें कौशल्य आहे; आणि ते धन्य कीं ज्यांना हे संदेश अनुमानितां येतात ! स्त्रीची चाल जशी मागून संथपणें न्याहाळतां येते तशी ती पुढून पाहतां येत नाहीं; कारण ती निऱ्यांच्या घोळांत गुरफटलेली असते. फार तर ही गजगामिनी व ती हंसगामिनी, एवढेंच अजमावतां येतं. आणि पृष्ठदर्शनांत ? हिची चाल ललित तर तिची लुलित; ही स्वाधीनपतिका तर ती अभिसारिका; ही ओवी तर ती ठुमरी ! ही रोखून पाऊल टाकते तर ती तोलून; ही वेळावून पाऊल टाकते तर ती तें टेकतें न टेकतें तोंच तें उचलते. हिच्या गतीचा ताल ठाय तर तिचा द्रुत. जशी जिची चालणूक तशी कांसोट्याची वागणूक. याची पट्टी उजवी डावी करीत उडत राहते तर त्याचा कांठ पावलागणीक केवळ सुरकती घेऊन ताठ होतो; हा टाचेची खबर घेत राहतो तर तो गिरेबाज कबूतरासारखा पिसारा उभारतो. मधून मधून तोही दमतो; मग त्याला उत्तेजित किंवा शांत करण्यासाठीं त्याच्या शेलाट्या शरीरावरून हात फिरवावा लागतो तर कधीं थोपटावा लागतो, तर कधीं बेफाम झालेल्या घोड्याच्या वेसणी सारखा ओढून धरावा लागतो. चरणांच्या अंगुष्ठांत अडकूं नये म्हणून निऱ्यांचा घोळ पुढून एका हातानें सांवरून धरावा तर तेवढ्यांत मागें एकदां तरी ती पोटरी उघडी पडतेच; आणि गालावरच्या खळी-इतकीच मोहक अशी घोट्याजवळची खळी दिसली कीं वाटतें कीं जणूं हेंच अधोमुख अपाङ्गावलोकन आहे ! तोडे किंवा तोड्या हीं यौवनाचीं बाळलेणीं; त्यांचा विलास पृष्ठदर्शनांतच प्रत्ययास येतो. हाराचें स्थान व भाग्य नूपुरांतून उच्च हें निर्विवाद; पण त्याचा भोग अप्रत्यक्ष किंवा चोरटा व त्यासाठीं त्याला पदराखालीं दडावें लागतें. मेखला नितंबांना अलंकृत करते, पण ते नेहमीं अवगुंठित असतात. या उलट पासून नूपुर अलिप्त असतात. तोडा पदन्यासाला वजन देतो व चाल समतोल करतो आणि तोरडी त्याचें तालबद्ध लालित्य व्यक्त करते, सशब्द करते. वाटतें अल्लड मुग्धा खोडसाळ हसत आहे; वाटतें, निर्झराचें पाणी वाहतांना खळखळत आहे ! पुरोगामिनीनें चरणांना पादराग लावलेला दिसत असला तर वाटतें कीं ती कोणाचें तरी हृदय निर्दयपणें टांचेखालीं चिरडून आलेली असून विजयाचीं चिन्हें उन्मादानें मिरवीत आहे !



द्वितीय सन्मुखगामिनीचें दर्शन वस्तुस्थितीमुळें अल्पजीवी आणि संभावितपणाच्या निर्बंधांमुळें क्षणभंगुर असतें; आणि पृष्ठदर्शन शिष्टाचारांचा यत्किंचितही भंग न करतां कोणाच्याही स्वाभिमानाला किंवा स्वयंकेंद्रित अहंकाराला मुळींसुद्धां न दुखवितां पुरोगामिनीच्या वाटचालीच्या मर्यादे-पर्यंत सभ्यपणें तें करतां येतें, हें वेगळेंच.

जंगलांत श्वापदांचा शिकारी सावजांचा पाठलाग करतो. शिकाऱ्यानें सावजाला स्वतःच्या अस्तित्वाची चाहूलही लागूं द्यावयाची नसते. वळींतून अगर जाळींतून सावज मोकळ्या जागीं येईपर्यंत दबा धरून बसायचें असतें. अडचणीच्या जागीं निशाणबाजी निरुपयोगी ठरते. पाचोळ्यावर पडलेल्या पावलाच्या आवाजामुळें धोक्याची कल्पना येऊन सावज सावध झालें अगर चमकलें तर शिकार हुकण्याचा संभव असतो व बिथरलें तर खुद्द शिकाऱ्याच्या जिवावर प्रसंग बेतण्याची शक्यता असते. शिवाय सावजाला सावधगिरीची सूचना देण्यासाठीं शिकाऱ्यावर नजर ठेवणाऱ्या टिटव्या आभाळांत घोटाळत, केकाटत असतातच. पण नागरिकांच्या पाठलागाचें तंत्र वेगळें, मंत्र वेगळे. इथें पाठलागाचें सावज उघडपणें वावरत असतें; तें क्वचितच हातीं लागतें; किंबहुना, तें हातीं लागावें या इच्छेनें किंवा लागेल या अपेक्षेनें क्वचितच पाठलाग केला जातो. पुष्कळ वेळां हा पाठलाग स्वप्नाळू किंवा साहित्यिक (?) असतो; पूर्वतयारी नसते, आनुषंगिक बऱ्यावाईट भावी प्रसंगांना तोंड देण्याची सिद्धता नसते. हा असा पाठलाग केला जातो, कारण कोणा कोणाला त्यांतही मनोमय संभोगाचें सौख्य मर्यादित प्रमाणांत प्राप्त होत असतें. वास्तववादी पाठलागांत सोयीचें नेमस्थळ पाहून सावजाला आपल्या अस्तित्वाची जाणीव करून द्यावी लागते; कधीं अंग चोरावें लागतें तर कधीं चुचकारावें लागतें. स्वयंसेविका वा सख्या भोंवतीं जमल्या व किलबिलाट सुरू झाला कीं रेंगाळावें लागतें, किंवा तिला पाठलागाची सूचना मिळाली हें ओळखून रस्ता सोडावा लागतो. चोरांचीं पावलें चोरांना माहीत. सावजानें एकाएकीं गति वाढविली कीं समजावें तें चमकलें, जवळपास कुठें तरी आश्रयाला जाईल व अदृश्य होईल; गति एकाएकीं खुंटली तर ओळखावें कीं तें बिथरलें. आसपास

इष्टमित्र आहेत, त्याच्याजवळ तक्रार करून बखळ्या मारवीत; गति मंद झाली व जागीजास थबकू लागली, चहूंल घेऊं लागली व साद देऊं लागली; उर्ध्व भाग घुमूं लागला व अधोभाग हेलकावू लागला, बाहू स्फुरूं लागले आणि दण्डांवरल्या किंवा कमरेभोंवतींच्या पेरांच्या व कंचोळ्यांच्या कांटा कांटाकरून रोमें फिरूं लागलीं कीं, समजावें, मावज अनुकूल आहे, मग तूं नेईल तिकडे आपण जावें किंवा आपण पुढें होऊन नेऊं तिकडे तें येईल!

प्रकृतीचा गुप्त हेतू, पण म्हणा, मी अहिल्येचा पाठलाग करूं लागलों तो प्रथम केवळ रसिकतेच्या दृष्टीनें. अभिलाष अद्याप जागा झालेला नव्हता. सार्वजनिक रस्त्यालगतच्या एखाद्या खासगी बागेंतल्या ताटव्यावरली उमललेली फुलें पाहून भीपण जागच्या जागीं थबकतों, ती शोभा पाहून आनंदित होतों, संसाराच्या प्रवाहाबरोबर आपणांस पुढें जावेंच लागतें म्हणून जड अंतःकरणानें तिचा निरोप घेतों! मालमत्तेचें खरें सुख उपभोगांत नसतें, किंवा फक्त उपभोगांतच असतें असें नाहीं; तें मत्तेवरील हक्काच्या दर्शनांत आहे, हक्कांच्या रक्षणाच्या जागरूकतेंत असतें, हक्काच्या उपभोगाच्या मनाईंत असतें. कांहीं वस्तु केवळ त्या आपल्या नाहींत म्हणूनच हव्याशा वाटतात, निदान त्या आवश्यश्या होईपर्यंत, त्यांवरील आपला हक्क प्रस्थापित होईपर्यंत. कोणाला हा हव्यास आवरतो, तर कोणी त्याच्या आहारीं जाऊन अनावर होतात; आक्रमक वृत्तीनें निर्भयनें अग्रारूढ देतात. ज्यांचे नवलें फलद्रूप होतात त्यांना आपण वशवन्त म्हणतों, जे फसतात त्यांना दुर्दैवी किंवा अपेशी किंवा गुन्हेगार म्हणतों. मनाच्या व देहाच्या सर्व वासना स्त्री फक्त जागत, उत्तेजित अथवा तृप्त करूं शकते. तिलाही स्वतःच्या वासना व प्रेरणा असतातच. त्यांनीं प्रेरित किंवा व्याकुळ होऊन तीही आवाहन करूं शकते, उत्तेजित होऊन अभिसरण करूं शकते; मग तिच्या नेत्रावर अभिषिक्त मालकी हक्काचें मोतेंच झालेलें असो किंवा नसो. म्हणूनच स्त्रियांच्या बाबतींत सारप्रसंग वारंवार उद्भवतात आणि त्या हिरिरीनें लढवले जातात. मला वाटतें, असले प्रसंग टाळण्यासाठींच लिच्छवी समर्तांतील सुंदर तरुणींना विवाहबद्ध होण्याची मनाई करण्यांत आलेली होती?

अहिल्येनें मला त्या दिवशीं तास दीड तासपर्यंत कोणकोणत्या रस्त्यांवरून हिंडवलें याची मला आतां तितकी आठवण नाहीं. एवढें मात्र खरें कीं तिच्या हालचालींवरून मला तिच्याबद्दल किंवा तिच्या उद्देशाबद्दल कांहींच अंदाज बांधतां येईना. पावसाचा संभव होता तरी ती संथ चालीनें चालत होती. एक दोन चित्रपटमंदिरांच्या समोरच्या टळक जाहिराती तिनें चालतां चालतां वाचल्या आणि तेथील चित्रफलक जरा थबकून न्याहाळून पाहिले. नंतर ती लगबगीनें चालूं लागली. एकदां तर मला वाटलें कीं तिनें थबकून मागें वळून पाहिलें. रस्ते बदलले व चाल बदलली—मी अजूनही मागोमाग येत आहें कीं काय, हें पाहण्यासाठीं?

त्या एका दृष्टिक्षेपानें माझ्या अंतःकरणांतील व्याध जागृत झाला! अंतःकरणांत विकारांचीं वातचक्रें घुमूं लागलीं. इतकी सन्निध आणि तरीही इतकी दूर? माझीं कर्णाग्रें गरम झालीं. वाटलें, तिनें माझी दोस्ती असती व आम्ही एकांतांत असतों तर मीं तिला म्हटलें असतें—ए, हे बघ माझे कान किती ऊन झाले आहेत!—आणि कमलदलांसारख्या कोमल करांग्रानीं ते तिनें चाचपले असते. कानशिलावरील शिरा ताडताड उडूं लागल्या; वाटलें, तिला थांबवावें, एकीकडे न्यावें, तिला आपली व्याधि










सांगायचं म्हणजे ती कृपा करील, कृपाळून मस्तक शांत करील! घशाला कोरड पडली, रक्त डोळ्यांत उतरत आहे असें वाटूं लागलें.

चालतां चालतां एक ओळखीचें वळण आलें—ओळखीचें म्हणजे माझ्या; कारण त्या बोळांत माझ्या माहितीचें एक संकेतगृह होतें. सुधारलेल्या मोलकरणीसारखी दिसणारी एक मध्यमवयस्क स्त्री त्या बोळांतून बाहेर आली. तिला पाहतांच अहिल्या थबकली. अहिल्येकडे पाहून ती हसली, हिच्या पाठीवरून तिनें हात फिरवला, कानशिलांवर बोटें मोडलीं; त्यांचें कांहीं बोलणें झालें आणि बोलत बोलत त्या दोघी पुढें चालूं लागल्या.

ही सखी कोण? ओळखीची असल्यासारखी वाटली, पण आठवणींत येईना. कोण बरें? कुठें पाहिली होती? चालतां चालतां मी आपल्याशींच चमकलों. एकदम आठवलें. अरे, ही तर बायजा—आमच्या गंगूबाईची निरोपी! आतां मला हिच्या हालचालींचा उलगडा झाला. मी कयास बांधूं शकलों कीं ही अपराण्हाभिसारिका आहे, बायजा तिचें मार्गदर्शन करीत आहे आणि ही दुक्कल कोणत्या तरी संकेतगृहाकडे चाललेली आहे.

अगदीं खरें सांगायचें म्हणजे ही ओळख पटली तेव्हां माझा थोडासा हिरमोड झाला. तोंवर मला अधूनमधून वाटत होतें, ही तशांतली नसावी. तोंपर्यंतच्या पाठलागांत माझ्या वासनांची तीव्रता पावला पावलागणीक वृद्धिंगत होत होती. विशेषतः तिच्या त्या एकाकी दृष्टिक्षेपापासून तो इशारा आहे असा मला अंदेशा होता, खात्री नव्हती. ती असाध्य आहे कीं यत्नसाध्य आहे याबद्दल मला निर्णय घेतां येत नव्हता. बायजाच्या व तिच्या भेटीच्या वेळीं झालेल्या उभयतांच्या हालचाली पाहतांच माझ्या मनांत तीव्र वेगानें घुमणाऱ्या वातचक्रांचा वेग ओसरला आणि पाठलागांतली हिरीरी मंदावली. मनुष्यस्वभावाची ही गोम आहे. मनुष्याला जें हवें असतें तें त्याला अनायासें किंवा अल्प आयासानें अगर अल्प मोलानें मिळालें म्हणजे त्यांतली खुमारी कमी होते. जें मिळविण्यासाठीं प्रयत्नांची पराकाष्ठा करावी लागते तें सुमार असलें तरी त्याच्या प्राप्तीनें बेसुमार समाधान होतें, प्राप्तीच्या झटापटींतल्या प्रत्येक प्रयत्नाचें, परिश्रमाचें स्मरण राहतें. श्रीमंती शिकार—मेहनत हांक्यांची, करामत निशाणबाजांची आणि श्रेय धन्याचें. सगळेच असंतुष्ट. अगदीं दत्ताच्या देवळापासून आपण एखाद्या देखण्या तरुणीचा, तिचा ठावठिकाणा काढण्यासाठीं पाठलाग करावा आणि तिनें हुलकावणी हुलकावणीत आपल्याला एखाद्या कुप्रसिद्ध कुबट बोळांत न्यावें आणि एखाद्या जुनाट वाड्याच्या दरवाजांत उभें राहून मागोमाग येण्याबद्दल निर्लज्जपणें खूण करावी, म्हणजे जें हवें असतें त्याहून अधिक मिळण्याजोगें असलें तरी विरस होतो, शिसारी येते. तशीच माझी अवस्था या ओळखपटणीमुळें झाली. हिंस्र श्वापदें क्षुधेनें तळमळूं लागलीं कीं स्वतः शिकार करून भूक भागवतात आणि कोल्ह्याकुत्र्यांसारखीं क्षुद्र श्वापदें भुकेलीं नसलीं तरी त्यांच्या उच्छिष्टावर ताव मारतात. आमच्यासारख्या लंपटांची हीच जात, हीच गत. ऐट गरुडाची, वृत्ति गिधाडाची; कोणाला मुर्दाड मांस चालतें तर कोणाला कुजलेलें; असलाच तर फरक एवढाच. तें तसें



आहे असें स्पष्टपणें दिसलें नाहीं, किंवा तसें कोणी खोलून सांगितलें नाहीं म्हणजे झालें; आणि निर्ढावलेल्यांना तर याचीही पर्वा नसते!

म्हणूनच अपेक्षाभंग झाला तरी मीं तिची पाठ सोडली नाहीं. विवेक पूर्वीच सोडला होता. ठरविलें, कोठें का जाईना, सारीं ठिकाणें आपलींच आहेत; शिवाय आतां बायजाची मध्यस्थी आहे; या वस्तूचो फरसा करायचीच.

चालतां चालतां मला एकदां वाटलें कीं प्रथम बायजानें आणि नंतर अहिल्येनें एकदां मान जराशी वळवून माझ्याकडे पाहिलें.

चालतां चालतां दोघी जणी शनिवारवाड्याच्या कोपऱ्यावर आल्या. इकडील वस्ती विरळ म्हणून म्हणा किंवा त्यांच्यांत विसंवाद उत्पन्न झाल्यामुळें म्हणा, त्यांच्या बोलण्याचा स्वर जरासा चढला आणि त्यांतलीं कांहीं तुटक वाक्यें माझ्या कानीं आलीं—

"बाई, आज तरी तुम्ही माझें ऐका," अहिल्येचें मनगट धरून बायजा बोलली. "तुम्हांला आणीनच असें मी त्यांना वचन देऊन आलें आहे."

"आज नाहीं, उद्यां नाहीं, कधींहि नाहीं," अहिल्या उत्तेजित स्वरांत म्हणाली. "मला तुझ्या त्या रंगूबाईचें तोंड सुद्धां पहायचें नाहीं, इतकी मला तिची चीड आलेली आहे."

अहिल्या सांगत होती तें अगदीं खरें होतें. रंगूबाई अशी फिदीफिदी हसायची आल्यागेल्याच्या आंगचटीस जायची ही तिला वाईट खोड होती. तिच्या आगाऊपणाची मलाही केव्हां केव्हां चीड येत असे; एकदां केव्हा तर मीं स्पष्टपणें तिची कानउघाडणीही केली होती. पण अडला नारायण. काय करणार?

"मग मी कशाला येऊं तुमच्याबरोबर?" बायजानें थबकून विचारलें.

"तुझी मर्जी," आधुनिक तरुणीप्रमाणें खांदे उडवून अहिल्या म्हणाली.









"येणार असलीस तर चल, सिनेमाला जाऊं, तुझें तिकीट मी काढीन, मग तर झालें ?"

बोलतां तिथेंच थबकली.

अहिल्येनें पुन्हां एकदां अपाङ्गावलोकन केलें.

हा दृष्टिक्षेप माझ्यासाठींच होता काय ? होय, खास. उच्च स्वरांत उच्चारलेले हे शब्दही माझ्याचसाठीं होते काय ? होय, नक्की. एकूण ही तशांतली नाहीं तर ? अरेरे, मीं उगाच गैरसमज करून घेतला. ही साधारणी नाहीं, स्वयंदूती आहे, हें मीं ओळखलें. हिला अनुनयाची अपेक्षा आहे, हीं अनुरक्तीचे मूक तरीही किती बोलके संदेश देत आहे, हें ध्यानीं आलें तेव्हां मी थोडासा उत्तेजित झालों.

तिला तिथेंच सोडून बायजा असंतुष्ट मुद्रेनें कसब्याकडे वळली आणि ही नव्या पुलाकडे.

आतां ही एकटीच होती. आतां माझ्या मनांत थोडी धिटाई आली होती. पुढें पाऊल टाकायचें असें मीं मनाशीं ठरविलें होतें, पण तें कसें याचा मात्र निश्चय होत नव्हता. एकदम पुढें होऊन बोलणें काढावें ? कीं देवळाच्या आगाशींत जाऊन उभें रहावें ?

आतां विजा कडाडूं लागल्या आणि वाऱ्यालाहि मस्ती आली. पाऊस लवकरच येणार, कोसळणार, अशीं चिन्हें दिसूं लागलीं. पलीकडल्या पदपथावर चिमण्या मृत्तिकास्नान करूं लागल्या. आपला जोर किती आहे याची वाटसरूंना बानगी दाखवावी म्हणूनच मेघराजानें टपोऱ्या तुटक थेंबांचा धिमा वर्षाव आरंभिला. पळापळाच्या व पावलापावलाच्या अंतरानें जणू मोकळ्यावरील व्यक्तिमात्रावर नेम धरून मारल्यासारखे ते लागूं लागले.

त्या वेळीं आम्ही शिवाजीनगरच्या डाकघराच्या वळणावर आलों होतों. मुसळधार पर्जन्याची आगाऊ अंधारी आभाळांत दाटली होती. पावसाच्या धास्तीनें पादचाऱ्यांची पांगापांग सुरू झाली होती. जो तो खालीं मान घालून भुंवईवर तळहाताचें आच्छादन धरून व सोगे आवरून कोठलें तरी आश्रयस्थान मनांत धरून तिकडे धावण्यांत व्यग्र होता.

आतां रस्त्यावर आम्ही दोघेंच. आमच्यावर कोणाचीही दृष्टि नाहीं. हमरस्त्यावर, दिवसाढवळ्या एकांत ! किती अनपेक्षित, किती अनुकूल !

डाव्या हातीं निऱ्या, उजव्या हातीं पदर, सोगे सावरून पदपथ तरून ती किती लगबगीनें चालली होती. अधोमुख, तरीही ऊर्ध्वनेत्र—पावसाचा अंदाज पाहण्यासाठीं. हिची अडचण हीच माझी संधि. मी कधींही छत्री बरोबर न घेणारा, त्या दिवशींच कशी बुद्धि झाली होती, राम जाणे. छत्री उघडून मी पुढें झालों, तिला गांठलें. संकटांत सांपडलेल्या स्त्रीला साह्य करणें हीच सभ्यता नव्हे काय ? कोणाही सुशिक्षिताला विचारा, तो होय असेंच सांगेल. पण तो माझ्यासारखी झेप घेईलच असें मात्र सांगवत नाहीं. कारण अशा प्रसंगीं शिष्टपणाच्या फाजील कल्पनांनी मन डचमळतें, पाऊल अडखळतें !

आविर्भावांत सभ्यता आणि स्वरांत गांभीर्य आणून मी तिच्या अगदीं शेजारीं जाऊन कुजबुजलों,

"छत्रींतून चलणार का ?"

तिचे ते काळेभोर डोळे पुन्हां एकदां अगदीं जवळून चमकलेले दिसले तिच्या जिवणीचें सूक्ष्म स्पंदन झालें. औचित्यभंगाबद्दल रोष व्यक्त करणार ! क्षणभर वाटलें, ती माझ्या विनंतीचा अव्हेर करणार. आज कोणाचेंच कांहींही ऐकायचें नाहीं असें हिनें ठरविलें होतें कीं काय ? डरलों होतों, निराश झालों होतों, तरी धीर करून पुटपुलों,

"निदान देवळाच्या आगाशीपर्यंत—"

आगाशी किती नजीक आहे हें मीं तिला हस्तक्षेपानें दाखविलें.

इतक्यांत एका टपोऱ्या थेंबाचा फटकारा तिच्या पापणीवर बसला आणि लगोलग दुसऱ्या. त्यासरशीं कृष्णकमळ जरासें झुकलें. पदरावरला हात भुंवईवर गेला. डोळे किलकिले झाले. मान वेळावून तिनें फडफडता पदर दातांत दाबून धरला. ओलसर झालेलें तिचें वस्त्र जागोजाग तिच्या टंच अंगाला चिकटलें होतें, तिथें तिथें तिची ती रसरसशीत कान्ति व्यक्त होत होती !

या पावसामुळें अगदीं नाइलाज झाला आहे, तुम्ही निरुपद्रवी, सभ्य दिसत आहांत आणि केवळ माणुसकीच्या कळवळ्यानें विनवीत आहांत म्हणूनच, माझ्यासाठीं नव्हे, केवळ तुमच्या शब्दासाठीं, मी या शिष्टा-

चाग़ुल... ...त आहे, असें कांहींसें मूक कथन करून ती माझ्या छत्रींत आली !

आम्ही ...र चालूं लागलों. तेवढ्यांत पावसाचा वर्षाव सुरू झाला. त्याचा जोर वाढूं लागला, तसतसें आमच्यामधलें अंतर कमी कमी होऊं लागलें; अगाली अंग घासूं लागलें, जमिनीच्या सपाटीपासून छत्रीची उंची कमी कमी होऊं लागली ! पहिलीं सात पावलें मोजीपर्यंत ...धर्मांच्या ...प्रमाणें छत्री माझ्या उजव्या हातांतच होती. ओहळ्या माझ्या डावी-कडे होती. पश्चिमेकडून येणारा वहात असल्यामुळें रस्ता ओलांडतांना पाव-साचा शिडकावा तिच्या डावीवर होऊं लागला, याकडे माझें दाक्षिण्यपूर्ण लक्ष कसें गेलें नाहीं, कोण जाणे. तिनें पदर डाव्या हातांत घेतला आणि उजव्या हातानें छत्रीचा दांडा धरून तो आपल्या बाजूला कलता केला. आम्ही एकमेकांकडे पाहून हसलों. सलगीला सुरुवात होईपर्यंतच स्त्रियांच्या वृत्तींत संकोच असतो. धीर चेपला म्हणजे लगोलग त्या लगाम हातीं घेतात आणि मग आपल्याला वाटूं लागतें, सहज कशी खेळविते ललना !

—आम्ही एकमेकांना किती खेटून चाललों होतों ! तिच्या शरीरांत सळसळणाऱ्या गरम रक्ताची धग मला जाणवली. आतां तिच्या शरीरांतून असा एक मंद सुगंध दरवळूं लागला होता कीं त्यापुढें तापलेल्या धरित्रीवर पहिल्या पावसाचा शिडकाव झाला म्हणजे सुटतो तो सुगंधही दुय्यम दर्जाचा वाटावा. मीं हा गंध अधाशीपणें हुंगला. वाटलें, फिरून एवढीही संधी मिळणार नाहीं. माझ्या भाग्याची मजल कोठवर आहे, याचा कांहींच अंदाज करतां येण्याजोगा नव्हता.

चौकापासून आगाशीपर्यंतचें अंतर आम्हीं घाई घाईनें तोडलें. आगाशी नजीक असल्याच्या सबबीवर मीं तिला छत्रींत घेतलें होतें. छत्रींत आल्यानंतर सुद्धां तिची कोण लगबग. वाटूं लागलें, आगाशी आणखी अंतरावर असती तर किती बरें झालें असतें. सबब साधली कीं ती तुटपुंजी वाटूं लागते !

आगाशीच्या आश्रयाला आल्यावर, जरा वाकून, जरा कणा वेळावून ती छत्रीच्या बाहेर पडली आणि क्षणभर दरवाजाच्या बाहीला टेकली. तेवढ्यांत तिनें आजूबाजूच्या परिस्थितीचा अंदाज घेतला, आणि मंद स्मित करून एक निःश्वास सोडला. भुंवईवरून ओघळणारे जलबिंदू तर्जनीनें ओढून झटकून टाकले; ओठांवरून व दण्डांवरून ओघळणारे जलबिंदू ओलसर पदरानें हलक्या हातानें टिपले. मला तोंवर वाटलें होतें कीं तिनें ओष्ठराग लावलेला असावा; मुखराग तर नक्कीच; पण नाहीं; तिच्या शरीराची मुलायम लवलव कांति नैसर्गिक होती. मला वाटलें होतें कीं तिनें डोळ्यांत काजळ तरी घातलेलें असेल; पण नाहीं. पदराच्या टोकानें तिनें डोळे पुसून घेतले, तरी तिच्या पापण्यांवरील गडद कृष्णरेखा फिक्या झाल्या नाहींत. तिच्या मुखावर कृत्रिम असें कांहीं कांहीं नव्हतें. जरा वांकून तिनें पोटऱ्यांवर ठिबकलेलें पाणी टिपून घेतलें. ओला झालेला पदर पिळून टाकला आणि आळोखे पिळोखे देऊन कणा तवाना केला.

माझ्या हृदयाचें स्पंदन क्षणभर थांबलेंसें मला वाटलें. ओ हो—काय



हें सौंदर्य आणि सौष्ठव; आणि किती ही गेंददार टवटवी ?

त्या थोड्या अंतरांत जोरदार पावसानें आम्हांला खूपच झोडपलें होतें. केस ओले झाल्यामुळें अजूनही कपाळावर पुन्हा पुन्हा जलबिंदु ओघळत होते. तिचा खरोखरच नाइलाज झालेला होता. पदर दांतीं धरून तिनें अंबाडा सोडला, चान्द्रोनदां केस झटकले,. ओल्या पदरानेंच जरा कोरडे केले. तेवढ्यांत मीं पुढें केलेल्या हातरुमालानें आणखी पुसले आणि पुन्हा बांधले. तिचा तो भरदार अंबाडा उघडा पाहिला तेव्हां मला वाटलें होतें कीं केशसंभाराचा हा सारा डौल गंगावनांचा असावा—पण नाहीं. हें वैपुल्यही नैसर्गिक होतें. तिच्या कुरळ्या बटा मला यमुनेच्या उन्हाळ्यातल्या पुरावरल्या लाटांसारख्या भासल्या.

तिचे हे विभ्रम मी एकाग्रतेनें पहात होतों, हें तिच्या ध्यानीं आलें तेव्हां तिनें एक थरथरता निःश्वास सोडला. तिनें माझा रुमाल मला परत दिला आणि जरा हसऱ्या, जरा किलकिल्या नजरेनें ती माझ्याकडे पाहूं लागली. आतां कांहीं तरी बोललेंच पाहिजे, कोणी तरी सुरुवात केलीच पाहिजे.

"सिनेमाला निघालां होतां ना ?" मीं दबक्या स्वरात विचारलें.

"तुम्हांला काय ठाऊक?" ओठावर तर्जनी टेकून तिनें विचारलें. प्रश्नाचें उत्तर प्रश्नानें देण्याची कित्येकांची लकबच असते.

आतां काय करावें ? बायजाशीं तिचें बोलणें झालें त्याची आठवण द्यावी कीं काय ? जरा विचार करून मी म्हणालों,

"तुम्ही जाहिराती पहात चाललां होतां, म्हणून वाटलं—"

"म्हणजे ? तुम्ही तिथपासून माझ्या मागं मागं येत होतां कीं काय ?"

काय सांगूं? होय कीं नाहीं ? काय, याबद्दल तिला माझा निषेध करा-यचा होता ? कीं तिला माझ्या रसिकतेचें कौतुक करायचें होतें ? मीं तिच्याकडे रोखून पाहिलें. निषेध ? नाहीं. कौतुक ? खास.

"जसं कांहीं तुम्हांला माहीतच नाहीं!" मींही उत्तरादाखल प्रश्न केला.

"काय तरी बाई !" ती कौतुकानें उद्गारली.

इतक्यांत देवळाच्या दारांत एक टांगा थांबला. भागला मेणकापडाचा








पडदा उघडून एक तुंदिलतनु वयस्क गृहस्थ खालीं उतरले व छत्री उघडून देवळाकडे वळले. त्यांना पाहतांच माझी छाती धडधडली, कारण त्यांचा माझा थोडाबहुत परिचय होता. ते एक प्रसिद्ध ठेकेदार होते. रोज सायंकाळीं देवदर्शनाला जाण्याचा त्यांचा परिपाठ होता आणि आपली ही देवभक्ति शक्य तितक्या अधिक लोकांच्या दृष्टीस पडावी अशी त्यांची नेहमी खटपट असे. काय दुर्दैवाचा खेळ असतो पहा. नाहीं तर ऐन मोक्याच्या वेळीं ह्या डेरपोट्याला इकडे उपस्थायची बुद्धि कां झाली असती ? माझ्या शेजारीं एक कुलस्त्री उभी आहे, या शरमेनें तरी तो वर न पाहतां पुढें जावो, अशी मीं मनातल्या मनांत देवाजवळ प्रार्थना केली. पण जें होऊं नये किंवा होणार नाहीं असें वाटत होतें तेंच झालें. ह्या बुवाजोंनीं प्रथम बाईसाहेबांकडेच पाहिलें आणि मला ओळखलें.

"काय अप्पासाहेब, आज इकडे कोणीकडे ? देवदर्शनाला कां —?"

त्यांच्या बोलण्यांत थोडी कानडी धाटणी होती. 'कीं' ने पुढें प्रश्न सोडून देण्याची त्यांची लकब त्यांच्या परिचितांच्या ओळखीची होती. वाटत होतें, बुड्ढ्याला झटकून टाकावें; विचारावें, देवदर्शनाला जाण्याला मी काय म्हतारा झालों आहें, कीं हताश झालों आहें, कीं ढोंगी बनलों आहें ? पण मन आवरलें.

"नाहीं हो; निघालों होतों सिनेमाला, पण वाटेंत पावसानें गांठलें."

"वा, वा ! अशा पावसांत, बाईसाहेब बरोबर आणि पायीं पायीं ? टांगा तरी घ्यायचा ?" वडीलकीच्या हक्कानें दटावणीच्या स्वरांत ठेकेदार मजकूर उद्गारले.

त्यांचे उद्गार ऐकून 'आमच्या बाईसाहेब' खुद्कन् हसल्या.

हें पाहून मला किती बरें वाटलें म्हणून सांगूं ? धास्ती पडली होती कीं ही बया तिऱ्हाइतासमोर या आरोपित नात्याचा इन्कार करते कीं काय !

"आतां टांगा दिसला कीं घेतोंच !" उसनें स्मित धारण करून मी म्हणालों.

म्हातारबुवा चमकले.

"वा, वा ! हीच का आमची किंमत केलीत ? तुमच्या वडिलांचा व आमचा केवढा घरोबा आणि तुम्हांला एवढा संकोच ? तुम्ही हक्कानें टांगा मागायला हवा होता. तें कांहीं नाहीं. चला—चला, आपल्या टांग्यांत बसा आणखी कुठें जायचें असेल तिथें घेऊन जा."

"पण निष्कारण तुमची गैरसोय—" मी चांचरत म्हणालों.

म्हातारा ऐकेना. मी कां कूं करीत होतों कारण बाईसाहेबांच्या संमतीची शाश्वती वाटत नव्हती. त्यांची कबुली मला हवीच होती. ती या मध्यस्थानें मिळविली. आपण काय करीत आहोंत याची त्या बिचाऱ्याला कल्पनाही नव्हती. मनाशीं मी त्याला शिव्याशाप देत होतों, आणि धन्यवाद. म्हाताऱ्यानें जवळ जवळ मला ओढलेंच.

"चला," मी बाईसाहेबांकडे वळून म्हणालों. "अयता टांगा आला आहे, शेटजींचा आग्रह आहे, वेळेवर तरी पोंचूं."

परिस्थिति अशी विलक्षण कीं तिलाही हें आमंत्रण नाकारतां येईना. आम्हां धटिंगणांचा धिक्कार करून माझी फजिती करणें, किंवा या कपट-नाटकाचा समाधानकारक परिपोष करणें आतां तिच्या हातीं होतें.

जी संधि हवी होती ती अनायासें मिळाली.

आम्ही उभयतां टांग्यांत बसलों. स्नेह्याच्या सुनेबद्दलची आपुलकी व्यक्त करण्यासाठीं खुद्द शेटजींनीं टांग्याचा मागचा पडदा लावला; आणि पाऊस



अनुक्रमणिका

अजून पुढेंच होता. शेटजींनीं आम्हां उभयतांना नमस्कार केला. मीं त्याचे आभार मानले. आम्हांला पोंचवून टांगा परत आणण्याची मोतद्दाराला सूचना देऊन ते देवळाकडे वळले. टांगा चालूं लागला.

टांगा जरासा पुढें गेल्यावर टाळी वाजवून अहिल्या खदखदून हसली.

हेल्याराणी दुसऱ्या कशांतही मनुष्याची संस्कृति व्यक्त होत नाहीं. एका श्रीमंत पतीच्या राणीसाहेब माझ्या ओळखीच्या आहेत, त्या हसूं लागल्या कीं वाटतें, माजालागलेली एखादी घोडी खिंकाळते आहे ! आधुनिक दिल्लीनजीक व कुतुबमीनाजवळ असलेल्या राय पिथोराच्या लाल कोटांत एक प्राचीन मंदिर आहे. त्यांत छोट्या घंटाचे पुंजके टांगलेले आहेत; हलकासा हेलकावा दिला कीं साऱ्या घंटा किणकिण वाजूं लागतात, किती तरी वेळ वाजत राहतात. जाणकार सांगतात कीं त्यांच्या नादांत संगीतिचें होम मुद्रित केलेलें आहे ! अहिल्येचें हास्य ऐकून या मंदिरांतील घंटिकानिनादांची मला आठवण झाली !

त्या हास्यानें मी उत्तेजित झालों. मीही हसलों. पण किती घोगरें !

जणूं टांग्याच्या हादऱ्यामुळेंच मी जरासा तिच्या बाजूला सरकलों; आणि ती माझ्या !

त्या अनपेक्षित एकांतांत आम्ही एकमेकांना खेटून बसलों. एकमेकांकडे पाहून पुन्हा एकदां खदखदां हसलों.

आमची 'भेट करून द्यायची, आमचा परिचय करवून द्यायचा आणि आम्हांला एकांत मिळवून द्यायचा असा डाव जणू दैवानेंच टाकला होता.

'सप्तपदी झाली, वरातही निघाली ! मी हलकेंच कुजबुजलों."

"इश्श ! !

शब्दसृष्टींत हा उद्गार अद्वितीय आहे. जगांतल्या दुसऱ्या कोणत्याही भाषेंत त्याला प्रतिशब्द नाहीं. व्युत्पत्तिशास्त्रावर एक जाडा ग्रंथ लिहीत असलेले माझे विद्वान मित्र सांगतात—

व्युत्पत्ति शोधत गेलें उद्गारमंत्रांत. मेन तरी असें असतें त्याला कधीं काळवेळ नसतच नाहीं.

'इश्श' या शब्दानें व्यक्त होणारा अर्थ त्याच्या उत्पत्तीवर व तो उच्चारणाऱ्या व्यक्तीच्या आविर्भावावर अवलंबून असतो. शब्दांची सुरवात निषेधपर, पण आविर्भाव प्रोत्साहक होता—एवढें का मला कळत नाहीं ?

मागें काय चाललें आहे इकडे मोतद्दाराचें लक्ष नाहीं याबद्दल तिनें तेवढ्यांत खात्री करून घेतली.

हेंही माझ्या नजरेंतून निसटलें नाहीं.

पण हें मला अगोदर कसें सुचलें नाहीं ?—पुरुषांची जातच अडाणी !

प्रियाराधनेंतलें आणखी एखादें पाऊल पुढें टाकलें तरी चालेल याचीच ही मूक सूचना होती कीं काय ?

पावसाला एकाएकीं कोण मस्ती आली ! अवचित, तिरपा, सर्व बाजूंनीं तो कोसळत होता. जेथें त्याच्या धारा प्रत्यक्ष पोंचणार नाहींत तेथेंही तुषार उडावे व वस्तुजात ओलेचिंब व्हावें, यासाठींच जणूं वाऱ्यानेंही एकाएकीं उठावणी केली. समोरून धारा येऊं लागल्या म्हणून टांगेवाल्यानें पुढला पडदा सांवरून घेतला. बाजूंच्या पडद्यांतूनही पावसाच्या धारा आंत येऊं लागल्या; विशेषतः तिच्या बाजूनें. केवळ त्यांचा मार चुकविण्यासाठीं ती आणखी अलीकडे सरकली.






अपरिचित तरुणीच्या शरीराच्या अग्रभागानेही ऊब किती उत्तेजक असते! माझें मस्तक गरगरलें. बुडणाऱ्याच्या वृत्तीनें तोंड लागला.

शब्द उच्चारण्याइतका भानावर आलों, तेव्हां कौतुकानें मान डोलवीत उद्गारलों;

"तूं किती सुंदर दिसतेस!"

तिनें प्रत्युत्तरादाखल नुसता अस्पष्ट हुंकार दिला. एकदां माझ्याकडे रोखून पाहिलें. पुन्हा एकदां मान उंचावून पडद्याकडे पाहिलें.

तिच्या हातांची हालचाल झाल्याचा मला भास झाला. मीं जरा वाकून पाहिलें. त्या अंधारांतही तिचा उजवा हात जरा उंचावलेला दिसला; बोटें उघडलेलीं दिसलीं. काकडल्यामुळें? कीं आवाहन? निर्णय घेण्यापूर्वींच माझीं बोटें त्यांत गुंतलीं. तिनें प्रतिकार केला नाहीं, उलट मूठमिठी घट्ट दाबून धरली.

पुरा भानावर आल्यावर मी उद्गारलों—

"आणि हें पाणिग्रहण!"

"इश्श्!—"

—या एकुलत्या एका शब्दाच्या आधारावर स्त्रिया किती तरी वेळ संभाषण चालू ठेवूं शकतात!

कलती मान, गद्गद स्वर; गालांवर खळी, उमललेली जिवणी!

दैवयोगामुळें दरिद्र्याला द्रव्याचा ठेवा अचानक आढळावा, म्हणजे हें घेऊं कीं तें घेऊं असें त्याला होऊन जातें. माझी अवस्था जवळजवळ अशीच झाली.

पाणिग्रहणाच्या परदेशी पद्धतींतलें माधुर्य या अनुभवानें प्रथमच प्रत्ययास आलें. आतां स्कन्धग्रहणाची देशी पद्धत—

मी जरासा सरसावलों.

माझा इरादा तिनें ओळखला. ऊर्ध्वभाग उलटीकडे करता करून, सस्मित, पण दटावणीच्या स्वरांत अहिल्या म्हणाली,

"हो हो, जरा दमानें घ्या!"

होय! हेंही खरेंच. पंगत सुरू होण्यापूर्वीच पानावरलें एखादें उचलून तोंडांत टाकावें तसें माझें होत होतें.

अपेक्षा अंशतः तरी पूर्ण होण्याची संधि लवकरच येणार आहे असें मला भानच राहिलें नव्हतें.

चित्रमंदिराच्या समोर टांगा उभा राहिला. मीं टांगेवाल्याला बक्षिसी दिली. त्यानें सलाम केला.

चित्रमंदिराच्या आवारांत शुकशुकाट होता. प्रवेशपत्रिका खरेदी करण्यासाठीं मीं अहिल्येच्या हातीं दहा रुपयांची नोट दिली. क्रीडांगणाभोंवतीं राहणाऱ्या नागरिकांचा शिष्टाचार! तिनें वरच्या वर्गाचीं दोन तिकिटें घेतलीं. कुलस्त्रियांच्या नेहमींच्या रिवाजाप्रमाणें परत मिळालेली मोड तिनें कनवटीला लावली.

ही प्रतिक्रिया पहायला मी उत्सुक होतों; कारण तीवर माझ्या पुढील योजना अवलंबून होत्या. म्हणूनच तर मीं दहा रुपयांची नोट तिच्या हातीं दिली होती. ही घटना कोणा तिऱ्हाइतानें पाहिली असती तरी तींत त्याला विलक्षण असें कांहीं दिसलें नसतें.

आम्ही चित्रमंदिरांत प्रविष्ट झालों तेव्हां मुख्य चित्रपट नुकताच सुरू झाला होता. पावसानें प्रेक्षकांना थोपवून धरल्यामुळें गर्दी नव्हती. आमच्या








वरच्या रांगेत तर अगदीं पलीकडे बसलेल्या एका जोडप्याखेरीज चिट-पांखरूंही नव्हतें. आणखी कोणी प्रेक्षक आलेच तर त्यांना उपसर्ग होणार नाहीं अशी जागा हेरून तेथील मऊ मऊ खुर्च्यांवर आम्ही अधिष्ठित झालों.

भोंवतीं अंधार; समोर उत्तेजक नृत्य; शेजारीं उत्सुक यौवन; आणि एकान्त.

अहिल्येच्या स्कन्धाखालीं हात घालून मीं तिला जवळ ओढलें आणि हनुवटी उचलून अधीरपणें तिचें पहिलें चुंबन घेतलें. आलिंगनांत विलीन होतांना तिनें श्वास घेऊन तो रोधून धरला. त्याची झुळूक मला ऐकूंही आली. जणूं मनपसंत सुगंधाचा आस्वाद घ्यावा आणि अनुभवाला त्याची आठवण रहावी म्हणून अंतःकरणांत भिनेपर्यंत तो रोधून धरावा! आम्ही किती तरी वेळपर्यंत त्याच अवस्थेंत होतों. चुंबनें आणि प्रतिचुंबनें. ओघाला आलें म्हणून सांगतों, ग्रामीण स्त्रिया चुम्बन घेऊं देतात, घेत नाहींत; येत नाहीं का, म्हणून विचारलें तर लाजतात; आपलें लक्ष नाहीं अशी संधि पाहून एकादा प्रयत्न करून पाहतात. पण त्यांना तें जमत नाहीं. त्यांना यांतलें स्वारस्यच उमजलेलें नसतें. गालांचें चुम्बन घेऊं देतात, ओठ चुकवतात, देत नाहींत; मागितले तर रागाला येतात; मग जीभ देण्या-घेण्याची बात दूरच; अद्याप त्यांना जिभेची गोडी लागलेली नाहीं, कीं यांतही जातीयतेची सुप्त जाणीव असते? अनुनयप्रकरणांतील हे विधि सुसंस्कृततेचें द्योतक आहेत. प्रेरणा नैसर्गिक, आविष्कार नागरिक, सूचना सांकेतिक. आतांपर्यंतच्या अनुभवामुळें वाटत होतें कीं येथेंही प्रतिपक्ष केला जाणार नाहीं. पण नाहीं. विविध विधींचा अनपेक्षित अनुभूत आस्वाद लाधला. त्या बेभान अवस्थेंत आम्ही किती वेळ होतों, कोण जाणे.

तेवढ्यांत दरवाजावरला कापडी पडदा सरकला. कोंपऱ्यांतला दिवा लागला. आम्ही दचकून अलग झालों. आणखी एक जोडपें आंत आलें. विद्युत् प्रकाशाचा एक तीर अंधाराला भेदून आमच्या अंगावरून पलीकडल्या जोडप्यापर्यंत गेला व पुन्हा त्याच मार्गानें परतून या नव्या जोडप्यानें निवडलेल्या तिसऱ्या कोपऱ्यांतील आसन्दिकांवर क्षणमात्र स्थिर झाला. दारावरला पडदा पुन्हा सरकला व फिरून अंधार झाला. विद्युत्प्रकाशाच्या त्या अचानक झोतामुळें अहिल्या एकाएकीं इतकी कां दचकली?

"काय तरी मेल्यांचा त्रास!" ती पुटपुटली.

"त्यांनीं बिचाऱ्यांनीं काय पाप केलें? आपल्यासारखेच तेही खेळ—"

बोलतां बोलतां मला वाटलें, खेळ पहायला, याच्याऐवजीं खेळ करायला, असा प्रयोग करावा. पण माझें वाक्य पुरें होण्यापूर्वींच अहिल्या म्हणाली,

"त्यांना नाहीं हो, या दारवानांचा."

तिचें म्हणणें अगदीं खरें होतें. मलाहि त्यांच्या चटोरपणाचा उपसर्ग वारंवार सहन करावा लागला होता. चित्रमंदिरांच्या दारवानांना संवयच असते, कोठें काय चाललें आहे हें ओझरत्या विद्युत्प्रकाशांत पाहण्याची. जणूं काय त्यांना यांत नवीन किंवा अनपेक्षित असें कांहीं असतें. दारवानाची



चांगली हजेरी घ्यावी असें मला वाटलें. पण आतांच तसें करण्यांत धोका आहे याची जाणीव होतांच मी थंडावलों.

अंधार होऊन स्थिरस्थावर झाल्यावर मीं तिला पुन्हा पूर्वीच्याच आवेशानें जवळ ओढून घेतलें. दोन खुर्च्यांच्या दरम्यान असलेल्या त्या लाकडी हातांची आम्हांला किती अडचण वाटली म्हणून सांगूं? एवढे पैसे घेतात व मिळवतात हे लोक, मग येथं कोचें कां टाकीत नाहींत? नकोरे बाग, आहे हेंच ठीक आहे. अशा आडकाठ्या आहेत म्हणूनच येथें शिष्टाचारांपलीकडे मजल जात नाहीं!

तिच्या बोटांत बोटें गुंतवून मीं तिला विचारलें,

"हें बघ, आपली ओळख होऊन किती तरी वेळ झाला, साध्या ओळखीपुढची केवढी तरी मजल आपण मारली, पण अजून तूं मला तुझं नांव-गांवसुद्धां सांगितलं नाहींस!"

"कशाला उगीच? आज भेट झाली, उद्यां विसरून जाल."

"असं कां बोलतेस? आपला कांहींतरी लागाबांधा असल्याशिवाय आपली भेट झाली असेल का? मला एकदम असें तोडून टाकण्यांत तुला कांहींच का वाटत नाहीं?"

मी आतां अगदीं खऱ्या कळवळ्यानें बोलत होतों. भावनेचें तेंच सूत्र धरून तिनें विचारलें,

"कशाला मला गोत्यांत घालतां?"

गोता? पतंगांच्या काटाकाटीचा खेळ गोत्यावरच अवलंबून असतो. आभाळांत पतंग उडत असतात. कोणी केवळ पोरखेळ म्हणून हौसेसाठीं पतंग उडवीत असतात, तर कोणी शिकारी ईर्ष्येनें काटाकाटीसाठीं. काटाकाटीचें इशारेहि ठरलेले असतात. पाहिजे तर आव्हानाची सलामी स्वीकारावी, अगर लढत सुरू होण्यापूर्वींच माघार घ्यावी. एकाद्या उडत्या पतंगाभोवतीं दुसरा एकादा एकाएकीं गोता, झडप घालतो आणि पहिल्याच्या दोऱ्याभोवतीं अढी घालून, दिशा बदलून पुन्हा वर चढतो. काटाकाटीचें



## मज नव्हती हिंमत !

स्वीकारल्या प्रेम तुझें
केली बाजारभावानें
धुंवाधार पावसांत
हिंडावयास हिंमत
फिरतांना पावसांत
संरक्षणाच्या साधनीं
तैशीच मी भ्याड! केलें
आत्मरक्षणार्थ केली

काय नव्हतें कळत
तुझ्या [illegible]दारीं होईल
परि [illegible] वरदान
कँवि कळपावेगळी
स्वीकारांया प्रेम तुझें
डांबुनियां ठेवणारी

तुज परत लावाया
तुझ्या प्रेमाची ओळख
तीच द्यावया ओळख
धारिष्टाच्याच अभावीं
ओढवल्या अरिष्टांत
भ्याडपणानें घेतलें
आणि तुझें वरदान
केली बाजारभावानें
तुला परत लावाया
स्थितीमाजीं त्या सुचला

झाली जिव्हारीं जखम
'कित निर्दय' म्हणून
परि [illegible]वर जखम
कुणासही कळेल ना
आणि कळोच ना कोण्या
आणि रक्त वाहतें जें

मज नव्हती हिंमत
त्याची म्हणून किंमत
चिंब भिजत भिजत
हवी अंगांत मनांत
डोईवर धरणें छत्री
वृत्ति लपलीसे भित्री
तुझ्या प्रसादाचें मोल
पुढें नोटांची मीं ढाल

देतां किंमतीचे दाम
तेणें जबर जखम
सांग कसें अंगिकारूं ?
वाट धरील मेंढरूं ?
काय आहें मी मोकळी ?
गळां पहा ही साखळी !

समजूत घालूनिया
होती पाहिजे द्यावया
हवें मुळांत धारिष्ट
सर्व ओढवे अरिष्ट !
काय करूं तरी सांग ?
मूढपणाचें मीं सोंग
घालूनिया तांजव्यांत
तुझ्या हातांत किंमत
तुला करावें जखमी
हाच उपाय हुकमी

गेलास तूं विव्हळत
असशील निखंदत
झाली तुला न केवळ
मीहि अंतरीं घायाळ
माझी चिर तळमळ
उरांतून भळभळ !

—यशवन्त

सारें स्वारस्य या पहिल्या पेचांत असतें; कारण हा पेच सुटणारा नसतो; कारण ही लढत बरोबरीनें केव्हांही सुटणारी असते. नंतर दोघांनींही असारी सैल सोडून नुसती ढील देत रहावें. दोन्हीही डोलत डोलत लांबवर जाऊं लागतात. वाऱ्याच्या लहरींचा मोका साधून खेळाडू पवित्रे बदलीत हालचाली करूं लागतात आणि झटके घेऊन पतंग एकदम वर चढापतात. पहिल्या दुसऱ्या ताणांत कोणता तरी पतंग कटतो. ज्याचा मांजा मजबूत आणि धारदार असतो तो जातो आणि मैदान जिंकणाऱ्याचा पतंग आभाळांत घिरट्या घालूं लागतो. जो कटतो त्याची दुर्दशा विचारूंच नका, कोणी दोरा ओरबाडतो तर कोणी पतंगावरच झडप घालतो. या झटापटींत पतंगाचा बहुधा चोळामेळा होऊन जातो. प्रेमाचा खेळ असाच असतो, निकाली व निर्दय. ऋणानुबंधाच्या सूत्रांभोंवतीं पहिली फिरकी [illegible]च या खेळांतून माघार घेण्याची शक्यता असते, पुढें नाहीं.

अहिल्येचें आव्हान मीं स्वीकारलें होतें आणि मारें तिनें; परंतु रांभोंवतीं आमच्या मिठ्या यापूर्वींच पडल्या होत्या; आतां कोणालाही माघार घेतां येणें शक्य नव्हतें.

"सांग ना—!" मीं तिचा हात थोपटीत विचारलें.

"माझं नांव, माझं नांव—" ती थबकत थबकत म्हणाली, "सुलोचना."

"खोटं—" मी एकदम उद्गारलों.

चोरट्या प्रेमाच्या जगांत असा खोटेपणा नेहमीच चाललेला असतो. इथें सांगण्यांत येणारीं नांवें खरीं नसतात, देण्यांत येणारे पत्ते बनावट असतात, अगदीं गळ्यावर हात ठेवून घेण्यांत येणाऱ्या शपथा देखील खोट्या असतात; आणि येथें देण्याघेण्यांत येणारीं आश्वासनें क्वचितच पाळण्यांत येतात; आणि हें सारें उभयतांना माहीत असतें; तरीही प्रश्न विचारले जातात, उत्तरें दिलीं जातात !

"खोटं ? मग तुम्हीच सांगा बघूं." तिनें खोडकर आवाजांत विचारलें.

"ओळखलं तर काय देशील ?"

"तुम्ही मागाल तें."

"बघ बरं, नाहीं तर मागाहून नाकबूल जाशील—"

"नाहीं जाणार; अगदीं माझ्या गळ्याशपथ; म्हणाल तें ऐकेन."

जणूं मी काय मागणार आहें याचा तिला अंदाजच नव्हता, आणि तें तिला अमान्य होणार होतें !

"सांगूं ? तुझं नांव अहिल्या—"

या नांवाचा उच्चार होतांच ती दचकली. "अगबाई—" स्वतःशींच पुटपुटली, माझ्या मिठींतून अंग घुसळून तिनें स्वतःला झटकन सोडवून घेतलें. तिच्या हालचालीवरून वाटलें, ही एकाएकीं निघून जाते कीं काय !

नाजुक सुखस्वप्नाला कठोर सत्यसृष्टीचा स्पर्श झाला कीं मनाला असाच धक्का बसतो.

"एवढें विचकायला काय झालें, अहिल्या ?" तिची हनुवटी वर उचलून व माझ्याकडे करती करून मीं तिला विचारलें.

भीतीनें तिचा ऊर धडधडत होता. जरा शांत झाल्यावर तिनें विचारलें,

"तुम्हीच अगोदर हें सांगा, तुम्हाला माझं नांव कोणी सांगितलं ?"

तिच्या केसांवरून हात फिरवीत मी म्हणालों,

"येडी रे येडी ! अग, तुझं नांव तुझ्या हातावर गोंदलेलं आहे, पहा, याचीसुद्धां तुला शुद्ध नाहीं ?"

तिनें सुटकेचा निःश्वास सोडला, आणि ती मला पुन्हा बिलगली. ससाण्याची चाहूल लागली कीं कबुतराला घरकाम पडतें; आश्रयासाठीं ते





धन्याच्या पजाकर घेऊन असतें; त्याच्या धास्तीचें कारण समजलेलें नसलें तरी त्याची अवस्था पाहून धनी त्याला छातीशीं धरतो, गोंजारून शांत करतो; अशीच आतां तिची अवस्था झाली होती. तिच्या डोळ्यांतून ओघळणाऱ्या अश्रूंनीं आमचे दोघांचेहि ओठ व गाल ओले झाले.

आपुलकीच्या या अकृत्रिम आविष्कारानें माझं हृदय थरारलें.

"आतां सांग बरं, मवाल्यांशीं इतकी कां दचकलीस ?"

थोडा वेळ विचार करून ती म्हणाली,

"मला वाटलं; माझ्या नवऱ्यानं तुम्हांला माझ्या मागावर पाठवलं आहे."

आतां दचकण्याची पाळी माझी होती.

"तुझा नवरा ?" मीं कांपऱ्या स्वरांत विचारलें, "आणि तो तुझ्या पाळतीवर आहे ?"

"हो ना, मेल्यांनं जीव नकोसा करून सोडला आहे. आज मात्र त्या साऱ्यांना झुकांडी देऊन मी निसटलें."

"सगळ्यांना ? म्हणजे कुणाकुणाला ?"

"रात्रंदिवस चार मवाली संगें घेऊन माझ्या मागं मागं हिंडत असतो, बघा."

बाप रे ही भानगड अशी आहे तर ! हा मामला आपल्याला कसा झेपणार ? आतां हें प्रकरण इथेंच संपवावें कीं पुढें चालू करावें ? घाम पुसण्यासाठीं रुमाल काढण्याच्या निमित्तानें मीं तिच्या हातांतला हात काढून घेतला आणि ढोंग सुरू केलें.

माझी चलबिचल तिच्या लक्षांत आल्यावांचून राहिली नाहीं. माझा उडालेला जीव थाऱ्यावर आणण्यासाठीं ती म्हणाली,

"तुम्ही तशी कांहीं काळजी करूं नका, तीं माणसं या बाजूला कधीं फिरकायचींच नाहींत."

"कशावरून ?"

"मी राहतें भवानी पेठेंत भावाजवळ, आणखी तो राहतो गणेश पेठेंत; मग तो इकडे कशाला येईल ? जीव द्यायला ? कीं पोलिस चौकींत बसायला ? शिवाय आज शनवार, सारे गेले असतील घोड्यांच्या शर्यतीला.

तिचें म्हणणें रास्त होतें. नवऱ्याच्या हालचालींची इत्थंभूत माहिती असल्याशिवाय आणि त्याच्या तोडीचें आश्रयस्थान असल्याशिवाय अहिल्येनें हालचाल केलेली असणें संभवनीय नव्हतें. शिवाय जमावाचें मानसशास्त्र माझ्यापेक्षां किंवा पुस्तकी प्राध्यापकापेक्षांही तिलाच अधिक अचूक अवगत होतें. मवाली मित्रांच्या मदतीनें नवरा भर दिवसा, भर रस्त्यावरून [illegible] असलेल्या आपल्या बायकोला जबरदस्तीनें किंवा प्रसंगविशेषीं हाणमारी करूनहि ओढून नेऊं शकतो; उफाळलेलें डोबड, चार ठोके देऊन घरांत परत न्यायचें, त्याच पद्धतीनें; पण हें शहराच्या पूर्व भागांत, कारण नवऱ्याचा हा हक्क त्या भागांत सर्वमान्य असतो. म्हणून बायकोची कड घेण्यास कोणी तिऱ्हाईत सहसा धजावत नाहीं; कोणी पुढें झालाच तर भोंवतालच्या रहिवाशांच्या रोषाला तो पात्र होतो, किंवा उपहासाला. पश्चिम भागांतल्या पांढरपेशा वस्तींत अशा घटना सहसा घडूं शकत नाहींत. या भागांत गुंडगिरी करणाऱ्या मिचाऱ्या नवऱ्याची कोणी कड घेणार नाहीं. बायको नांदत नसली तर कायदेशीर नोटिसा देण्यांत येतील किंवा वैवाहिक हक्कांच्या प्रस्थापनेसाठीं दिवाणी दावे लावण्यांत येतील आणि कांहीं वरा वाईट प्रकार अनुचित असा झाल्यास त्याबद्दल साक्ष देण्यास कोणी साक्षीदारही मिळणार नाहींत, कारण सारेच भ्याडदार ! बायकोच्या मर्जीविरुद्ध पुरुषानें तिचें मनगट धरलें तर स्त्रीदाक्षिण्याच्या नावाखालीं कदाचित् त्यालाच पिटाळण्यांत येईल, पोलिसांत वर्दी देण्यांत येईल आणि त्याच्यावर फिर्याद गुदरण्यांत येईल. या भागांतल्या कायमच्या रहिवाशांच्या या मनोवृत्तीचा इतका अभ्यास झालेला असेल अशी माझी कल्पना नव्हती.

होय, तिचें म्हणणें खरें होतें. मीं घड्याळांत पाहिलें. मध्यंतरीच्या विश्रांतीची वेळ जवळ आली होती. आपल्या एखाद्या ओळखीच्या इसमानें आपल्याला एका अनोळखी स्त्रीच्या सहवासांत पाहणें किती अनिष्ट आहे याची आतां मला जाणीव होऊं लागली. शिवाय एकदां गुरुजींनीं सांगितलेला प्रेमशास्त्रांतला एक सिद्धांत मला त्या वेळीं आठवला; प्रेमाचा प्रारंभ झाला कीं पावलांची पावलाशीं करून राहिली पकड सैल होण्यापूर्वींच परिपूर्तिपर्यंतची मजल गांठली पाहिजे. अशा वेळीं हुकलें कीं पुढें कधींच साधत नाहीं; हाच तो सिद्धांत.

थोडा वेळ विचार केला, आणि विचारलें,

"हें बघ, अहिल्या, आपलें आतांपर्यंत पुष्कळ बोलणें झालें; आतां मी तुला कांहीं विचारलें तर रागावणार नाहींस ना ?"

"मी अशातशाला रागावणारी असतें तर येथवर आलें असतें का मास्तर ?"

"मास्तर ? हें काय चमत्कार ? पुण्यांतील घरवाल्यांच्या माहितीसाठीं मीं हा पेशा पत्करलेला होता. यामुळें पैशांची पुष्कळ बचत होत असे; शिक्षकांबद्दल मालकिणबाईंना आदर असतो, म्हणून नव्हे; शिक्षकांचें दारिद्र्य विख्यात असतें म्हणून. अहिल्येचें नांव मीं ओळखलें त्या वेळीं ती चमकली होती धास्तीनें; आतां मी चमकलों खुशीनें, तृप्तीच्या अपेक्षेनें.

"मास्तर ? मी मास्तर आहें हें तुला कुणी सांगितलं ?"

"बायजानं. तुमच्या नांवावर ती मला गटवायला पहात होती."

"ठीक. थोड्या वेळापूर्वी तूं मला एक वचन दिलं आहेस, त्याची आठवण आहे ना ?"

"कधीं, कसलं वचन बाई ?" तिनें ओठावर तर्जनी ठेवून चकित स्वरांत विचारलें.

"मीं तुझं नांव ओळखलं तर मी मागेन तें देण्याचं ?"

"मग काय हुकूम आहे ?"

"अजून बाहेर पाऊस पडतो आहे. आपण टांगा; नाहीं तर टॅक्सी करून कुठें तरी जाऊं, घटकाभर बोलत बसूं, मग तुला कुठं जायचं असेल तिथं पोंचवून देईन."

"आणखी कुठं कशाला ? इथेंच गप्पागोष्टी करीत बसूं या कीं !" अहिल्या खोडकर स्वरांत, खेळकरपणें हसत हसत म्हणाली.

थोड्याशा चिडखोरपणें मीं तिचें मनगट इतक्या जोरानें दाबलें कीं ती स्स्ऽ हाय करून कळवळली. मीं चमकून तिचा हात सोडला. माझ्या मुठीच्या मिठींत तिची एक बांगडी पिचली होती आणि बांगडीचा एक तुकडा मनगटावरल्या मांसांत रुतला होता. मनगटावरून हलका हात फिरवून मीं तो तुकडा हेरला आणि नखांनीं ओढून काढला. नंतर माझ्या हातरुमालाची एक पट्टी फाडून मनगट बांधून टाकलें. मग म्हणालों,

"अहिल्या, मला क्षमा कर. तुला दुखविण्याचा माझा इरादा नव्हता."

झालेल्या जखमेमुळें नव्हे, पण माझ्या शब्दांतील औपचारिकपणामुळें दुःखित होऊन अहिल्या म्हणाली,

"असं काय हो अगदीं परक्यासारखं बोलतां ?"

"म्हणूनच तर मी म्हणत होतों कीं घरच्यासारखं बोलत बसतां येईल अशा निवांत ठिकाणीं आपण जाऊन बसूं या."

माझ्या प्रश्नाचें ती काय उत्तर देते याविषयीं मी अनावर झालों होतों तोंच दारावरला पडदा सरकला. वीजदिव्याच्या प्रकाशाचा झोत आला व गेला, आणि पडदा पुन्हा सरकला व बंद झाला !

क्षणभर मात्र आंत आलेलें जोडपें पाहतांच अहिल्येच्या अंगाचा एकाएकीं थरकांप उडाला. ती एकदम बिथरली ! मला कांहींच समजेना. थोड्याच वेळांत अहिल्येची कांपरी कुजबुज कानीं आली—

"मास्तर, आतां मी काय सांगतें तें ऐका. ती माझी सासू आणि तो माझा नवरा. तुम्ही तातडीनं बाहेर पडा."

हें ऐकून आतां काय करायचें तेंच मला कळेना.

"उठा मास्तर !" अहिल्येनें विनविलें.

मी उठलों आणि उजवीकडे वळलों.

"मास्तर, छत्री राहिली तुमची." अहिल्येनें माझा हात ओढून सांगितलें. "आणखी हें घ्या तुमचं तिकीट. कुणाला संशय नको यायला."

मीं तिकीट खिशांत घातलें, छत्री हातीं घेतली आणि खुर्च्यांच्या रांगेंतून धडपडत बाहेर पडलों.

झपाझप चालून पूल गांठला. चित्रमंदिरापासून शक्य तितक्या लवकर शक्य तितकें दूर मला जायचें होतें !

बऱ्याच लांबवर झरझर आल्यावर माझ्या मनांतली धास्ती जरा ओसरली. आतां अहिल्येशीं माझा संबंध जोडतां येईल असा कोणताही पुरावा मागें राहिलेला नव्हता. होय. माझ्या रुमालाची पट्टी मात्र तिच्या मनगटावर बांधलेली होती. राहिलेला रुमाल माझ्या खिशांतच होता. या रुमालानेंच तिनें आपले कपोल माझ्याशीं टिपले होते. हा पुरावाहि नाहींसा करूं का ?

शौर्याच्या लंब्याचवड्या बाता मारणारा मनुष्य प्रसंगानुरोधानें किती नेभळा होतो ? मारामारीचा प्रसंग आला असता तर मीं एकादोघांना सहज लोळवलें असतें. स्वाभिमानाला धक्का बसला असतां मनुष्य धैर्यानें यशस्वी प्रतिकार करूं शकतो. पण मी ज्या प्रसंगातून बचावलों होतों किंवा जो टाळण्यासाठीं पळ काढला होता तो असा अभिमानाच्या आव्हानाचा नव्हता; शरमेचा होता. दाक्षिण्यवादी तिऱ्हाइताची भूमिका पत्करून मला तो लढवितां आला असता. पण विवेकजन्य संकोचामुळें किंवा प्रतिष्ठाजन्य दौर्बल्यामुळें मला तो जरूर तेवढ्या हिरिरीनें लढवितां आला नसता.

चंद्रिका चित्रमंदिरासमोरच्या उपाहारगृहांत दुसऱ्या मजल्यावरील खास खोलींत बसून आवारांत होणारा प्रकार पहावा असें ठरवून मी पुलाकडे परतलों. चार पावलें गेलों न गेलों तोंच वाटलें कीं अहिल्येच्या नवऱ्यानें दारवानांच्या मदतीनें आजूबाजूला तपास करून मला ओळखलें तर ?

माझीं दोन मनें आपसांत वाटाघाट करूं लागलीं—आपल्यासारख्या प्रतिष्ठांनीं मवाल्यांच्या मागें का लागायचं ?...अरे चोरा, आणि ज्यांना तूं आतां मवाली म्हटलेंस त्यांच्या तरण्याताठ्या बायका हव्याशा वाटतात तेव्हां तुझा प्रतिष्ठितपणा कसा आड येत नाहीं ?...आपण काय जबरदस्ती थोडीच करतों ? कीं कोणाचा विनयभंग करतों ? बरोबर आहे, पण यांतलेंच एकादें लफडें मानगुटीला बसलें म्हणजे ? मघाशींच आंत आल्याबरोबर त्या उनाड मैनेच्या नवऱ्यानें दोन चढवून दिल्या असत्या तर ? तूं सुटलास रे, म्हणून तुझ्या या आतां गमजा चालल्या आहेत. उद्यां हें अंगाशीं आलें म्हणजे तुझें सारें ढोंग चव्हाट्यावर येईल, बायको वाभाडे काढील, समाज बहिष्कृत करील; फिर्यादीअर्यादी होतील, गुन्हा शाबीत झाला तर शिक्षाही होईल ! ...अरे जा जा, माहीत आहे ! असल्या छप्पन अहिल्यांचे एकशे बारा नवरे जरी माझ्या एकट्यावर धावून आले तरी...

मी घराकडे परतलों. मला पाहतांच आमच्या सौभाग्यवतीनें चौकशी केली, "पाऊस नाहीं ना लागला ? मी आपली काळजींत होतें !"

खरंच, कुणीं अगत्यानें काळजी करावी असा मी माणूस आहें का ?

माझ्या भटक्या आयुष्यांत मला आजवर अनेक स्त्रिया भेटलेल्या आहेत. त्यांपैकीं कांहीं चटका लावून गेल्या—त्यांच्या पुनर्दर्शनाची इच्छा एकादे वेळीं होते—आणि कांहीं फटका देऊन गेल्या—त्या पुन्हा भेटतात कीं काय अशी धास्ती कधीं कधीं मनांत येते—पण; अहिल्येशिवाय कोणीही माझ्या अंतर्यामांत प्रविष्ट होऊं शकली नाहीं. इतर जशा आल्या, तशा गेल्या; ही मात्र ठाण मांडून राहिली ! असें मी म्हटलें तर अहिल्ये, तुझा माझ्यावर विश्वास बसेल का ?



